प्रकाशक
जा. मा. वाचासुंदर, बी. ए.
टिळकरस्ता, नागपूर, नं २

एकमेव विक्रेते
श्री. रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी, पुणें

•••



मुखपृष्ठावरील चित्र :— श्री. दीनानाथ दलाल

मुद्रक
जा. मा. वाचासुंदर, बी. ए.
नरकेसरी प्रेस, नागपूर २

नागपूर, जून
१९४९

आमचे प्रिय सुहृद्

**सौ. हिराबाई आणि श्री. बाबासाहेब भोंसुले**

यांस अत्यंत प्रेमादरपूर्वक

समर्पण

## माडखोलकर वाङ्मय

### प्रबंध

आधुनिक कविपंचक
विष्णु कृष्ण चिपळूणकर
विलापिका
माझे आवडते लेखक
वाङ्मयविलास
स्वैर विचार
अवशेष
आव्हान
जीवन-साहित्य
माझी नभोवाणी
परामर्ष
हाक
सुभाषवाद
दोन तपें

### कादंबऱ्या

मुक्तात्मा
भंगलेलें देऊळ
शाप
कांता
मुखवटे
दुहेरी जीवन
डाक बंगला
नागकन्या
चंदनवाडी
प्रमद्वरा
नवे संसार

### कथासंग्रह

रातराणीचीं फुलें
शुक्राचें चांदणें

# निवेदन

ही कहाणी मंगळवार ता. ३ फेब्रुवारी १९४८ रोजीं मी लिहावयाला घेतली आणि ता. २६ फेब्रुवारी १९४८ रोजीं पूर्ण केली.

तिच्या समारोपाचा भाग भारतीय स्वातंत्र्याच्या पहिल्या वाढदिवशीं म्हणजे ता. १५ ऑगस्ट १९४८ रोजीं लिहिला. त्या दिवशीं पुन्हा नागपूर शहरांत दंगल होणार, अशी अफवा उठली होती. त्या संत्रस्त वातावरणांतच हा समारोप लिहिला गेला.

दैनिक ' तरुण भारत ' आणि त्याचा संपादक यांच्या निर्वासनाच्या कालांतलि ही दैनंदिनी आहे. त्या काळांत प्रसंग जसे घडत गेले तसे, संभाषणें जशीं होत गेलीं तशीं आणि विचारहि जसे सुचत गेले तसे लिहिले.

म. गांधी यांच्या खुनानंतर सोमवार ता. २ फेब्रुवारी १९४८ रोजीं नागपूर शहरांत जी दंगल, जाळपोळ आणि लूटमार झाली, तींत ' शांतानिवास ' ' नरकेसरी ' प्रेस आणि ' तरुण भारत ' कार्यालय यांचा विध्वंस करण्यांत आला. ता. २ रोजीं दुपारीं आम्ही ' शांतानिवासा 'तून राजे श्री. प्रतापसिंहमहाराज भोसले यांच्या वाड्यांत त्यांच्या आश्रयाला आलों; व तेथून ता. ३ रोजीं सायंकाळीं, मध्यप्रांत सरकारचे आरोग्यमंत्री ना. डॉ. वा. शि. बारलिंगे यांनीं केलेल्या व्यवस्थेनुसार, असेंब्ली रेस्ट हौसमध्यें रहावयाला गेलों. तेथून सोमवार ता. १६ फेब्रुवारी रोजीं सायंकाळीं पुन्हा ' शांतानिवासां'त परत आलों. त्यानंतर गुरुवार ता. १९ फेब्रुवारी रोजीं दुपारीं ' तरुण भारता ' चा छोटा आणि ता. २६ रोजीं सकाळीं मोठा अंक प्रसिद्ध झाला

चोवीस दिवसांच्या या चिमुकल्या कालखंडांतील बहुतेक प्रसंग, कांहीं संभाषणें आणि तात्कालिक विचार यांची गुंफण या कहाणींत केलेली आहे.

' तरुण भारत ' पुन्हा सुरू होऊन मनाला थोडी स्वस्थता आल्यावर रेस्ट हौसमध्यें असतांना सवडीनुसार घाईघाईनें लिहिलेलीं या दैनंदिनीचीं टिपणें मी काळजीपूर्वक वाचलीं आणि सर्व हस्तलिखित पुन्हा लिहून काढलें. हें

पुनर्लेखन करित असतांना, जे प्रसंग किंवा जीं संभाषणें आजच्या परिस्थितींत प्रसिद्ध झाल्यानें कोणाला कदाचित् अपाय होईल असें वाटलें, तीं गाळलीं; व नामनिर्देशहि संदिग्ध केले. पण, टिपणांतील बाकीचा भाग मात्र, मूळांत लिहिला होता तसाच, शब्दशः घेतला. त्या दृष्टीनें, निर्वासनाच्या काळांतील ही दैनंदिनी, कांहीं ठिकाणीं खंडित होऊन का होईना, प्रायः मूळच्या स्वरूपांतच प्रकाशित होत आहे, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

ही कहाणी लिहित असतांनाच ता. ४ फेब्रुवारी रोजीं माझे प्रकाशक मित्र श्री. रा. ज. देशमुख यांना पत्र घालून मी तिच्या प्रकाशनाची व्यवस्था करण्या-संबंधीं लिहिलें. त्या पत्राला ता. ११ रोजीं घातलेल्या उत्तरांत त्यांचे सहाय्यक श्री. शं. प. खत्री यांनीं असें लिहिलें होतें कीं, " आपलें दि. ४-२ चे पत्र. श्री. रामभाऊ आणि श्री. अनंतराव कुलकर्णी (कॉंटिनेंटल प्रकाशन) या दोघांना दि. ५-२ ला अटक झालेली आहे. आपल्या परिस्थितीची कल्पना वर्तमानपत्रांवरून आली. "

श्री. खत्री यांचें हें उत्तर वाचल्यावर मला स्टीफन झ्वाइगच्या पत्रांतील ते करुणोद्गार आठवले. युरोपांतील महायुद्धापासून अगदीं दूर दूर ब्राझिलमध्यें रिओ येथील रमणीय एकांतवासांत तो असतांना एका नव्या कादंबरीचें कथा-नक, अर्धवट आठवणाऱ्या स्वप्नाप्रमाणें, त्याच्या प्रमाथी मनांत सारखें घोळूं लागलें. पण दुसऱ्याच क्षणीं त्याच्या दुःखदग्ध मनांत असा विचार आला कीं, "......आतां पुन्हा कधींहि मला स्वतःचें निवासस्थान, स्वतःचें घर, स्वतःचा प्रकाशक मिळणार नाहीं; पुन्हा कधींहि मी आपल्या मित्रांना यत्किंचित्सुद्धां सहाय्य करूं शकणार नाहीं ! " ( And then the thought that never again will I have a house, a home, a publisher; never again be able to render my friends the slightest service. ) श्री. खत्री यांच्या पत्रामुळें माझा उत्साह मावळला आणि तीं टिपणें मीं तशींच ठेवून दिलीं.

पण, हा विलंब एका परीनें उपकारक झाला आहे, असें मी म्हणेन. कारण, महात्माजींच्या मृत्यूनंतर महाराष्ट्रांत सर्वत्र झालेल्या दंगलींतून जें विवादाचें

वावटळ उठलें, त्यानें सतत सहा महिने महाराष्ट्रांतील निरनिराळ्या पक्षांच्या आणि वृत्तींच्या विचारवंतांचीं मनें आणि मतें घुसळून काढलीं. तें वावटळ बहुतेक शांत झाल्यावर आतां ही कहाणी प्रसिद्ध होत असल्याकारणानें तिच्यांतील विचारांचा परामर्श अधिक विवेकानें घेतला जाईल, अशी मला अपेक्षा आहे. अर्थात् ही कहाणी लिहीत असतांना जें संभाषण ज्या वेळीं घडलें किंवा जे विचार ज्या वेळीं सुचले, ते प्रायः तसेच लिहून काढलेले असल्यामुळें, तींत प्रसंगोपात प्रकट झालेल्या विचारांत जर सुसंगति किंवा सयुक्तिकता आढळली नाहीं, तर त्यांत नवल काय? पुनर्लेखन करितांना तात्कालिक संभाषणांतील आवेश, अतिरेक किंवा असंबद्धता मला कमी करतां आली नसती, असें नाहीं. पण, ही कहाणी हें एका विशिष्ट प्रक्षोभाचें आलेखन म्हणा वा अपत्य म्हणा आहे; व म्हणून ती मूळच्या स्वरूपांतच लोकांपुढें येण्यांत औचित्य आहे, असें मला वाटल्यामुळें, मी तिचें पुनर्लेखन करतांना तिच्यांतील भावनोत्कटतेला किंवा विचारावेगाला कुठेंहि धक्का लावला नाहीं. वाचकांनींहि, तिचें हें वैशिष्ट्य म्हणा वा वैगुण्य म्हणा लक्षांत घेऊनच, तिच्यांत व्यक्त झालेल्या विचारांचा परामर्श घ्यावा, अशी माझी त्यांना विनंती आहे.

या कहाणीचें हस्तलिखित घेऊन ता. २७ फेब्रुवारी १९४८ रोजीं मी जेव्हां प्रथम मुंबईस आलों, तेव्हां माझे मित्र प्रो. वि. ह. कुलकर्णी हे मला म्हणाले, " तुमच्या आयुष्यांत संकटें हीं नेहमीं उपकारक झालेलीं आहेत, असा माझा गेल्या तीस वर्षांचा अनुभव आहे. तसाच प्रकार याहि बाबतींत होईल, असें मला वाटतें. " माझे दुसरे स्नेही श्री. उमाकांत भेंडे यांनीं तर असे उद्गार काढले कीं, " मी मुळीं हें संकट समजायलाच तयार नाहीं. कारण, ज्या धैर्यानें आणि तडफेनें तुम्ही या प्रसंगांतून डोकें वर काढलेंत, त्यामुळें महाराष्ट्रांत तुमची प्रतिष्ठा वाढली आहे. त्या दृष्टीनें ही मी एक इष्टापत्तीच समजतों. प्रथम दर्शनीं अनिष्ट वाटणारा एखादा प्रसंग हा खरोखरी तसा होता कीं नाहीं, हें त्याच्या अंतिम परिणामांवरून ठरवावें लागतें. या संकटांत तुमचे आजपर्यंत लोकांच्या प्रत्ययाला न आलेले अनेक गुण कसोटीला लागून तुमचें तेज वाढलें

आहे!" माझ्या दोघां मित्रांची माझ्या आयुष्यांतील या अत्यंत बिकट प्रसंगाकडे पहाण्याची ही पूर्वानुभवप्राप्त, असाधारण दृष्टि जरी लक्षांत न घेतली, तरी एवढी गोष्ट मात्र खरी कीं, या दुर्धर संकटामुळें माझ्याविषयीं आणि 'तरुण भारता' विषयींहि अखिल महाराष्ट्रांतील निरनिराळ्या पक्षांच्या आणि वृत्तींच्या लोकांना किती आत्मीयता किंवा अगत्य वाटतें, याची प्रतीति प्रथमच मला आल्हाददायक उत्कटतेनें आली.

रेस्ट हौसमध्यें असतांना जो सहानुभूतीचा वर्षाव आमच्यावर झाला, त्याचें वर्णन मी या कहाणींत केलेंच आहे. पण 'तरुण भारता' चें आर्थिक सहाय्याविषयींचें विनंतिपत्र वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होतांच गेल्या चार वर्षां· तल्या त्याच्या कामगिरीविषयीं महाराष्ट्रांतील निरनिराळ्या पक्षांच्या सुबुद्ध विचारी लोकांत किती अनुकूल मत आहे याची प्रोत्साहक कल्पना मला आली. हें विनंतिपत्र प्रकाशित झाल्यावर पहिला चेक मेजर जनरल जगन्नाथराव भोसले यांचा ता. १७ मार्च १९४८ रोजीं मुंबईहून अगदीं अचानक आला. त्या चेकसोबत पाठविलेल्या पत्रांत त्यांनीं असे उद्गार काढले होते कीं,—

On my return from Delhi I was shocked to learn about the happenings in Maharashtra in general and the burning of your press in particular. Such is the mass fury roused by communal propaganda and irresponsible talk.

In the past you have rendered very valuable service to the I. N. A. cause through 'Tarun Bharat' and you are doing excellent service at present to the cause of Maharashtra Unification also. And as a token of my appreciation, I am herewith enclosing a cheque which, I hope, you will please accept.

Wishing rebirth of Tarun Bharat in the near future.

त्यांच्या पाठोपाठ महर्षि प्रो. अण्णासाहेब कर्वे, श्री. ध. रा. गाडगीळ, बॅ. रामराव देशमुख, श्री. ल. ब. भोपटकर, प्रो. चिं. वि. जोशी, श्री. खं. सा. दौंडकर प्रभृति हितचिंतकांकडून देणग्या आल्या. अगदीं अलिकडे ता. ५ ऑगस्ट १९४८ रोजीं चेकसह आलेलें पत्र ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर यांचें आहे. या पत्रांत त्यांनीं लिहिलें आहे—

I hope you have received a good response to your appeal and that the affairs of the paper are once more being restored to their former position. You are doing memorable service by your day-to-day contributions on the question of Samyukta Maharashtra. I read your paper whenever I get time, which is not always the case in the midst of the heavy duties I have undertaken as the first honorary Vice-Chancellor of the Poona University. That compels me to stay at present in Poona, and I shall therefore thank you to send your paper direct to my address at the top. It will save a couple of days in transit. If you happen to be in Poona, please do not fail to look me up.

महर्षि अण्णासाहेब कर्वे यांच्याकडून जे ५ रुपये अगदीं अभावितपणें आले, ते मला पांच लाखांच्या मोलाचे वाटले. अखिल महाराष्ट्राला वंदनीय होऊन बसलेल्या त्यांच्यासारख्या त्यागी, चारित्र्यवान् आणि स्वतंत्रप्रज्ञ समाजसेवकाचा जणुं आशीर्वादच होता तो! ता. १ ऑगस्ट १९४८ पर्यंत देणग्या आणि बव्हंशीं बिनव्याजी कर्जे यांच्या रूपानें माझ्या मित्रांनीं 'तरुण भारत' ला २०००० रु. दिले. ता. २ फेब्रुवारीच्या विध्वंसानंतर 'तरुण भारत' ला झालेलें हें प्रायः स्वयंस्फूर्त सहाय्य आणि त्यामुळें घडून आलेलें त्याचें पुनरुत्थान यांच्या संबंधीं बोलतांना आमचे एक विश्वस्त स्नेही मला म्हणाले, " चार वर्षांपूर्वी

'तरुण भारत ' प्रथम निघाला, त्या वेळीं आमच्या सारख्यांची मदत किंवा मेहनत तो निघायला कारण झाला, असें म्हणतां येईल. पण, आम्ही तुटपुंज्या भांडवलावर काढून दिलेल्या ' तरुण भारता 'चें अल्पावधींतील यश हें जसें तुमच्या कर्तबगारीचें फळ आहे भाऊसाहेब, तसेंच गांधीवधानंतरच्या गंडांतरांतून झालेल्या त्याच्या या पुनर्जन्माचें श्रेयहि सर्वस्वी तुम्हांलाच द्यावें लागेल. तुम्ही सर्व दृष्टींनीं कसोटीला उतरलांत या प्रसंगांत !—"

पण हें श्रेय माझें एकट्याचें नाहीं. ' नरकेसरी स्मारक मंडळा'तील माझे विश्वस्त बंधु, विशेषतः माझे ज्येष्ठ सहकारी श्री. ए. श्री. पटवर्धन आणि संपादन-मुद्रण विभागांतील माझे सर्वच लहानमोठे सहकारी हे जर मला साथ द्यावयाला त्या वेळीं निष्ठेनें पुढें सरसावले नसते, तर या प्राणांतिक आघातांतून डोकें वर काढण्याची माझी धडपड यशस्वी झाली असती कीं नाहीं, याबद्दल मला जबर शंका आहे. ' हितवाद ' प्रेसमध्यें ' तरुण भारत ' छापावयाला आयत्या वेळीं नकार देणारें श्री. भारद्वाज यांचें पत्र ता. १७ फेब्रुवारी रोजीं जेव्हां आमच्या हातीं पडलें, तेव्हां माझ्या डोळ्यांपुढें पसरलेला अंधार अद्यापहि पुरता लोपलेला नाहीं. त्या अंधारांतून इतक्या लवकर आम्ही मार्ग काढूं शकलों, याचें श्रेय जितकें माझ्या सहकाऱ्यांना आणि सर्व महाराष्ट्रभर पसरलेल्या सुहृदांना आहे, तितकेंच तें ' तरुण भारता ' विषयींची आपली आत्मीयता, अत्यंत हीन, अभद्र, पक्षद्वेषांध प्रचाराच्या त्या आणीबाणींतहि, ढळूं न देणाऱ्या नागपूरच्या दिलदार जनतेलाहि मी देईन.

या प्रसंगामुळें ' तरुण भारता 'च्या धोरणांत फरक होईल, अशी अनेकांची अपेक्षा होती; व त्याच्या विध्वंसाचा संबंध त्याच्या धोरणाशीं चिकटवून कांहीं समव्यावसायिकांनीं तसें बोलूनहि दाखविलें होतें. पण, ' तरुण भारता'चें सध्यांचें पक्षातीत, स्वतंत्र धोरण हें आम्ही विचारपूर्वक निश्चित केलेलें असल्यामुळें, अशा प्रकारच्या कोणत्याहि आघातानें किंवा आपत्तीनें त्यांत बदल होणें अशक्य आहे. विचारस्वातंत्र्य हा मी लोकशाहीचा आत्मा समजतो. हिंदुस्थानांत जर लोकशाहीचा योग्य आणि पूर्ण विकास व्हावयाला हवा असेल, तर हिंदी जनतेचें विचारस्वातंत्र्य अबाधित राहिलें पाहिजे; व तें तसें ठेवण्याची

जबाबदारी मुख्यतः वृत्तपत्रांवरच आहे. म्हणून, निदान वृत्तपत्रांनीं तरी, कोण-त्याही विशिष्ट राजकीय पक्षाच्या धुरेला स्वतःला जखडून न घेतां, आपलें धोरण स्वतंत्र आणि विशेषतः सत्ताधारी पक्षाच्या बाबतींत जागरूक ठेवणें अत्यंत अवश्य आहे. कारण, लोकहिताच्या दृष्टीनें केल्या जाणाऱ्या समंजस टीकेच्या अभावीं सत्ताधारी पक्ष हा निरंकुश आणि मदांध होत जाऊन राज्यसत्तेला हुकूमशाहीच (Fascist) स्वरूप प्राप्त होतें, असा सर्वत्रिक अनुभव आहे. ही गोष्ट लक्षांत घेऊनच 'तरुण भारता' चें धोरण आम्ही पक्षातीत आणि स्वतंत्र ठेवलें आहे; व मी संपादक असेपर्यंत तरी त्या धोरणांत बदल होण्याचा संभव नाहीं.

गेल्या सहा महिन्यांतले हे सगळे विविध अनुभव लक्षांत घेतले, म्हणजे मलाहि असें वाटतें कीं, ता. २ फेब्रुवारी रोजी आमच्यावर कोसळलेलें सकंट ही केवळ एक कसोटी ठरली. त्या कसोटीला तात्विक आणि लौकिक दृष्ट्या आम्ही पुरेपूर उतरलों, याबद्दल मला सदैव अभिमान वाटेल. व्यक्ति काय किंवा संस्था काय त्यांची उपयुक्तता संपल्याबरोबर त्यांचें अस्तित्वहि संपण्यांत औचित्य आहे, असें मी मानतों. 'तरुण भारत' सुरू करतांना त्याच्या कार्याविषयीं कांहीं एक निश्चित कल्पना मी आपल्या मनांत केली होती. तदनुसार गेलीं चार वर्षे, 'न मे कर्मफले स्पृहा' या भावनेनें, तो आपलें अंगीकृत कार्य निष्ठेनें करित आलेला आहे. तें कार्य पूर्ण होईपर्यंत 'तरुण भारत' चालविण्यासाठीं शक्य ते सर्व प्रयत्न आमच्याकडून केले जातील.

या कहाणीची मुद्रणप्रत तयार करण्याच्या, मुद्रितें तपासण्याच्या, संदर्भ पडताळून पहाण्याच्या वगैरे कामीं माझे तरुण मित्र श्री. मधुकर वैद्य, श्री. गोविंद दीक्षित, श्री. केशव पोतदार आणि श्री. राम शिंदे यांनीं जें निरलस सहाय्य केलें, त्याचा उल्लेख करणें अवश्य आहे. तरीसुद्धां, त्याच्या शुद्धलेखनांत जर कांहीं शिथिलता आणि संदर्भांत जर कांहीं प्रमाद राहिलेले असतील, तर तो माझ्या सध्यांच्या अस्थिर, व्यग्र जीवनाचा परिणाम आहे, हें लक्षांत घेऊन वाचकांनीं मला सहृदयतेनें क्षमा केली पाहिजे.

आज जन्माष्टमी. पांच वर्षांपूर्वी याच दिवशीं ' नरकेसरी स्मारक मंडळा 'ची स्थापना होऊन दैनिक ' तरुण भारता 'च्या पुनरुज्जीवनाचा संकल्प करण्यांत आला. एकाद्या राष्ट्रभक्ताच्या स्मरणार्थ प्रथम विश्वस्त-संस्था स्थापन होऊन नंतर तिनें सुरू केलेलें, माझ्या माहितीप्रमाणें, ' तरुण भारत ' हेंच बहुधा पहिलें मराठी दैनिक असावें. त्याच्या पांच वर्षांपूर्वीच्या पुनरुज्जीवनाचें हें वैशिष्ट्य जसें मराठी वृत्तव्यवसायांत संस्मरणीय ठरेल, तसेंच त्याचें सहा महिन्यांपूर्वीचें पुनरुत्थानहि महाराष्ट्राला कौतुकास्पद वाटेल, अशी मला आशा आहे.

जन्माष्टमी, ता. २७ ऑगस्ट १९४८
'तरुण भारत' कार्यालय
नागपूर शहर

ग. त्र्यं. माडखोलकर

# उपक्रम

## मृत्यु ? छे, पूर्णाहुति

महात्माजी गोळीला बळी पडले ? छे ! ते अमर आहेत. शिखंडीच्या पाठी-मागून अर्जुनानें सोडलेल्या बाणांनीं विद्ध होऊन भीष्माचार्य ज्या वेळीं रथांतून खालीं कोसळले, त्या वेळीं " अहो, हा महात्मा गेला ! हा धर्मात्मा गेला !! " असा एकच आक्रोश दश दिशांतून दुमदुमला ! पण, त्या वेळीं शरवर्षावानें सारें शरीर चाळणीसारखें होऊन गेलें असतां आणि तहानेनें घसा कोरडा पड-लेला असतांहि शरतल्पीं पडलेले भीष्माचार्य उद्गारले, " नाहीं ! मी जिवंत आहे ! मी जिवंत आहे !! "

तसाच त्या जराजर्जर, छिन्नविच्छिन्न झालेल्या शरीरांतून बाहेर पडलेला महात्माजींचा आत्मा, अजेय आणि अमर आत्मा उद्गारत असेल, " मी जिवंत आहे ! मी जिवंत आहे !! "

त्या दिव्य आत्म्याची, परंधामीं गेलेल्या त्या महान् आत्म्याची ती अशरीरिणी ऐकावयाला आपल्या पार्थिव शरीराचे कान, आपल्या मातीच्या देहाचीं मर्त्य इंद्रियें समर्थ नाहींत, ही आपली दुर्बलता, हें आपलें दुर्भाग्य !!

पण महात्माजी गोळीला बळी पडले नाहींत, पडणें शक्य नाहीं. ते अमर आहेत, त्यांचा आत्मा अमर आहे, त्यांचें कार्य अमर आहे, त्या कार्याची स्फूर्ति अमर आहे.

ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं स्वतंत्र भारताचा उदय होऊन महात्मा-जींचें अवतारकार्य एका परीनें संपलें आणि म्हणूनच त्यांनीं, आपल्या जिवावर मारेकरी टपलेले आहेत याची जाणीव असतांना देखील, योगीश्वर भगवान् श्रीकृष्णाप्रमाणें, मृत्यूला फुलासारखा छातीवर झेलला !

श्रीकृष्णाच्या मरणाचा प्रसंग आणि गांधीजींच्या मरणाचा प्रसंग यांत किती विलक्षण साम्य आहे ! कुरुक्षेत्रावर कौरवांचा संहार होऊन पांडव स्वतंत्र आणि सत्ताधारी झाले; लोकांना गीतामृताचा लाभ झाला आणि श्रीकृष्णाचें

अवतारकार्य एका परीनें पूर्ण झालें. आणि मग अवतारकार्य संपलेल्या त्या भगवंताला मरण आलें, तें एका क्षुद्र पारध्याच्या तीरानें ! एकांतांत ध्यानमग्न अवस्थेंत बसलेल्या श्रीकृष्णाचें सुंदर चरणकमल पाहून त्या पारध्याला वाटलें, हें हरिणाचें कोमल मुख आहे आणि त्यानें तीर सोडला! तो तीर लागतांच भगवंतांनीं स्मित हास्य केलें, त्या भयभीत झालेल्या पारध्याला अभय दिलें आणि क्षणार्ध डोळे मिटून प्राणनिरोध केला!

गांधीजींचा मृत्यु त्याच प्रकारचा नाहीं काय?

छे! त्यांचा मृत्यु त्याहिपेक्षां अधिक उन्नत, अधिक वीरोचित आणि स्फूर्तिप्रद आहे. जणूं येशू खिस्ताचा मृत्यु! खिस्त जमावाच्या क्रोधाला बळी पडला; क्रुद्ध आणि क्षुब्ध जमावानें त्याला सुळावर चढविण्याचा हट्ट धरला आणि स्वतःचा सूळ स्वतःच्या खांद्यावर वहात नेऊन खिस्तानें त्यावर आरोहण केलें! पण, सुळावर चढत असतांनाच त्यानें आपल्या शरिराला खिळे ठोकणारांना उद्देशून परमेश्वराला प्रार्थना केली, "हे माझ्या बापा, तूं यांना क्षमा कर! कारण आपण कोणतें कृत्य करीत आहोंत, याची या मारेकऱ्यांना कांहींच जाणीव नाहीं!!"

आणि, आपल्या निराश झालेल्या शोकसंतप्त शिष्यांना त्यानें दिलासा दिला, "तुम्हीं भिऊं नका! मी मेलों नाहीं; मरणार नाहीं. मीं सदैव तुमच्यांत आहे. तुम्ही डोळे उघडून पहा. म्हणजे मी तुम्हाला दिसेन!!"

गांधीजींचें मरण हें भीष्माचार्यांच्या, श्रीकृष्णाच्या आणि खिस्ताच्या मरणासारखेंच दिव्य नाहीं काय? त्यांचें जीवन हा यज्ञ होता. त्या यज्ञाची पूर्णाहुति म्हणजेच त्यांचा मृत्यु!

त्या मृत्यूंतून नवें जीवन आविर्भूत होईल. त्या पूर्णाहुतींतून नवा युगपुरुष प्रगट होईल!!

त्या पूर्णाहुतीबद्दल शोक कसा करणार? म्हणून अश्रूंनों, मागें फिरा! हृदया, आपली सारी तळमळ, आपल्या साऱ्या वेदना आवर आणि मनाला सांग, जगाला सांग, जनतेला सांग—

**गांधीजी अमर आहेत! गांधीजी अमर आहेत!!**

—'तरुण भारत,' ता. ३१ जानेवारी १९४८

३ फेब्रुवारी १९४८
नागपूर शहर

मी आज घरादाराला अचानक मुकलेल्या एका निर्वासिताची कहाणी अखिल महाराष्ट्राला सांगत आहे.

हा निर्वासित कोण ?—

मी स्वतःच !

काल दुपारीं ११-३५ ला माझ्या दोन मुलांसह मी स्वतःचें घर सोडलें. छे ! सोडलें म्हणणें चूक होईल; मला सोडावें लागलें ! ११-३० ला माझ्या दोघा मित्रांची चिठ्ठी आली, " भाऊसाहेब, आपल्या जिवाला धोका आहे. आम्ही मोटार पाठवीत आहोंत. आपण मुकाट्यानें असाल तसे ताबडतोब निघून या. " चिठ्ठी घेऊन येणारे, श्रीमंत राजे प्रतापसिंहमहाराज भोसले यांचे अत्यंत विश्वासू कामदार, श्री. अण्णासाहेब शिर्के हे माझ्या परिचयाचे होते. मी ती चिठ्ठी सौ. शांताबाईला दाखविली. ती मला म्हणाली, " तुम्ही ताबडतोब जा. माझं काय होईल याचा विचार करूं नका. माझी काळजी घ्यायला मी समर्थ आहे " पण माझा पाय चटकन निघेना. श्री. शिर्के मला सारखे म्हणत होते, " तुमच्या जिवाला धोका आहे, भाऊसाहेब ! ताबडतोब निघा. प्रत्येक मिनिट मोलाचं आहे ! " त्यांनीं आणलेली महाराजांची मोटार ' शांतानिवासा- ' च्या मागल्या दारार्शी खडी होती. शेवटीं मी शांताबाईला म्हटलें, " मी मुलांना बरोबर घेऊन जातो आणि तिथें पोंचल्याबरोबर भास्करला किंवा मधूला तुझ्या सोबतीसाठीं पाठवून देतों ! " चंद्रशेखर आपल्या अशक्त आईला आणि वृद्ध आजीला ( शांताबाईच्या आत्याला ) गुंडांनीं सार्‍या बाजूंनीं घेर-लेल्या आणि गेले दोन दिवस सारखा दगडांचा मार खात असलेल्या त्या घरांत

एकटया टाकून माझ्याबरोबर यावयाला तयार नव्हता. पण शांताबाईनें त्याचा हात धरून जबरदस्तीनें बाहेर काढला. प्रथम तो आणि मीना अशीं दोघे मोटारींत बसलीं. नंतर मी बसलों. चोहों बाजूंना उभ्या असलेल्या गुंडांच्या क्रूर नजरेचे भाले आमच्यावर रोखलेले होते. पण ' रावसाहेबां ' नीं ( महाराजांचे ड्रायव्हर ) मोटार मागल्या रस्त्यानें शिताफीनें काढून सात आठ मिनिटांच्या आंतच राजवाड्यासमोर आणली.

मी त्यांना विचारलें, " काय, वाड्यांतच उतरायचं मी ?— "

" होय, तसंच सांगितलंय महाराजांनीं—"

मी मुकाटयानें खालीं उतरून देवडींतून आंतल्या बाजूला उजवीकडे असलेल्या महाराजांच्या कचेरींत आलों. दारावर सोडलेला निळा पडदा विभागून मी आंत येतांच श्री. प्रतापसिंहमहाराज खुर्चीवरून उठून पुढें आले आणि नमस्कारासाठीं जोडलेले माझे हात धरून उद्गारले, " भाऊसाहेब, घर आपलं आहे !—"

आज त्यानंतर बरोबर २४ तासांनीं, त्यांच्या या कचेरींत त्यांच्या टेबलाशीं बसूनच, मी ही माझी—पण माझी एकटयाची तरी कशी म्हणूं ? केवळ नागपुरांतल्याच नव्हे, तर महाराष्ट्रांतल्या हजारों कुटुंबांच्या दुर्दशेची—कहाणी जनतेला सांगण्यासाठीं लिहावयाला घेतली आहे.

* * *

ता. ३० जानेवारी १९४८ रोजीं सायंकाळीं ५ वा. संयुक्त महाराष्ट्र परिषदेची जी अनौपचारिक सभा ता. १ फेब्रुवारी रोजीं नागपूरला भरावयाची होती, तिला हजर रहाण्याचें निमंत्रण महाराजांना देण्यासाठीं आणि श्री. शंकरराव देव यांनीं लिहिलेल्या आणखी एका कामासंबंधीं त्यांना आगाऊ विनंती करण्यासाठीं मी त्यांच्याच मोटारींतून त्यांच्याकडे गेलों होतों. सुमारें तासभर आम्ही बोललों; व नंतर महाराजांनीं मला ' तरुण भारत ' कचेरींत पोंचवून दिलें. तेथून लगेच मी दवाखान्यांत जावयाला निघालों. ता. १३ जानेवारी रोजीं एक लहानसें ऑपरेशन मला करून घ्यावें लागलें होतें; व माझे मित्र, नागपूरचे प्रमुख कॉंग्रेस कार्यकर्ते, डॉ. रं. स. आकरे यांच्या दवाखान्यांत रोज सांज-सकाळ मी उपचारार्थ जात असे. त्याप्रमाणें मी मॉडेल मिल्स रोडनें जात

असतां राष्ट्रीय युवक संघाचे कार्यकर्ते श्री. सुरेश देवतळे हे धांवत माझ्याजवळ येऊन म्हणाले, " भाऊसाहेब, तुम्ही ऐकलं का ? महात्माजींना गोळी घातल्याची बातमी रेडियोवर आली आहे म्हणे ! "

" काय सांगतोस तूं हें, सुरेश ? असं कसं होईल ? तूं स्वतःच्या कानांनीं ऐकलंस का ? " मी सुन्न होऊन त्याला विचारलें.

" आम्ही स्वतः नाहीं ऐकलं पण आमच्यापैकीं एकानं स्वतःच्या कानांनीं ऐकलं, भाऊसाहेब ! "

श्री. देवतळे यांच्या पाठोपाठ आलेले राष्ट्रीय युवक संघाचे प्रांतीय नेते श्री. आनंदराव कळमकर म्हणाले.

" छे ! आनंदा, माझा विश्वास नाहीं बसत या गोष्टीवर ! गांधीजींना कोण घालणार आहे गोळी ?—"

मी हें उत्तर दिलें खरें. पण माझें मन हादरून, भारावून गेलें होतें.

मी दवाखान्यांत गेल्यावर थोड्याच वेळांत डॉ. आकरे आले. त्यांना मी म्हटलें, " काय डॉक्टरसाहेब, तुम्ही ऐकलीत का गांवांत काय अफवा उठली आहे ती ?— "

" अफवा नाहीं भाऊसाहेब, अगदीं खरी गोष्ट आहे—"

" तुम्ही स्वतः ऐकलीत ? "

" नाहीं. पण ज्यांनीं स्वतः ऐकली, त्यांनींच ती मला सांगितली. फक्त एवढंच कळलं कीं, प्रार्थनेला जात असतां महात्माजींवर चार गोळया झाडण्यांत आल्या आणि लगेच ते 'कोलॅप्स' झाले-- "

आम्ही हें बोलत असतांनाच आमच्या कचेरींतून माझे ज्येष्ठ सहकारी श्री. ए. श्री. पटवर्धन यांचा निरोप आला, " तुम्ही ताबडतोब निघून या— "

मी सातच्या सुमारास कचेरींत पोंचलों. श्री. पटवर्धन यांनीं मला आपण ऐकलेली बातमी सांगितली. तोंच असोसिएटेड प्रेसचा ' डिस्पॅच ' आला. तो वाचून मी लगेच ' मृत्यु ? छे, पूर्णाहुति ' हा अग्रलेख लिहिला, त्या ' डिस्पॅच- ' चें भाषांतर तोंडीं सांगितलें आणि रात्रपाळीच्या फोरमनच्या स्वाधीन ती कॉपी करून जेवण्यासाठीं घरीं गेलों.

सौ. शांताबाई मला दारांतच भेटली. तिनें भरल्या डोळ्यांनीं माझ्याकडे पाहिलें. मी तिच्या हातीं अ. प्रे. चा 'डिस्पॅच' देऊन म्हटलें, "कोणा तरी सिंधी किंवा पंजाबी निर्वासिताचं कृत्य असावं !– "

आणि रात्रीं १२॥ वाजेपर्यंत ही माझी समजूत कायम होती. किंबहुना, अ. प्रे. च्या 'डिस्पॅच'मधील "हल्ला करणारा तरुण 'हिंदु' आहे" असें जें विधान होतें, त्याचा मराठी अनुवाद करतांना मी "हिंदु 'निर्वासित' आहे" अशी स्वतःच्या पदरची पुस्ती त्या तारेला जोडाली.

पण, रात्रीं १२॥ ला जो शेवटचा 'डिस्पॅच' आला, त्यांत हल्ला करणाऱ्या खुनी तरुणाचें वर्णन 'नाथुराम गोडसे, मराठा हिंदु' असें केलेलें होतें.

ते चार शब्द मी वाचले मात्र, माझ्या डोळ्यांपुढें अंधार पसरला, माझ्या तोंडाला कोरड पडली.

मी आवंढा गिळण्याचा प्रयत्न करून मधूला म्हटलें, "मला पाणी दे प्रथम—"

मी पाण्याचे दोन घोट घेतले. तोंपर्यंत माझ्या हातांतून गळून पडलेला डिस्पॅच घेऊन तो आमचे प्रेस मॅनेजर श्री. दादा वाचासुंदर यांनीं वाचला होता. त्यांनीं मला विचारलें, "हा नाथुराम कोण ?"

"पुण्याच्या 'अग्रणी-हिंदु राष्ट्र' दैनिकाचे संपादक— "

मी पुन्हा पाण्याचा घोट घेतला आणि म्हटलें, "फार वाईट झालं. महाराष्ट्राचं पराकाष्ठेचं नुकसान होईल या त्यांच्या कृत्यामुळं. मला सारखं वाटत होतं कोणा तरी सिंधी किंवा पंजाबी निर्वासिताचं हें क्रूर कृत्य असावं म्हणून. पण नशीब आपलं ! महाराष्ट्राचं नांव गोवलं जाणार आतां या अघोर कृत्याशीं–"

आणि माझ्या शेजारीं बसलेले माझे सहकारी श्री. सदाशिवराव गर्गे यांना मी म्हटलें, "खालून प्रूफ मागवा पहिल्या 'डिस्पॅच' चं. त्यांतले 'हिंदु निर्वासित' हे शब्द गाळले पाहिजेत आतां— "

त्यांनीं प्रूफ मागवलें. मी त्या दोन शब्दांवर काट मारला; व नवीन आलेल्या या ताज्या माहितीचा मजकूर तोंडीं सांगितला.

पण मला धाप लागल्यासारखी झाली होती. म्हणून मी आरामखुर्चीवर लेटलों आणि दादांना म्हटलें—

" मला या नांवाबद्दल खात्री वाटत नाहीं. कांहीं तरी चूक असावी. तुम्ही अ. प्रे. ला फोन करून विचारा बरं एकदा— "

त्यांनीं फोन केला आणि अ. प्रे. चे श्री. भास्करराव हस्तक यांनीं तें नांव बरोबर असल्याचें सांगितलें. पण माझें समाधान झालें नाहीं. मी स्वतः उठून त्यांच्याशीं बोललों. त्यांनीं मला तेंच नांव आलें असल्याचें सांगितलें. त्याबरोबर मी उद्गारलों, " दुर्दैव आहे आपलं ! गेली सत्तावीस वर्षे महाराष्ट्रीयांनीं महात्माजींच्या धोरणाला विरोध केला. त्या तात्त्विक विरोधाशीं आतां नाहक संबंध जोडला जाईल या भयंकर कृत्याचा ! काय झालं हें ! गोडश्यांना कल्पना नाहीं आपण महाराष्ट्राचं किती आणि कोणत्या प्रकारचं नुकसान केलं याची ! "

" पण तो खरोखरीच महाराष्ट्रीय आहे का ? हें नांव कांहीं मराठी वाटत नाहीं, " दादा मला म्हणाले.

" तें कसं सांगणार ? त्यांचा उल्लेख ' पंडित ' या पदवीनें केला जातो. तीहि पद्धत मराठी नाहीं. पण उद्यां सगळीकडे ' मराठा हिंदु ' हेच शब्द ज्याच्या त्याच्या वाचण्यांत न् ऐकण्यांत येणार ! फार नुकसान झालं महाराष्ट्राचं !— "

मी हें बोलत आहे, तोंच तुकडोजीमहाराजांचे अनुचर, नागपूर नगर कॉंग्रेसचे एक कार्यवाह, श्री. वा. गो. गावंडे हे, महाराजांच्या दोन तीन शिष्यांसह, महाराज डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्याबरोबर खास विमानानें सकाळीं दिल्लीला जाणार असल्याची बातमी द्यावयाला आले.

ते म्हणाले, " नांव कळलं ना तुम्हांला ?— "

" हो— "

" पुण्याच्या ' हिंदु राष्ट्र ' चा संपादक. सावरकरांचा सेक्रेटरी. राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा प्रमुख कार्यकर्ता आहे. तो इथं येऊन दिल्लीला गेला म्हणे !— "

" कुणाला ठाऊक ! मला कांहींच कल्पना नाहीं. पण संघाशीं त्यांचा कांहीं संबंध नव्हता, अशी समजूत आहे माझी. संघाशीं न जमल्यामुळं त्यांनीं स्वतःचं स्वतंत्र ' हिंदु राष्ट्र दल ' काढलं होतं असं ऐकलयं मी— "

" छे, छे ! तो संघाचाच मनुष्य—"

" मला वाटत नाहीं तसं. पण, कांहींहि असलं, तरी त्यांच्या या कृत्यानं महाराष्ट्राचं फार नुकसान झालं एवढं मात्र खरं—"

" संयुक्त महाराष्ट्राचाही प्रश्न मागं पडेल आतां—"

" तसं होण्याचं कांहीं कारण नाहीं. त्यांच्या या कृत्याचा न् महाराष्ट्राचा काय संबंध आहे ? आज लोक संतापाच्या भरांत महाराष्ट्राबद्दल अद्वातद्वा बोलतील कदाचित्, पण कोणाहि एका इसमाच्या वर्तनाबद्दल त्याच्या सबंध जातीला किंवा देशाला जबाबदार धरून दोष देणं अन्यायाचं होईल-"

" मग आपली रविवारची सभा होईल की नाहीं ?—"

" नाहीं. उद्यां बहुतेक शंकररावांची तार येईलच. पण, ती नाहीं आली, तरीसुद्धां मी सभा रद्द करायची ठरवली आहे—"

× × ×

पण, ती बातमी,--महाराष्ट्रांतल्या एका माणसानं गांधींजींवर गोळ्या झाडल्याची ती बातमी-माझ्या डोक्यांत सारखें थैमान घालीत होती. माझें मन होरपळून जळून गेलें होतें; व भट्टींत तापवून लाल केलेल्या लोखंडावर जसे घणाचे घाव पडावे, तसा त्या बातमीचा आघात रात्रभर सारखा माझ्या पोळलेल्या मनावर होत होता. अंकाचें काम संपवून पहांटे २ वा. घरीं आल्यावर त्या थंडींतही मी नळाचें गार गार पाणी माझ्या डोक्यावर घातलें. पण कांहीं केल्या डोळा लागेना—

शेजारच्या बँकेंतील तासाचे ठोके अंतरा अंतरानें कानांवर पडले—

तीन......चार......पांच......

त्यानंतर त्या जळजळणाऱ्या जडावलेल्या डोळ्यांवर जी सुस्ती आली, ती अगदीं चमत्कारिक स्वप्न घेऊन आली—

चापेकरबंधु, कान्हेरे, पिंगळे, राजगुरु......

—राजगुरूंशिवाय त्यांपैकीं कोणाचें मी छायाचित्र देखील पाहिलेलें नव्हतें—

पण ते पांचही जण माझ्या त्या श्रांत, संतप्त, सुस्त डोळ्यांपुढें आले......

--हातांत पिस्तुल घेतलेले गोडसे पलिकडे उभे होते--

......त्यांच्याकडे पाहून राजगुरु उद्गारले, " छे! असला विचारहि तुम्ही मनांत आणतां कामा नये......महाराष्ट्राच्या परंपरेला......आमच्या वीर-व्रताला काळिमा लागेल या कृत्यानं......आमचेहि महात्माजींशीं मतभेद होते......त्यांच्या अहिंसेवर आमची श्रद्धा नव्हती......पण म्हणून काय झालं? आततायी धृष्टद्युम्नानं आपल्या वृद्ध, निःशस्त्र, पूज्य गुरूचं ध्यानस्थ असतांना मस्तक तोडलं!......त्याहिपेक्षां क्रूर, अमानुष, गर्हणीय कृत्य ठरेल हें...... "

—हे शब्द बोलले जात असतांनाच पिस्तुलाचा बार उडाला—

आणि मी दचकून जागा झालों.

सूर्य उगवला नव्हता, पण उजाडलें होतें.

मी चूळ भरून चहा घेतला. 'तरुण भारता'चा अंक नेहमींप्रमाणें आलेला दिसला नाहीं. म्हणून छापखान्यांत गेलों. दाराशीं पोरांची भीड होती...... आवारांत जमलेले लोक अंकासाठीं गलका करीत होते......मशीनचा धडाका सुरू होता......

मी आंत जातांच प्रिंटर मला म्हणाला, "एकहि अंक शिल्लक नाहीं. आतां हें जादा प्रिंटिंग सुरू आहे— "

त्यानें मला एक शाईचे, तेलाचे डाग पडलेला मळका अंक दिला.

त्यावर नजर टाकीत मी फाटकापाशीं येतों, तों माझ्या कानांवर उद्गार पडला, " बहोत बढिया आर्टिकल लिखा है माडखोलकरजीने... "

मी मागें वळून पाहिलें...

तीन चार तरुण इसम तो अंक उत्सुकतेनें वाचीत होते.

मी बँकेसमोर येतों, तोंच मला एकानें हटकलें, " साहेब, आज आठ आण्याला विकला जातोय आपला पेपर! ही काय रीत आहे? ... "

" पण यांत आमचा काय संबंध आहे? — "

" नाहीं कसा? तुम्ही म्हणायला हवं पोरांना— "

" आतां दुसऱ्या पाळीला मी सांगतों मॅनेजरना. पण खरोखरीच आमचा कांहीं संबंध नाहीं यांत—"

"बिचारे महात्माजी मरून गेले. पण हे अखबारवाले मात्र पोळी भाजून राहिले आहेत आज आपली—"

तो वडबडत पुढें सटकला.

मी घरीं आलों, अंक काळजीपूर्वक पाहिला आणि तोंड धुण्यासाठीं न्हाणी-घरांत गेलों.

तोंच शांताबाईनें सांगितलें, "तुमचे मॅनेजर वामनराव लघाटे आले आहेत—"

म्हणून मी चूळ भरून तसाच बाहेर आलों.

मला पाहिल्यावर ते म्हणाले, "मी आतांच संघांतून आलों. आज ध्वज खालीं उतरून सम्यक् प्रार्थना झाली आमची न् महात्माजींच्या मृत्यूबद्दल शोक व्यक्त करण्यांत आला. तुम्ही सुंदर लिहिला आहे अग्रलेख. अंक फार खपला आपला. सारखी भीड आहे लोकांची. म्हणून पुन्हा प्रिंटिंग सुरू केलंय—

"हो. प्रिंटरनं सांगितलं मला. पण काल रात्रीं तें नांव वाचल्यापासून चैन नाहीं माझ्या जिवाला. या घटनेची प्रतिक्रिया काय होईल याची कल्पना करवत नाहीं. द्रोणाचार्यांच्या वधानंतर चिडलेल्या अश्वत्थाम्यानं मध्यरात्रीं पांडवांच्या शिबिरावर हल्ला करून त्यांचीं झोपेंत असलेलीं पोरंबाळं देखील कापून काढलीं, तसं सुद्धां घडेल एकादे वेळीं !—"

"पण असं का व्हावं ? एकाद्या संस्थेशीं, जातीशीं किंवा प्रांताशीं या कृत्याचा संबंध का जोडला जावा ?—"

"खरं आहे तुमचं म्हणणं. पण इतका विचार कोण करणार आहे आज ? गोळी घालणारा इसम हा ब्राह्मण होता, महाराष्ट्रांतला ब्राह्मण होता, एवढंच फक्त लक्षांत घेतील चिडलेले लोक ! आणि त्या रागाच्या भरांत सुक्याबरोबर ओलंही जळेल कदाचित्—"

"खरं आहे तुमचं म्हणणं. मग काय करावं आतां ?—"

"करणार काय ? जें काय घडेल तें मुकाट्यानं सोसलं पाहिजे. कॉंग्रेस-वाल्यांची सुद्धां एक जात आहे. त्या जातीच्या बाहेर जे जे लोक आहेत, त्यांच्या-वर प्रसंग आहे आतां ! त्या प्रसंगाला धैर्यानं तोंड दिलं पाहिजे—"

× × ×

सकाळीं १०च्या सुमारास मी उपचारासाठीं दवाखान्यांत जावयाला निघालों. बरोबर मधु होता. तो मला म्हणाला, " लोक भलभलतं बोलताहेत. ज्याच्या त्याच्या तोंडीं ' बम्मन कू काट डालो ' अशी भाषा ऐकूं येते आहे -"

" मला कल्पना आहे याची—"

आम्ही रस्त्यावर आलों, तों लोकांचे थवेच्या थवे जागोजाग उभे राहून आपसांत मोठमोठ्यानें बोलत, बडबडत होते. आम्ही अगदीं मुकाट्यानें चाललों होतों. दोघांचींही मनें आंतल्या आंत पिचून गेलीं होतीं.

आम्हीं गल्लींतून बाहेर पडून रस्त्याच्या तोंडाशीं आलों, तोंच माझ्या कानांवर आवाज आला—

" खूनका बदला खूनसे लेएंगे ! "

आणि त्याबरोबरच विकट, क्रूर हास्याचा ध्वनिहि कानांवर आदळला.

आम्ही दवाखान्यांत आलों. डॉक्टरांची मुद्रा अगदीं गंभीर होती. ते मला म्हणाले, " परिस्थिति क्षणोक्षणीं क्षुब्ध होत चालली आहे—"

" हो. बरोबर आहे तुमचं म्हणणं. पण उपाय काय त्याला ? "

" उपाय नाहीं खराच—"

ते म्हणाले. तोंच एक इसम तावातावानें आंत आला आणि जोरजोरानें हिंदींत उद्गारला," गोडसे हा सावरकरांचा सेक्रेटरी होता. राष्ट्रीय स्वयंसेवक संघवाला आहे. इथें येऊन दिल्लीला गेला—"

आम्ही तें मुकाट्यानें ऐकून घेतलें. तो गेल्यावर मी म्हटलें, " हीच भाषा आज जिथें तिथें ऐकूं येते आहे—"

मी दवाखान्यांतून परत आलों, त्या वेळीं रस्त्यांतील गर्दी वाढत चाललेली दिसली.

काँग्रेसची मोटार दुपारच्या मिरवणुकीचा आणि सायंकाळच्या सभेचा कार्यक्रम जाहीर करीत फिरत होती, ती संथपणानें घोषणा करीत गेली.

मी परत आलों, त्या वेळीं शांताबाई घरीं नव्हती. महात्माजींच्या उत्तरक्रियेचा सर्व कार्यक्रम ऐकावयाला मिळावा म्हणून पंधरा दिवसांसाठीं रेडियो भाड्यानें आणण्याचें तिनें ठरविलें. पण अपेक्षेप्रमाणें रेडियो लगेच मिळाला नाहीं. म्हणून

ती दोन्हीं मुलांसह ‘ तरुण भारत ’ कचेरींत कार्यक्रम ऐकण्यासाठीं गेली होती. तिला मी बोलावावयाला पाठविणार, तोंच कॅप्टन परांजपे आंत आले.

“ काय परिस्थिति आहे शहरांतली ? ” मी त्यांना नमस्कार करून विचारलें.

“ आतां कांहींच सांगतां येत नाहीं. मी प्रांतिक कॉंग्रेसच्या कचेरींतूनच इथें आलों—”

“ तिथं कसं वातावरण आहे ? ”

“ तिथली मंडळी बिचारी शोकानं हतबुद्ध होऊन बसली आहे. रस्त्यानं मात्र लोक ब्राम्हणांना शिव्या देताहेत सगळे ! — ”

“ हो. मीसुद्धां ऐकलं. पण यांत खरोखरी ब्राह्मण जातीचा काय संबंध ? महाराष्ट्रांतल्या सगळ्या ब्राह्मणांनीं काय सभा भरवून न् विडा देऊन गोडश्याला गांधीजींवर गोळी झाडायला दिल्लीला पाठवलं होतं ? दहा दिवसांपूर्वीं प्रार्थनेच्या वेळीं त्यांच्यावर बॉंब टाकणारा मदनलाल हा काय ब्राह्मण होता महाराष्ट्रांतला ? त्याचा प्रयत्न फसला आणि गोडश्याचा यशस्वी झाला, एवढाच काय तो फरक ! पण म्हणून एका इसमाच्या आततायीपणाबद्दल साऱ्या जातीवर राग काढण्यांत कोणता न्याय आहे ? मदनलालच्या कृत्यावरून हें उघड आहे कीं, गोडश्यानें जें कृत्य केलं, त्या कृत्याच्या मागें एक मनोवृत्ति आहे आणि ती मनोवृत्ति इतरहि प्रांतांत आहे. गोडसे हा एका मनोवृत्तीचा प्रतिनिधि आहे; कोणत्याहि विशिष्ट जातीचा किंवा प्रांताचा प्रतिनिधी नव्हे—”

“ हें सगळं खरं आहे तुमचं म्हणणं. पण आज तरी नांव घेतलं जातंय महाराष्ट्र ब्राह्मणांचं—”

‘ मला पूर्ण जाणीव आहे त्याची. पण त्याला उपाय काय ? आतां जें काय होईल, तें मुकाट्यानें सोसलं पाहिजे आपण—”

कॅ. परांजपे जातात न जातात, तोंच एक कॉंग्रेस कार्यकर्ते आंत आले आणि मला म्हणाले, “ काय भाऊसाहेब, उद्यांची सभा होत नाहीं ना ?— ”

“ हो — ”

“ ठीक. तुमचा संयुक्त महाराष्ट्र बरबाद झाला गोडश्याच्या या कृत्यामुळें ! आतां तीनशें वर्षं होत नाहीं संयुक्त महाराष्ट्र— ”

" असं ? " मी हंसून म्हटलें " गेल्या तीनशें वर्षांत शिवाजीमहाराजांचं राज्य होऊन गेलं, इंग्रजांचं राज्यही होऊन गेलं आणि आज काँग्रेसच्या रामराज्यांत आपण आहोंत. इतक्या उलथापालथी गेल्या तीन शतकांत घडल्या. १९४२ सालीं आपल्यापैकीं कोणाला तरी वाटलं होतं का हिंदुस्थान स्वतंत्र होईल पुढल्या पांच वर्षांत म्हणून ? हिंदुस्थानाच्या स्वातंत्र्यापेक्षां का संयुक्त महाराष्ट्र ही जास्त अवघड समस्या आहे ? —"

" अहो, हिंदुस्थान स्वतंत्र झालं, तें महात्माजींच्या पुण्याईनं झालं. ती पुण्याई तुमच्याजवळ आहे कां ? गेलीं सत्तावीस वर्षं तुम्हीं महाराष्ट्रांतले वर्तमानपत्रकार आणि लेखक गांधीजींवर सारखी टीका करीत आलांत त्याचं फळ आहे हें ! आतां भोगा परिणाम आपल्या कर्माचे !—"

" ते भोगूं आम्ही मुकाट्यानं. पण गांधीजींवर आम्ही केलेल्या टीकेचा आणि या कृत्याचा काय संबंध ? आणि त्यामुळं संयुक्त महाराष्ट्र का बरबाद व्हावा ?—"

" तें आज समजायचं नाहीं तुम्हांला; उद्यां भोगल्यावरच उमजेल ! आतां अशी बरसात होणार आहे कीं, डोकं वर निघायचं नाहीं पुन्हा कधीं तुमचं!—"

* * *

मी दुपारीं तीनच्या सुमारास निजून माडीवरून खालीं आलों, त्या वेळीं वातावरण थोडें निवळल्यासारखें वाटलें मला. लोकांचे थवे सायंकाळीं पटवर्धन मैदानावर असलेल्या सभेला हजर रहाण्यासाठीं रस्त्यानें रेंगाळत, बडबडत, मधून मधून घोषणाहि करीत चालले होते. पण, आभाळाच्या कभिन्न कोंपऱ्यांत वीज चमकत असली आणि मध्येंच कुठें तरी तरंगत असलेले काळे ढग अधून मधून गुरगुरत असले, तरी ऊन स्वच्छ पडलेलें असल्यामुळें वातावरण प्रसन्न भासावे, तशी सकाळच्या मानानें परिस्थिति एकंदरींत शांत वाटत होती.

शांताबाई मुलांसह रेडियोपाशीं बसून गांधीजींच्या अंत्ययात्रेचें वर्णन ऐकत होती; व बेटीच्या कडेवर असलेला तिचा मुलगा मुकुंदा रेडियोंतील प्रकाशाची दीप्ति पाहून आणि त्यांतून निघणारे आवाज ऐकून टाळ्या पिटीत खिदळत होता.

सहाच्या सुमाराला अंत्ययात्रेचें वर्णन संपलें आणि मी टपाल पहाण्यासाठीं मधुसह ऑफिसांत गेलों.

मी टपाल फोडावयाला सुरवात करणार, तोंच डॉ. पंजाबराव देशमुख यांचा फोन आल्याचें मधूनें सांगितलें. मी परिग्राहक ( रिसीव्हर ) हातांत घेऊन नमस्कार करतांच डॉक्टरसाहेबांनीं मला विचारलें, " काय भाऊसाहेब, उद्यांची सभा आहे का ?--"

" मला वाटत नाहीं होईल असं. आज शंकररावांचे सेक्रेटरी मोहन नाडकर्णी यायचे आहेत ग्रँड ट्रंकनं. ते अद्याप आलेले नाहींत. कारण ग्रँड ट्रंक लेट आहे दोन तासांनीं. ते आले, तर मी रात्रीं फोन करीन शंकररावांना. पण सभा होणार नाहीं असंच समजून चाला आपण. उद्यां सकाळीं मी नक्की कळवतों आपल्याला--"

मी परिग्राहक खालीं ठेवून पुन्हा टपाल पहावयाला बसणार, तोंच एक कॉंग्रेस पदाधिकारी आंत आले आणि म्हणाले, " काय भाऊसाहेब, उद्यांची सभा होईल का आपली ?-- "

" मला वाटत नाहीं होईल असं. परिस्थितींत इतका विलक्षण बदल झालाय कीं, आतां शंकरराव उद्यां येथें येणें आणि सभा होणें या दोन्ही गोष्टी अगदीं असंभाव्य दिसतात मला. तथापि उद्यां सकाळपर्यंत वाट पाहून मी सभा रद्द झाल्याचं जाहिर करीन-- "

" नुसती उद्यांची सभाच रद्द झाल्याचं जाहीर का करता ? संयुक्त महाराष्ट्राची चळवळच मुळीं रद्द झाल्याचं जाहीर करायलाहि हरकत नाहीं आतां—"

ते किंचित् उपरोधानें हंसून म्हणाले.

" कां बरं ? असं का म्हणतां तुम्ही ? "

" का म्हणजे ? उघड आहे अगदीं. या परिस्थितींत तुमचे शंकरराव तरी चिकटून रहातील का संयुक्त महाराष्ट्राला ? मी सभेंतून सरळच आलोंय इथं. तिथें तुमचे सगळे बडे बडे कॉंग्रेसवाले म्हणत होते, " माडखोलकर आणि त्यांचा संयुक्त महाराष्ट्र हीं दोन्हींहि गाडलीं गेलीं आज ! " नागपुरांतल्या कांहीं कॉंग्रेसवाल्यांना तर महात्माजींच्या मृत्यूच्या दुःखापेक्षां तुमचा संयुक्त महाराष्ट्र गाडला गेल्याचा आनंदच जास्त झालेला दिसला मला ! "

" असं ? ' माझा संयुक्त महाराष्ट्र ' ? कांहीं अर्थ आहे का या बोलण्याला ? संयुक्त महाराष्ट्र म्हणजे काय माझं घर आहे कीं आमचा ' तरुण भारत ' आहे ? "

" तींहि दोन्ही बरबाद होऊन जातील कदाचित् आज उद्यां--"

" तीं बरबाद झालीं, तरी दुःख नाहीं त्याचं मला पण संयुक्त महाराष्ट्र बरबाद होण्याचं काय कारण आहे ? संयुक्त महाराष्ट्र हा माझा नाहीं किंवा शंकररावांचाहि नाहीं. तो महाराष्ट्रांतल्या सगळ्या जनतेचा, सगळ्या मराठी बहुजनसमाजाचा आहे—"

" तो बहुजनसमाज आणि त्याचे म्होरके आज काय बडबडताहेत तुमच्या-विषयीं याची कल्पना नाहीं तुम्हांला, भाऊसाहेब ! तुम्हीं भले बहुजन-समाजाचा ढोल बडवीत बसा ! पण शेवटीं तुम्ही ब्राम्हण आहांत हें विसरण्या-इतकं कांहीं तुमच्या बहुजनसमाजवाद्यांचं मन मोठं नाहीं ! "

" त्यांचं मन मोठं नसलं, तर त्याबद्दल जबाबदार मी व तुम्ही आहोंत, आपण सारे ब्राम्हण लोक आहोंत, हें विसरून चालणार नाहीं. बहुजन-समाजाचं मन मोठं व्हावं, सुसंस्कृत आणि विशाल व्हावं म्हणून आपण ब्राह्मणांनीं काय केलंय ? संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाचं मूलगामी, आर्थिक आणि सामाजिक क्रांतिकारक स्वरूप बहुजनसमाजाला समजावं, म्हणून आम्हीं कितीसा प्रचार केलाय ?—"

" हें तुमचं नेहमीचं पुराण कामाला यायचं नाहीं आज ! तुमच्या बहुजन-समाजाचा सारा हमला ब्राह्मणावर आहे या वेळीं..."

" ती केवळ एक तात्पुरती हुल्लड आहे ! ब्राह्मण जातींतला एक इसम माथेफिरू न् क्रूरकर्मा निघाला म्हणून सारी ब्राह्मण जात कशी दुष्ट ठरते ? महात्माजींचे गुरु कै. ना. गोखले हे ब्राह्मण, अगदीं चित्पावन ब्राह्मण होते; व त्यांचे केवळ अपरहृदयच असे त्यांचे महान् पट्टशिष्य आचार्य विनोबाजी भावे हेहि ब्राह्मण, अगदीं चित्पावन ब्राह्मणच आहेत. काकासाहेब कालेलकर, आप्पा-साहेब पटवर्धन, गंगाधरराव देशपांडे, काकासाहेब खाडिलकर, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, शंकरराव देव, आचार्य भागवत, आचार्य जावडेकर, सानेगुरुजी वगैरे त्यांची महाराष्ट्रांतील सारी शिष्यपरंपरा ब्राह्मण जातीतलीच आहे—"

" पण आज लोकांच्या डोळ्यांना फक्त एकच ब्राह्मण दिसतो आहे आणि तो म्हणजे गोडसे ! आणि त्या एका आततायी इसमाला ते ब्राह्मणजात समजून शिव्या शाप देत सुटले आहेत; कदाचित् जाळपोळहि करीत सुटतील उद्यां. पुणें न् कोल्हापूर येथें दंगल सुरू झाल्याच्या बातम्या रेडियोवर आतांच आल्या त्या पुरे आहेत नागपूरच्या चवताळलेल्या लोकांना चिथावणी द्यायला !—"

" होय, खरी गोष्ट !—"

तितक्यांत घाईघाईनें धापा टाकीत आंत आलेला माझा एक विद्यार्थिमित्र मध्येंच उद्गारला—

" तुम्हाला कल्पना नाहीं भाऊसाहेब, लोकांत तुमच्याबद्दल कोणतं हलाहल पसरवलं जात आहे तें ! काँग्रेसचा एक पदाधिकारी ज्याला त्याला सांगतो आहे कीं, गोडसे दिल्लीला जातांना वाटेंत नागपूरला उतरला, तुम्ही त्याला आपल्या घरीं मेजवानी दिलीत न् स्टेशनवर पोंचवलंत—"

" असं ! छान ! एवढ्यावरच कां थांबले ते ? गोडश्यांनीं ज्या पिस्तुलानं गांधीजीवर गोळ्या झाडल्या, तेंहि मीच त्यांना दिलं, असंसुद्धां लोकांना सांगायला हरकत नाहीं त्या सद्गृहस्थांनीं ! आमच्या घरांत प्रांतिक रायफल असोसिएशनचं दप्तर आहे हें माहित नसावं बहुधा त्यांना ! !—"

" हेंच हेंच ! हेंच खरोखरी मी सांगायला आलों होतों भाऊसाहेब, तुम्हाला ! पण मला हिंमत झाली नाहीं. तुम्ही घरांतून अजिबात बाहेर पडूं नका चार दिवस. तुमच्या जिवाला धोका आहे—"

" माझ्या जिवाला धोका ? तो काय म्हणून ? मी काय वाईट केलंय कुणाचं ? मी अगदीं अंतर्बाह्य स्वच्छ आहे. कुणी काय वाटेल त्या कंड्या पिक-वल्या, तरी त्यांची परवा करायचं कारण नाहीं मला—"

" चुकतां आहांत तुम्ही. आज सकाळीं जो तो तारीफ करीत होता तुमच्या अग्रलेखाची आणि संध्याकाळपासून जो तो शिव्या देत सुटलाय तुम्हाला ! तुम्ही घरीं चला आधीं भाऊसाहेब—"

" हें पहा, तुम्ही असलं कांहीं सांगूं नका मला कृपा करून—"

" हें पहा, तुम्हीच कृपा करा न् मुकाट्यानं ऐका माझं. आजचा प्रसंग मामुली नाहीं. माझं तर असं सांगणं आहे तुम्हाला कीं, संयुक्त महाराष्ट्राचा प्रचारहि

तुम्ही कांहीं दिवस थांबवणं इष्ट होईल सद्यःस्थितींत ! तुमचे शंकरराव सुद्धां टिकतील या वादळांत असं वाटत नाहीं मला. ते कांहीं स्थितप्रज्ञ नाहींत महात्माजींसारखे कोणत्याहि परिस्थितींत हिमालयाप्रमाणें अचल राह्यला—"

"स्थितप्रज्ञ नसतील कदाचित्; पण स्थिरप्रज्ञ खात्रीनं आहेत. हातीं घेतलेलं कार्य सफल करायला जी निष्ठा, जो निर्धार, जो निग्रह, जी चिकाटी आणि जें चातुर्य लागतं, तें शंकररावांच्या ठिकाणीं खात्रीनं आहे. हे गुण जर त्यांच्या अंगीं नसते, तर महाराष्ट्रांतील सारा बुद्धिप्रधान, सुशिक्षित वर्ग हा कोणत्या ना कोणत्या तरी कारणांमुळें गांधीवादाच्या इतका विरुद्ध असतां, महाराष्ट्रांत काँग्रेसचं वर्चस्व त्यांना खचित स्थापन करतां आलं नसतं. महाराष्ट्रांतल्या सुशिक्षितांना रानडे, टिळक आणि गोखले यांच्या मापानं पुढाऱ्यांच्या नेतृत्वाची आणि कर्तृत्वाची उंची मोजायची संवय लागली आहे. त्यामुळं शंकररावांना साधा न्याय देणंसुद्धां शक्य होत नाहीं त्यांना. त्यांच्याइतके शंकरराव मोठे नाहींत हें कोणीहि मान्य करील. किंबहुना, जयकर, अंबेडकर किंवा सावरकर यांच्याहिपेक्षां ते कांहीं बाबतींत कमी ठरतील, हेंहि कबूल. पण, हें सगळं त्यांचें उणेपण जमेस धरूनहि तुम्हाला त्यांची निष्ठा, त्यांचा त्याग, त्यांचा करारीपणा, त्यांचा कणखरपणा, त्यांचा चिवटपणा कबूल केलाच पाहिजे. संयुक्त महाराष्ट्राचा प्रश्न त्यांनीं तळमळीनं हातीं घेतला, म्हणूनच आज इतकं पुढं पाऊल पडलंय आमच्या चळवळीचं हें नाकारून चालणार नाहीं—"

"मीहि नाकारीत नाहीं ही गोष्ट. पण, आज जें हें भयंकर धूळवादळ आपल्या भोंवतीं घोंघावतं आहे, सगळ्या महाराष्ट्रांतसुद्धां कदाचित् जें या क्षणीं घोंघावत असेल, त्यांत शंकररावांचं अवसान कितपत टिकतंय हें पाहिलं पाहिजे आतां !"

"मला शंका नाहीं त्याबद्दल मुळींच ! भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न हा कांहीं एकट्या महाराष्ट्राचा प्रश्न नाहीं; तो सगळ्या दक्षिण हिंदुस्थानाचा प्रश्न आहे. तत्व आणि व्यवहार या दोन्हीहि दृष्टींनीं तो आज निकराला आलेला आहे. असल्या तात्कालिक प्रक्षोभामुळें तो मागें पडेल असें समजणें चुकीचें आहे—"

  

" मोहन बहुतेक ग्वाल्हेरला किंवा झाशीला जाऊन परत गेला असला पाहिजे दिल्लीला–"

" मी तुम्हाला काल दुपारींच सांगितलं तो येणं शक्य नाहीं म्हणून. गांधीजींच्या मृत्यूपूर्वी तो निघालेला असला, तरी आग्र्याला ग्रँड ट्रंक पोंचल्याबरोबर बातमी कळली असेल त्याला. ती कळताक्षणींच त्यानं परत जाणं हेंच साहजिक होतं अगदीं. "

शांताबाई म्हणाली. रात्रीं अकराचा सुमार होता. आम्ही दोघें गच्चींत उभीं होतों. समोरच्या रेडिओच्या दुकानासमोर माणसांचा थवा अद्याप रेंगाळत होता; व दूर मॉडेल मिलसपर्यंत रस्त्यांत माणसें गटागटानें चर्चा करीत उभीं होती.

" आजच्या प्रेतयात्रेचं दृश्य किती विलक्षग भव्य असलं पाहिजे ! रेडियोंतल्या वर्णनावरून कांहीं कल्पना आली नाहीं त्याची—"

" टिळकांच्या प्रेतयात्रेला मी हजर होतों. सकाळीं सात पासून रात्रीं दहापर्यंत त्या दिवशीं आमचा सारा वेळ त्या प्रेतयात्रेंत गेला. ' मुक्तात्म्यां 'त वर्णन केलंय मी त्या प्रसंगाचं. पण गांधीजींचं सारंच विलक्षण ! त्यांचा मृत्यु विलक्षण, तशीच त्यांची प्रेतयात्राहि—"

" पण त्यांच्या मृत्यूच्या बाबतींतला तुमचा अंदाज अगदीं चुकला. ते नौखालींत असतांना त्यांना कांहीं तरी दगा होईल, असं सारखं तुम्हाला वाटत होतं; व ब्रह्मी मंत्रिमंडळाच्या कत्तलीपासून त्यांच्या जिवाला धोका आहे, एकादा पंजाबी किंवा सिंधी निर्वासित त्यांच्यावर हल्ला करील, असं तुम्ही म्हणत होतात. पण अखेर त्यांचा खून एका महाराष्ट्रीयाच्या हातून झाला !—"

" होय. माझा अंदाज दुर्दैवानं चुकला खराच. महाराष्ट्रांत टीकेची अत्यंत कठोर, अत्यंत विदारक प्रवृत्ति आहे ही गोष्ट खरी. पण अशा प्रकारची खुनी प्रवृत्ति असेल, असं मात्र वाटलं नव्हतं मला कधीं–"

" त्या टीकेच्या विदारक प्रवृत्तीचा आणि या खुनी प्रवृत्तीचा कांहीं संबंध नाहीं, असं वाटतं तुम्हाला ? "

" खात्रीनं ! मला माहीत आहे कीं, गांधीजी हे महाराष्ट्रीय नसल्यामुळंच केवळ त्यांच्या नेतृत्वाविरुद्ध महाराष्ट्रांतील सुशिक्षित समाजानं बंड पुकारलं, असं

समजणारे आणि म्हणणारे कांहीं गांधीभक्त महाराष्ट्रांत आहेत. पण तो त्यांचा समज खरा नाहीं. महाराष्ट्रांतील प्रमुख पत्रकारांनीं आणि लेखकांनीं गेलीं सत्तावीस वर्षें गांधीजींवर टीकेची अगदीं झोड उठविली, त्यांच्या तत्त्वज्ञानाचे आणि कार्यक्रमाचे अगदीं वाभाडे काढले, हें सगळं खरं. पण महाराष्ट्रांत अशी टीका झाली नाहीं कोणावर ? रानडे, टिळक आणि गोखले यांच्याविषयीं महाराष्ट्रांतल्या वर्तमानपत्रांनीं काय वाईट लिहायचं शिल्लक ठेवलं होतं ? केळकर, सावरकर आणि शंकरराव देव यांची किती अभद्र नालस्ती मराठी वर्तमानपत्रांतून आलेली आहे ? आमच्या जळगांवच्या परिषदेच्या वेळीं दत्तोपंत पोतदार शंकररावांवर नेहमी होणाऱ्या टीकेसंबंधीं बोलतांना म्हणाले होते, "हें महाराष्ट्राचं एक वैशिष्ट्य आहे. टीकेच्या अग्निदिव्यांतून तावून सुलाखून निघाल्याशिवाय आम्ही कोणाचंच पुढारीपण प्रमाण मानायला तयार होत नाहीं कधीं. कोणतीहि गोष्ट केवळ श्रद्धेनं प्रमाण मानणं हे महाराष्ट्राच्या स्वभावांतच मुळी नाहीं. ही टीकेची, लोकनिंदेची आणि लोकच्छळाची परंपरा ज्ञानेश्वरापासून चालत आलेली आहे; व एकनाथ आणि तुकाराम यांच्यासारख्या शांतिब्रह्मांचंसुद्धां सत्त्व तिच्यामुळं कसाला लागलेलं आहे. त्या टीकेला भिऊन, तिच्याविरुद्ध तक्रार करून कसं चालेल ? त्या जलाल टीकेच्या भट्टींतून जो जास्त उजळ होऊन बाहेर पडेल, तोच खरा तत्वज्ञ, खरा पुढारी, खरा सुधारक, खरा समाजसेवक, खरा ग्रंथकार आणि खरा संशोधक ! लोकहितवादी, जोतिबा फुले, चिपळूणकर, रानडे, आगरकर, टिळक, कर्वे, राजवाडे, शिंदे हे सारे टीकेचे आघात अंगावर झेलून मोठे झाले.तोच प्रकार आज शंकररावांचा चालला आहे !" दत्तोपंतांची ही मीमांसा अगदीं बरोबर आहे. गांधीजी हे महाराष्ट्रीय नव्हते म्हणून त्यांच्यावर महाराष्ट्रांतील सुशिक्षितांनीं टीकेचं हत्यार धरलं असा आरोप जे करतात त्यांना महाराष्ट्राचा हा स्वभाव, त्याची ही प्रकृति आणि परंपरा कळली नाहीं, असंच खरोखरी म्हटलं पाहिजे. पण, एकाद्या नेत्याच्या व्यक्तित्वाची, तत्वज्ञानाची किंवा कार्यक्रमाची विदारणा करणें वेगळें आणि त्याचा खून करणें वेगळें ! एखाद्याचा खून केल्यानं त्याचं तत्वज्ञान किंवा पक्ष आपण नष्ट करूं शकूं असं जो माथेफिरू समजतो, तो मूर्खच म्हटला पाहिजे. से. ऑँग सॅन यांची त्यांच्या सहकारी मंत्र्यांसह कत्तल होऊनहि त्यांचा पक्ष आज ब्रह्मदेशांत अधिकारारूढ आहेच ना ? गांधीजींचा खून केल्यानं

गांधीवादाचा कांहीं खून होऊं शकत नाहीं. नाहीं तर ख्रिस्ताला सुळावर चढ-विल्याबरोबरच ख्रिस्ती धर्माचाहि ग्रंथ समाप्त झाला असता !–"

मी हें बोलत असतांनाच समोरून भर्रकन दगड आला आणि तो माझ्या अंगावरून निसटून भिंतीवर आदळला. त्याबरोबर शांताबाई मला म्हणाली, "आंत जाऊं या आपण ! नाहीं तर कपाळमोक्षच व्हायचा एकादे वेळीं—"

आम्ही आंत आल्यावर ती मला म्हणाली "आतां शांतता दिसतेय खरी. पण एकंदरींत लक्षण कांहीं ठीक नाहीं. त्यांतून आणखी दोन दिवस हा हरताळ चालणार आहे म्हणे ! आजचा दिवस बरा गेला. पण उद्यां काय होईल कोण जाणें--"

"कांहीं का होईना ! जें काय होईल त्याच्यासाठीं मन तयार ठेवलं पाहिजे आपण. तुला आठवतं ? १९४२ च्या ऑगस्टमध्यें त्या दंगलीच्या रात्रीं आपण दोघं असेच गच्चींत उभे होतों. आणि गस्त घालणाऱ्या सोजिरानं संशयानं गोळी झाडली, ती आपल्या अंगावरून सणसणत जाऊन पलिकडच्या घरावर आद-ळली ! तेव्हां मी तुला म्हटलं होतं कीं, हिंदुस्थानांतला शांततेचा काळ आतां संपला म्हणून—"

"होय पण तेव्हां स्वातंत्र्याचा लढा चालू होता. आता आपण स्वतंत्र झालेलों असल्यामुळं अशांतता माजण्याचं कांहीं कारण दिसत नाहीं—"

"कारण नाहीं कसं ? आतांच अशांतता माजण्याची खरीं कारणं डोकं वर काढतील एकामागून एक ! स्वराज्याचा लढा ज्या क्षणीं संपला, त्याच क्षणीं सत्तेचा लढा, सत्ता काबीज करण्याचा लढा सुरू झाला ! वाटल्यास स्वराज्याचा लढा संपला न् सुराज्याचा सुरू झाला असं म्हणूं या ! कॉंग्रेस, महासभा, सोशॅलिस्ट, कम्युनिस्ट वगैरे साऱ्या पक्षांचा आग्रह असा आहे कीं, फक्त आमचा कार्यक्रम हाच देशाच्या कल्याणाचा कार्यक्रम आहे ; व म्हणून देशाचें कल्याण करण्याच्या सोज्वळ हेतूनं आपला कार्यक्रम अंमलांत आणण्याकरितां प्रत्येक पक्ष यापुढें सत्ता स्वतःच्या हातीं घेण्यासाठीं झगडणार ! गांधीजींचा खून हा या सत्तेसाठीं निरनिराळया पक्षोपपक्षांत सुरू झालेल्या झगड्याचा आरंभ म्हणजेच आजपर्यंतच्या शांततेचा अंत आहे—"

" पण या अंतर्गत झगडयामुळं आपली शक्ति क्षीण होऊन पाकिस्तानच्या आक्रमणाचें संकट बळावणार नाहीं का ? –"

"बळावेल. पण त्याला उपाय काय? आजच पहा ना! आपण इकडे गांधीजीं-साठीं शोक करीत आहोंत आणि तिकडे यूनोंत काश्मिरच्या नाकाशीं सूत धरलं आहे! गांधीजींचा देहांत म्हणजे हिंदुस्थानांतील शांततेच्या युगाचा अंत आहे. गांधी ही एकच अशी कर्तुमकर्तुम्, सर्वातिशायी, सर्वंकष साम-शक्ति हिंदुस्थानांत होती कीं, जी सर्व विरोधी प्रवृत्तींना आपल्या कह्यांत ठेवून समन्वयाच्या तत्त्वावर स्वतंत्र भारताच्या राज्यकारभाराची घडी बसवण्याचा प्रयत्न करीत होती. आणि त्या प्रयत्नांत तिला थोडेंबहुत यशहि कांहीं काळ आलें असतें. पण ती केंद्रीय साम-शक्ति नष्ट झाल्यामुळें आतां तिनें आजपर्यंत आवरून धरलेल्या साऱ्या परस्परविरोधी प्रवृत्ति, प्रेरणा आणि सामर्थ्यें मोकाट सुटतील आणि एकमेकांच्या उरावर बसतील! म्हणूनच मी म्हणतों कीं, आजपासून शांततेचं युग संपलं. यापुढें सत्ता काबीज करण्यासाठीं जी यादवी सतत चालू रहाणार, तींत सर्व प्रकारच्या विध्वंसाला आणि विनाशाला तयार राहिलं पाहिजे आपण!—"

* * *

" वही है– "

तो उद्गार ऐकतांच मी चमकून मागें पाहिलें. ठेल्यापाशीं उभे असलेले तीन जवान माझ्याकडे रोखून पहात आपसांत बोलत होते.

रविवारची सकाळ शांततेनें उजाडल्यासारखी मला वाटली. म्हणून, घरांतून बाहेर न पडण्याचा सल्ला जरी मला अनेकांनीं दिला होता, तरी मी नवाच्या सुमारास नेहमींप्रमाणें दवाखान्यांत जावयाला निघालों. मी रस्त्यावर गेलों, तोंच हा उद्गार आमच्या कानांवर आदळला.

मधु मला म्हणाला, " भाऊसाहेब, तुम्हांला धोका आहे. आपण आतां दवाखान्यांतून परत आलों म्हणजे तुम्ही घरांतून हलूं नका अगदीं–"

" घरांत बसून राहिल्यानं धोका कमी होईल असं वाटतं का तुला? चुकीची समजूत आहे तुझी, मधु! ज्यांना माझ्यावर या संधीचा फायदा घेऊन हात टाकायचाय, ते घरांत घुसूनहि टाकल्याशिवाय रहाणार नाहींत--"

आम्हीं दवाखान्यांत गेलों, तेव्हां डॉक्टरसाहेबांनीं आमचें अत्यंत चिंता-ग्रस्त मुद्रेनें स्वागत केलें. त्यांनीं मला लगेच उपचारार्थ आंतल्या खोलींत नेलें आणि जखम धूत असतांनाच ते मला म्हणाले, " भाऊसाहेब, तुम्हीं चार दिवस दवाखान्यांत येऊं नका—"

" का बरं ?—"

" मी सांगतों, तें तुम्हीं मुकाट्यानं ऐका. शहरांत तुमच्यासंबंधानं भल-भलत्या कंड्या पसरवण्यांत आलेल्या आहेत आणि त्यामुळं तुमच्याविरुद्ध लोकमत खवळलं आहे—"

" मला जाणीव आहे या सगळ्या गोष्टींची. मी गोडशांना आपल्या घरीं जेवायला बोलावलं न् स्टेशनवर पोचवून दिलं, असा प्रचार सुरू आहे एवढंच कीं नाहीं ? मला कालच कळलं हें. पण मी भीक घालणार नाहीं असल्या कंड्यांना. माझा कुठंहि कांहीं संबंध नाहीं, मी अगदीं अंतर्बाह्य स्वच्छ आहे, हें माहित आहे मला. मग मी का म्हणून भ्यावें असल्या गांवगप्पांना ?—"

पण डॉक्टरांना माझें हें म्हणणें पटलेलें दिसलें नाहीं. त्यांचा निरोप घेऊन मी बाहेर पडतों न पडतों, तोंच एक कॉंग्रेस कार्यकर्ते मला भेटले; व त्यांनीं मला एका बाजूला नेऊन कांहीं गोष्टी सांगितल्या.

त्यांनीं सांगितलेली माहिती आणि केलेल्या धोक्याच्या सूचना इतक्या गंभीर होत्या व त्यांचें कॉंग्रेस संस्थेंतील स्थानहि इतकें अधिकाराचें होतें कीं, त्यांनीं दिलेल्या माहितीचा विचार केल्याशिवाय मला गत्यंतर नव्हतें. म्हणून मी घरीं न जातां तडक ' तरुण भारत ' कचेरींत गेलों.

तेथें श्री. पटवर्धन, श्री. लघाटे, श्री. गर्गे प्रभृति माझे सहकारी बसलेले होते. मी प्रथम डॉ. पंजाबराव देशमुख यांना फोन करून आज भरणार असलेली संयुक्त महाराष्ट्र परिषदेची सभा रद्द केली असल्याचें कळविलें; व नंतर दुसरा फोन 'महाराष्ट्र'चे सहसंपादक श्री. वि. ल. उळाभाजे यांना केला.

त्यांनीं फोन घेतांच मी त्यांना म्हटलें, " बाबुराव, तुम्हीं ताबडतोब इथं या — "

" मी आणखी अर्ध्या तासानं येतों. आर्टिकल लिहितोंय, तें संपवून येतों—"

" छे, छे ! अगदीं ताबडतोब या. अर्धे वाक्य लिहिलेलें असेल, तर तें पुरं न करतांच या. काम तसंच महत्त्वाचं असल्याशिवाय कांहीं मी हें म्हणत नाहीं आहे तुम्हाला— "

आणि त्यांनीं येण्याचें कबूल करतांच मी फोन खालीं ठेवला.

ते आल्यावर मी त्यांना म्हटलें, " मला जी माहिती आतांच कळली ती तुमच्या कानांवर ताबडतोब घालून तुम्हांला सावध करण्यासाठीं मीं इतक्या तातडीनें फोन केला. मला असं सांगण्यांत आलंय कीं, ' तरुण भारत ' कचेरी, माझं घर, 'महाराष्ट्र' कचेरी, डॉ. परांजपे यांचें इस्पितळ, संघस्थान, गुरुजींचं घर वगैरे इमारती लुटण्यांत आणि शक्य तर जाळण्यांतहि येतील. आमच्या-पैकीं कांहींच्या जिवालाहि धोका आहे. याद्या तयार झाल्या आहेत आणि त्यांत आपलीं कांहीं जणांचीं नांवं आहेत— "

" मला कल्पना आहे असं कांहीं सुरू असल्याची. पण तुम्ही सांगतां तितकी निश्चित माहिती मला नव्हती— "

" तुम्ही प्रथम नाना ओगले आणि डॉ. परांजपे यांच्या कानांवर हें सगळं घाला. डॉक्टरसाहेबांना शक्य असेल तर त्यांनीं पं. मिश्रजींना फोन करावा या बाबतींत असं वाटतं मला. तुम्हीं सांगून पहा त्यांना— "

" मी करतों सगळं कांहीं. पण, तुम्हाला जर इतकं नक्की कळलंय, तर तुम्हीं पोलिस प्रोटेक्शन कां नाहीं मागत ? "

" मला इच्छा नाहीं पोलिसांचं संरक्षण मागण्याची. मी सरकारचा टीकाकार आहे. तेव्हां या प्रसंगीं त्यांच्यापुढं तोंड वेंगाडावं असं वाटत नाहीं मला-- "

" तुम्हीं सरकारचे टीकाकार असलांत म्हणून काय झालं ? तुम्हीं नागरिक आहांत आणि कर भरता आहांत. तेव्हां संरक्षण मागण्याचा हक्क आहे तुम्हांला-- "

" असेल. पण मला इच्छा नाहीं संरक्षण मागण्याची. जें काय होईल तें मुकाट्यानं सोसायचं ठरवलंय मी. गोडसे नागपुरांत येऊन गेले, ' महाराष्ट्र ' आणि ' तरुण भारत ' कचेऱ्यांना त्यांनीं भेट दिली, मी त्यांना स्टेशनवर पोचवलं वगैरे ज्या कंड्या फैलावण्यांत येत आहेत, त्यांनाहि आळा घातला पाहिजे आपण-- "

" मला वाटतं, आपण त्या बाबतींत अगदीं गप्प बसावं. कारण तुम्ही या कंड्यांचा इनकार करायला लागलांत, तर त्या जास्तच चिकटतील तुम्हांला आणि तुमच्याविषयीचा संशय मात्र वाढेल- "

श्री. पटवर्धन म्हणाले. त्यांचा हा सल्ला आम्हांला पटला; व श्री. उळा-भाजे परत गेले.

मीहि घरीं गेलों. गेल्याबरोबर शांताबाईनें डॉक्टरांची चिठी मला दिली. सकाळीं दवाखान्यांत उपचार करतांना त्यांनीं तीन चार दिवस घराबाहेर न पडण्याची जी सूचना मला समक्ष केली होती, तीच पुन्हा या चिठींतहि आग्रहानें केलेली होती.

ती चिठी मला देऊन शांताबाईनें विचारलें, " खरंच इतका धोका आहे का तुमच्या जिवाला ?--"

" काय सांगणार ? पण, आज जो भेटतोय, तो हें मला सांगतोय, एवढं मात्र खरं--"

" मग तुम्ही पोलीस प्रोटेक्शन तरी मागा—"

" उळाभाज्यांनींहि आतां तेंच सुचवलं होतं मला. पण मी सरकार जवळ संरक्षण मागायचं नाहीं असं ठरवलंय. काय होईल तें मुकाट्यानं सोसूं--"

" मला हें पटत नाहीं तुमचं म्हणणं. प्रत्येक नागरिकाला संरक्षण मागा-यचा हक्क आहे आणि सरकारहि नागरिकांना संरक्षण देण्यांत कांहीं उपकार करीत नाहीं त्यांच्यावर—"

" तें मलाहि समजतं. पण मी संरक्षण मागायचं नाहीं असं ठरवलंय आणि आतां त्या बाबतींत कोणाचंहि कांहीं मी ऐकणार नाहीं—"

एवढें बोलून मी स्नानाला गेलों; व त्या सचिंत, अस्वस्थ मनःस्थितींतच आम्ही जेवणें उरकून घेतलीं.

मी जेवून उठतो, तोंच श्री. लघाटे आले आणि मला म्हणाले, " आपल्या समोरचं ' आदेश ' ऑफिस आतांच फोडून त्यांतल्या सामानाची नासधूस करण्यांत आली. मी फोन केला लगेच कोतवालींत. आतां लॅरी आलेली अस-ल्यामुळं शांत आहे थोडंसं--"

" तुम्ही जाण्यापूर्वी बँकेच्या गार्ड्स्ना सांगून ठेवा आपल्या प्रेसकडे लक्ष द्यायला—"

मी त्यांना सूचना केली आणि म्हटलें, " आपण उद्यां अंक काढायचा ठरवलाय खरा. पण रात्रीं लोक कामावर येतील कीं नाहीं याबद्दल शंका वाटते मला—"

" नाहीं आले, तर राह्यलं. पण मघांशी कबूल करून गेले आहेत आपले फोरमन–"

" ठीक आहे. पण संध्याकाळीं सभा आहे विद्यार्थि कॉंग्रेसतर्फे. त्यानंतर काय परिस्थिति उत्पन्न होईल सांगतां येत नाहीं—"

* * *

दुपारीं निजून उठल्यावर मी चहा पिण्यासाठीं खालीं येतो, तों मधु, भास्कर, प्रभाकर आणि मधु माझी वाट पाहात बसलेले होते.

शांताबाईनें लगेच चहा आणला. तो घेत असतांना मी विचारलें, " आज कांहीं विशेष बातमी ? "

" बातमी फार वाईट आहे. विशेषतः तुमच्याबद्दल—"

" मी तर इथं बसून चहा पितोय तुमच्याबरोबर. मग माझ्याबद्दल तुम्ही वाईट काय सांगणार आहांत मला ?—"

" आतां चहा पीत असाल, पण रात्रीं काय होईल तें सांगतां येणार नाहीं—"

" पण कांहीं अंदाज ?–"

" अंदाज एवढाच कीं, रात्रीं कदाचित् घर जाळलं जाईल—"

" आम्ही निजलेलों असतांना ? बाकी कल्पना छान आहे. ज्या स्वत:च्या घरांत दहा वर्षे आनंदानं काढलीं त्याचीच अखेर चिता व्हावी, हा योग कांहीं कमी भाग्याचा नाहीं—"

मी हंसून म्हटलें. पण शांताबाईला स्वस्थ बसवलें नाहीं. तिनें विचारलें, " आमचं घर काय म्हणून जाळणार ? ' तरुण भारत ' वर कॉंग्रेस-वाल्यांचा राग असावा व या संधीचा फायदा घेऊन त्याच्यावर सूड उगवण्याचं त्यांनीं मनांत आणावं, हें समजूं शकतें मी. पण आमचं घर म्हणजे कांहीं ' तरुण भारत ' कचेरी नव्हे तें सूडबुद्धीनं जाळायला— "

" इतका फरक लोक करीत नाहींत, बाई ! ' तरुण भारत ' आणि माडखोलकर एकच समजतात ते— "

" आणि ती त्यांची समजूत चूक नाहीं मुळींच. मला या सगळ्या कल्पनांचा आणि कृत्यांचा अर्थ समजूं शकतो-- "

" तुम्ही म्हणतां तेंच बरोबर आहे, भाऊसाहेब. 'तरुण भारत' हा काँग्रेस-विरोधी आणि गांधीविरोधी पेपर आहे, म्हणून तो पेपर आणि त्याचा संपादक यांचा नाश केला पाहिजे, असा प्रचार आज उघड उघड चालू आहे— "

" पण आम्ही काँग्रेसविरोधी नाहीं. गेलीं सत्तावीस वर्षें प्रत्येक निवडणुकींत आम्ही दोघं निष्ठेनं काँग्रेसला मतं देत आलों आहोंत. यांना काँग्रेसचें धोरण कांहीं बाबतींत मान्य नाहीं आणि गांधीवादहि मान्य नाहीं. पण काँग्रेसच्या धोरणांतील दोष दाखविणें, त्या धोरणांत बदल घडवून आणण्याच्या दृष्टीनें त्यावर टीका करणें म्हणजे कांहीं काँग्रेसविरोध नव्हे. हे कोणत्याहि काँग्रेसविरोधी किंवा अन्य पक्षाचे सभासद कधीं झाले नाहींत. १९३६ पर्यंत काँग्रेसचेच सभासद होते; १९३० च्या चळवळींत तुरुंगांतहि जाऊन आले. कम्युनिस्ट पक्षाकडे यांचा कल आहे हे खरे. पण, १९४२ च्या चळवळींत त्या पक्षानें काँग्रेसच्या बाबतींत ज्या प्रतिकूल धोरणाचा अवलंब केला, त्यावरहि यांनीं कडक टीका केलेली आहे— "

" हें जें तुम्ही सगळं सांगतां आहांत ना बाई, त्याच्याशीं आज चिडलेल्या लोकांना कांहीं कर्तव्य नाहीं. ' तरुण भारत ' हें काँग्रेसविरोधी पत्र आहे असं सारखं ते ऐकत आलेले आहेत. त्यांतच गोडसे तुमच्या घरीं जेवला आणि यांनीं त्याला स्टेशनवर पोंचवला, अशी दुष्ट कंडी कांहीं काँग्रेस पदाधिकाऱ्यांकडून मुद्दाम फैलावली जात आहे —"

" तें धादांत खोटं आहे. मी या घटकेपर्यंत गोडसे काळा कीं गोरा आहे, हें पाहिलेलं नाहीं. पण काँग्रेसविरोध म्हणजे काय ? काँग्रेसच्या धोरणावर किंवा गांधीवादावर टीका करणें म्हणजे काय काँग्रेसविरोध होतो ? —"

" हो. नुसता काँग्रेसविरोध नव्हे तर काँग्रेसद्रोह ! नागपुरांतले कांहीं काँग्रेसवाले आणि त्यांचीं पत्रें मला आणि ' तरुण भारता'ला जीं काँग्रेस-द्रोही म्हणून लेखतात, तीं काँग्रेसचें धोरण आणि गांधीवाद यांच्यावर जी

कांहीं बाबतींत मी टीका करतों, त्या टीकेमुळें! पण मला या निंदेचं दुःख नाहीं. गेलीं चोवीस वर्षें काँग्रेस किंवा गांधीवाद यांच्या टीकाकाराची जी भूमिका मी जाणूनबुजून घेतलेली आहे, ती काँग्रेसविषयींचा निष्ठेमुळें; ती एकच संस्था देशाचें नेतृत्व करूं शकते, या जाणिवेमुळेंच होय! गांधीवाद मला मान्य नाहीं, तोही समाजवाद मला मान्य आहे म्हणून; व गांधीजींच्या हातीं जोंपर्यंत काँग्रेसचीं सूत्रें आहेत, तोंपर्यंत काँग्रेस गांधीवादी राहील, समाजवादी होऊं शकणार नाहीं, अशी बालंबाल खात्री झालेली असल्यामुळेंच गांधीवादाला विरोध करण्याची भूमिका मला घ्यावी लागली. मी केळकरांचा राजकीय अनुयायी कधीं नव्हतों; प्रतिसहकारवादी नव्हतों किंवा महासभावादीहि नव्हतों. काँग्रेसच्या धोरणांतील किंवा गांधीवादांतील जो भाग मला ज्या वेळीं ग्राह्य वाटला, त्या वेळीं त्याचाहि पुरस्कार मी उत्साहानें केलेला आहे. पण तत्त्वतः आणि मूलतः गांधीवाद मला मान्य नसल्यामुळेंच गेलीं चोवीस वर्षें त्याच्यावर टीका करणें मला भाग पडत आलें आहे. त्या टीकेचें प्रायश्चित्त जर मला माझा स्वतःचा किंवा आमच्या घराचा नाश होऊन भोगावें लागणार असेल, तर त्यालाहि माझ्या मनाची तयारी आहे. चोवीस वर्षांपूर्वी पूर्ण विचारांतीं जाणूनबुजून लोकप्रिय पक्षाविरुद्ध सतत उभें राहून प्रचार करण्याची जी भूमिका मी पत्करली, तिच्याबद्दल जर आजचा तात्कालिक, अविवेकी, दुष्टाव्यानें डिंवचलेला लोकक्षोभ माझा नाश करणार असेल, तर तो नाश मला आनंदानें सहन केला पाहिजे--"

"पण भाऊसाहेब, तुम्हांला जर गांधीवाद मान्य नाहीं आणि समाजवाद मान्य आहे, तर तुम्ही सोशॅलिस्ट किंवा कम्युनिस्ट पक्षाचे सभासद कां झ.ला नाहींत? आज तें लेबल तुम्हाला वाचवायला उपयोगी पडलं असतं--"

"तूं लहान मुलासारखं बोलतो आहेस खरोखरी! मी तत्त्वतः समाजवादी, खरं बोलायचं म्हणजे मार्क्सवादी, असलों, तरी माझी मनोवृत्ति आध्यात्मिक आहे. कम्युनिझममधील राजकीय आणि आर्थिक तत्वज्ञान, मानवेतिहासाची कम्युनिस्ट तत्वज्ञान्यांनीं लावलेली संगति आणि सामाजिक पुनर्घटनेचा त्यांचा कार्यक्रम हें सगळं मला बव्हंशीं मान्य आहे. पण ते अध्यात्म मानीत नाहींत, मी मानतो. कदाचित् ज्या वैदिक पंडित परंपरेच्या घराण्यांत माझा जन्म

झाला, त्याच्या संस्कारांचे अवशेष असतील हे! पण मी स्वभावतः अध्यात्म-वादी आहे आणि त्यामुळें कम्युनिस्ट पक्षांत मला स्थान नाहीं. शिवाय, रशियाच्या तंत्रानं चालण्याचं कम्युनिस्ट पक्षाचं जें धोरण आहे, तेंहि हिंदुस्थानाच्या हितसंबंधांच्या दृष्टीनं अनिष्ट वाटतं मला. रशियानें संक्रमणकालापुरती म्हणून पत्करलेली वर्गीय हुकूमशाहीहि मला मान्य नाहीं. मानवी व्यक्तित्त्वाच्या आणि स्वतंत्रप्रज्ञतेच्या विकासाला ती हुकूमशाही मारक आहे अशी माझी खात्री झाली आहे रशियांतील राज्यनीतीचें अरेरावी स्वरूप पाहून. विशेषतः, जनतेची बुद्धि जागृत ठेवण्याची जबाबदारी ज्यांनीं आपल्या शिरावर घेतली आहे, तीं वृत्तपत्रें आणि वृत्तपत्रकार यांनीं कोणत्याहि पक्षाच्या किंवा वर्गाच्या अशा प्रकारच्या हुकूमशाहीला मान तुकवणं म्हणजे विचारस्वातंत्र्य आणि मुद्रणस्वातंत्र्य यांचा बळी देणं आहे असंच मी समजतों. कोणत्याहि पक्षांत सामील व्हायचं म्हणजे त्याची शिस्त, तात्विक आणि व्यावहारिक दोन्हीहि प्रकारची शिस्त, पाळावी लागते. ती पाळावयाला अनुकूल अशी माझी मनोवृत्ति नाहीं; व वृत्तपत्रकार या नात्यानंही ती शिस्त पाळणं हें मला, विचारस्वातंत्र्याच्या दृष्टीनें, घातुक वाटतें. म्हणून, पत्रकार हा कोणत्याहि पक्षाचा सभासद असतां कामा नये, अशी माझी भावना झालेली आहे. कांग्रेसचं सदस्यत्वहि खरोखरी याच कारणांमुळं मी सोडलं. १९३४ च्या निवडणुकीच्या वेळीं माझ्या असं अनुभवाला आलं कीं, कांग्रेसवाल्यांची सुद्धां एक जात बनूं पाहात आहे. आणि ती राजकीय जात हिंदुस्थानांतील धार्मिक जातींप्रमाणेंच अत्यंत कर्मठ, अत्यंत अनुदार, अत्यंत दांभिक होऊं घातली आहे. गांधीवादानं त्या राजकीय जातीच्या मागें लावलेलं कर्मकांड बुद्धिग्राह्य नाहीं आणि प्रामाणिकपणानें आचरण्यासारखंहि नाहीं. म्हणून मी त्या जातींतून बाहेर पडून स्वेच्छेनें बहिष्कृत होण्याचा धोका पत्करला-- ”

“ मला वाटतं, याला तुमचा महाराष्ट्राविषयींचा अभिमान, ‘महाराष्ट्रीयत्वा-विषयींचा अहंकार ’ कारण झाला असावा--”

“ असेलहि कदाचित्. आपल्या सुप्त, अंतर्मनाच्या व्यापारांबद्दल कोणी ग्वाही द्यावी? सगळ्या भरतखंडांत महाराष्ट्र हें बुद्धियोगी व म्हणून स्वतंत्रप्रज्ञ राष्ट्रक आहे अशी माझी श्रद्धा असून, त्याची प्रकृति, संस्कृति आणि नियति यांच्यावर माझी अनन्य निष्ठा आहे. हिंदुस्थानाच्या इतिहासांत त्यानें पूर्वी विशेष

कार्य केलेलें आहे आणि त्याला पुढेंहि विशेष कार्य करावयाचें आहे, अशी माझी भावना आहे. या श्रद्धेला, निष्ठेला आणि भावनेला जर ' महाराष्ट्रीयत्वाविषयींचा अहंकार ' असं नांव तुला द्यायचं असेल, तर त्याला माझी ना नाहीं--"

" पण हा अहंकार चांगला आहे का ? "

" जोंपर्यंत हा अहंकार आक्रमक स्वरूप धारण करीत नाहीं, तोंपर्यंत तो चांगलाच म्हटला पाहिजे. कारण तो अहंकार म्हणजेच खरोखरी त्या त्या राष्ट्रकाची अस्मिता, त्या त्या राष्ट्रकाला असलेली आपल्या पृथगात्मतेची जाणीव, त्या त्या राष्ट्रकाचा आत्मप्रत्यय ! आणि हा राष्ट्रीय अहंकार नाहीं कोणाला ? मी तर केवळ एक पत्रकार, मर्यादित क्षेत्रांत काम करणारा मर्यादित शक्तीचा माणूस. पण अरविंद घोष आणि गांधीजी यांच्यासारखे योगी आणि महात्मे हे तरी या अहंकारापासून अलिप्त आहेत काय ? गांधीजींचा अहिंसाधर्म हा गुजरातमधील जैन आणि वैष्णव संस्कारांच्या त्यांच्यावर झालेल्या प्रभावाचा परिपाक आहे किंवा अरविंदांचा भक्तियोग ही बंगालमधील चैतन्यदेवांच्या संप्रदायाची प्रक्रिया आहे असें म्हटल्यास त्यांत कोणती चूक होईल ? बंगाल हिंदुस्थानाला आत्मोन्नतीचा मार्ग दाखवील असं जेव्हां अरविंद घोष म्हणतात किंवा गुजरातनें अहिंसेचा आदर्श हिंदुस्थानापुढें ठेवला पाहिजे असा आदेश जेव्हां गांधीजी गुजराती जनतेला देतात, तेव्हां त्यांच्या त्या उद्गारांतून प्रकट होणाऱ्या प्रादेशिक अहंकाराला तूं कोणतें नांव देशील ? त्या बड्यांचा तो ' अहंकार ' जर योग्य असेल, तर माझ्यासारख्या छोट्याच्या ' अहंकारा 'ला तूं का नांवं ठेवावीस ? गांधीजींचं महागुजरातचं स्वप्न आणि आमचं संयुक्त महाराष्ट्राचं स्वप्न यांत खरोखरी काय फरक आहे ? अगदीं स्वतःपुरतंच बोलायचं, तर संयुक्त महाराष्ट्राच्या घोषणेच्या मागं तो ' अहंकार ' आहे असं म्हणायला मला यत्किंचित्‌हि शंका किंवा संकोच वाटत नाहीं. पण हा ' अहंकार ' असल्याशिवाय कोणतीहि जाती, कोणताहि समाज किंवा कोणतंहि राष्ट्र जगूं शकत नाहीं आणि वाढूंहि शकत नाहीं. हा ' अहंकार ' म्हणजेच खरोखरी जीवन ! कारण आत्माविष्काराची सारी प्रेरणा आणि स्फूर्ति या अहंकारांतच असते. फक्त तो आक्रमक आणि अपहारक नसावा म्हणजे झालं. महाराष्ट्राच्या साऱ्या भूमीवर मराठी जनतेची सार्वभौम सत्ता स्थापन

व्हावी, असं म्हणण्यांत कोणती चूक, कोणता दोष आहे? गांधीजींच्या महा-गुजरातच्या स्वप्नांत जर ' प्रादेशिक जातीयता ' ( Territorial Communalism ) आणि ' आक्रमक प्रांतीयता ' ( Aggressive Provincialism ) नसेल, तर ती आमच्या संयुक्त महाराष्ट्राच्या स्वप्नांत कां दिसावी?—"

" दिसते याला कारण आहे. आणि तें कारण म्हणजे महाराष्ट्राचा गेल्या तीनशें वर्षांचा इतिहास! तुम्हाला आठवतं का? तुम्ही बेळगांवला संयुक्त महाराष्ट्राची घोषणा केल्यानंतर श्री. अच्युतराव पटवर्धन यांनीं नगरला जें भाषण महाराष्ट्र एकीकरणाच्या प्रश्नासंबंधीं केलं, त्यांत या तुमच्या चळवळीला मुलूखगिरीचं स्वरूप येता कामा नये, असा इषारा त्यांनीं दिला होता—"

" हो. मला चांगला आठवतो त्यांचा तो इषारा! स्वतःकडे साऱ्या राजकीय औदार्याचा, दूरदर्शित्वाचा, पुरोगामितेचा आणि शहाणपणाचा मक्ता घेऊन ही जी कोपरखळी अच्युतरावजींनीं उगाचच आम्हांला दिली होती, ती मी विसरलेलों नाहीं अद्याप! त्यांना त्याच वेळीं चांगलं झणझणीत उत्तर द्याव असं मनांत आलं होतं माझ्या. पण ' सर्वेषामविरोधेन ' या धोरणाचं जें बंधन शंकररावांनीं आमच्या चळवळीला घातलेलं आहे, त्याच्या जाणिवेमुळें गप्प बसलों मी. जगांत कोणीहि कोणावर कोणत्याहि प्रकारचं आक्रमण करण्याचा काळ आतां उरलेला नाहीं, हें न समजण्याइतके का आम्ही नादान आहोंत? मराठ्यांचा गेल्या तीन शतकांचा इतिहास मुलूखगिरीचा आहे हें खरें. पण तसा इतिहास नाहीं कोणत्या पराक्रमी राष्ट्राचा किंवा जातीचा? अरब, तुर्क, अफगाण आणि मोंगल किंवा पोर्तुगीज, फ्रेंच, डच आणि इंग्रज हे एकामागून एक जे हिंदुस्थानांत आले, ते काय त्याचा उद्धार करण्यासाठीं? मराठ्यांनीं हिंदुस्थानांत जी मुलूखगिरी केली, तिच्यामागें कांहीं हक्काची न्याय्य भावना तरी होती, कांहीं हेतूचं उदात्त राजकारण तरी होतं. सारं भरतखंड ही आमची धर्मभूमि आहे आणि त्या आमच्या पुण्यभूमीला विधर्मीय विजेत्यांच्या तावडींतून सोडवणं हें आमचं कर्तव्य आहे या भावनेंतून उत्स्फूर्त झालेलं मराठ्यांचं राजकारण कुठें आणि अरब, मोगल, पोर्तुगीज, फ्रेंच किंवा इंग्रज यांचं निव्वळ साम्राजशाही रक्तपिपासु राजकारण कुठें! सारें भरतखंड पारतंत्र्यांतून

मुक्त करून स्वतःच्या मध्यवर्ती सत्तेखालीं आणण्याचा मराठ्यांचा प्रयत्न जर यशस्वी झाला असता, तर त्या प्रयत्नाची परिणति, कालाच्या प्रभावानें, पुढें भारतीय संघराज्याच्या स्थापनेंत झाली नसती कशावरून? निखालस परकीय, विजिगीषु, रक्तशोषक अशा ब्रिटिश साम्राज्यसत्तेंतून भारतीय संघराज्य पैदा झाल्याचा आपल्या डोळ्यांसमोर घडलेला चमत्कार लक्षांत घेतला असतां, मराठी साम्राज्याचें रूपांतर, इतिहासाच्या अनिवार्य क्रमानें, भारतीय संघराज्यांत झालें असतें, अशी कल्पना करावयाला काय हरकत आहे? किंबहुना, मराठशाहीला आलेलें मराठी संघराज्याच्या स्वरूपाचें स्वाभाविक पर्यवसान शेवटीं हिंदी संघराज्यांत होणें, हेंच क्रमप्राप्त ठरतें. दुर्दैवानें मराठ्यांची मुलूखगिरी ही अपेशी म्हणून निंद्य ठरली आणि इंग्रजांची मुलूखगिरी ही यशस्वी म्हणून स्तुत्य ठरली, एवढाच फरक! अशोक, अकबर किंवा इंग्रज यांचें हिंदुस्थानांत एकछत्री साम्राज्य स्थापण्याचं राजकारण तेवढें प्रशस्त आणि मराठ्यांची मुलूखगिरी मात्र अनुचित असें ब्रिटिश इतिहासकारांनीं प्रतिपादन करीत रहावें, याचें मला नवल वाटत नाहीं. कारण त्यांचें इतिहासाचे संशोधन, विवरण आणि लेखन हा सुद्धां त्यांच्या साम्राज्यनीतीचा म्हणा किंवा भेदनीतीचा म्हणा एक तात्विक भाग, एक सांस्कृतिक घटक आहे. पण त्या इतिहासकारांची री ओढून आम्ही आपल्या इतिहासाचा विपर्यास, उपक्रमांचा उपहास आणि समाजाचा तेजोभंग करण्यांत कोणती बौद्धिक बहादुरी आहे हें मात्र मला समजत नाहीं--"

"त्या बहादुरीच्या मागें समाजवादी पक्षाचें भाषावार प्रांतरचनेविषयींच्या विरोधाचें राजकारण आहे. डॉ. राममनोहर लोहिया यांनीं इथं विद्यार्थ्यांपुढें दिलेल्या व्याख्यानांत भाषावार प्रांतरचना ही राष्ट्रीयत्वाला मारक आहे असें सांगितलं होतं-- "

"आणि समाजवाद मारक नाहीं का? कोणतंहि आंतरराष्ट्रीय आर्थिक तत्त्वज्ञान हें राष्ट्रीयत्वाला मारकच असतं. पण, डॉ. लोहिया यांच्यासारख्या कांहीं सोशॅलिस्टांचा जो भाषावार प्रांतरचनेला विरोध आहे, त्याच्या बुडाशीं त्यांची सुप्त भांडवलशाही वृत्ति आहे, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. राममनोहर लोहिया, अशोक मेहता किंवा पुरुषोत्तमदास त्रिकमदास यांना भाषावार प्रांतरचना नको, कारण त्यांना मुंबई शहर महाराष्ट्रांत अंतर्भूत व्हावयाला नको! पण

१९३५ सालीं सिंध, सीमा आणि ओरिसा हे नवे भाषावार प्रांत जेव्हां निर्माण झाले, तेव्हां या सोशॅलिस्ट नेत्यांचा भाषावार प्रांतरचनेविषयींचा हा विरोध कुठें लपला होता? त्या विरोधाची वाघनखें नेमकी आज महाराष्ट्र एकीकरणाच्या प्रश्नावर बोलतांना बाहेर पडावींत, या विसंगत तर्कदुष्ट राजकारणाचा अर्थ न कळण्याइतके कांहीं आम्ही दुधखुळे नाहीं! महाराष्ट्र एकीकरणाला त्यांचा विरोध मुंबई शहरामुळें आणि मुंबई शहरासाठीं आहे. मुंबईसंबंधींचा आग्रह संयुक्त महाराष्ट्र परिषदेनें सोडल्याबरोबर कॉंग्रेसश्रेष्ठी जसे संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत आणावयाला ताबडतोब तयार होतील, तसेच हे सोशॅलिस्ट श्रेष्ठीही तयार होतील! दोघांची जात, वृत्ति, धोरण आणि तंत्र हीं एकच आहेत!! — ”

“ मला असं वाटतं कीं, सिंध, सीमा आणि ओरिसा यांच्याबरोबर १९३५ सालींच जर साऱ्या हिंदी प्रांतांची भाषावर पुनर्घटना करण्यांत आली असती, तर पाकिस्तानच्या मागणीला इतका जोर बहुधा चढला नसता— ”

“ थोडंसं तथ्य आहे तुझ्या या म्हणण्यांत. बंगाल आणि पंजाब यांचा अपवाद जर सोडला, तर हिंदुस्थानांतील प्रांतिक भाषा आणि प्रांतिक समाज यांच्यांत पूर्ण सात्म्य असल्याचें आढळून येईल. बंगालमध्यें हिंदु आणि मुसलमान या दोन्ही समाजांना वंग भाषा आणि वंगीय संस्कृति ही सारखीच प्रिय आहे; व दोन्हीही समाजांनीं सारखाच हातभार त्यांच्या अभिवृद्धीला लावलेला आहे. श्री. शरद् बोस आणि श्री. सुऱ्हावर्दी यांच्यासारख्या बंगालच्या कांहीं पुढाऱ्यांना पश्चिम आणि पूर्व बंगाल हे कालांतरानें पुन्हा एकजीव होतील अशी जी आशा वाटते, ती या सात्म्याच्या जाणिवेमुळेंच. उलट, पंजाबांत पंजाबी ही मुसलमानांची आणि गुरुमुखी ही शीखांची अशा दोन भिन्न भाषा प्रचारांत असल्यामुळें, पंजाब हा एकसांस्कृतिक प्रांत समजला जात असतांहि, त्या प्रांतांत तीव्र द्वैत असल्याचें दृष्टीस पडतें. पूर्व पंजाब हा शीख प्रांत किंबहुना ‘ शीखांची मातृभूमि ’ ( Shikh Homeland ) समजली गेली पाहिजे व त्या दृष्टीनें त्याच्या राज्यकारभाराची रचना झाली पाहिजे, असा जो कांहीं शीख धुरीणांचा आग्रह आज आहे, त्याच्या मुळाशीं हीच द्वैताची भावना आहे. १९३५ सालीं या साऱ्या भाषिक, धार्मिक आणि सांस्कृतिक आकांक्षा लक्षांत घेऊन जर सगळ्या हिंदी प्रांतांची पुनर्घटना करण्यांत

आली असती, बंगाल आणि पंजाब यांची जर त्याच वेळीं धर्मवार आणि भाषावर विभागणी करण्यांत आली असती, तर त्या त्या धार्मिक समाजांच्या आपल्या वैशिष्ट्याच्या परिपोषाविषयींच्या न्याय्य आकांक्षा तृप्त होण्याला अवसर मिळून, पाकिस्तानचें अरिष्ट बहुधा टळलें असतें. पण, प्रा'ांतिक ठेच लागल्याशिवाय शहाणपण सुचावयाचें नाहीं आणि शिकावयाचेंहि नाहीं असा आमच्या श्रेष्ठींचा मुळी शिरस्ताच आहे, त्याला काय करणार ? भाषावार प्रांतरचनेच्या चळवळींत कोणत्याहि प्रकारची आक्रमक किंवा फुटीर वृत्ति नाहीं; तर हिंदुस्थानांतील एकभाषी आणि एकसांस्कृतिक लोकसमाजांची आत्मावि'काराची ती स्वाभाविक आकांक्षा आहे. म्हणून स्वतःला लोकशाहीचे पुरस्कर्ते म्हणविणाऱ्या समाजवाद्यांनीं तरी भाषावार प्रांतरचनेला विरोध करतां काम नये—"

÷ ÷ ÷

सायंकाळीं ६ च्या सुमारास ' नरकेसरी ' प्रेसची कंपॉझिटर मंडळी रात्रीच्या कामाच्या व्यवस्थेसंबंधीं बोलावयाला आली. नेहमींप्रमाणें रात्रीं ८ वा. सर्वांनीं कामावर यावें आणि दोन पानांचा अंक काढावा, असें आम्हीं सहविचारानें ठरविलें. त्यानंतर उठतांना आमचे फोरमन श्री. सीतारामजी भाकरे म्हणाले—

" आपल्या जिवाला धोका आहे असं ऐकलं आज—"

" हो. माझ्याहि कानांवर आलंय. पण त्याला काय करणार ? जें होईल तें मुकाट्यानं सोसलं पाहिजे—"

" पण आपला पेपर तर कोणत्याच पक्षाचा नाहीं. कॉंग्रेसचा नाहीं, तसा हिंदु सभेचाहि नाहीं. मग आपल्याला धोका कां असावा ? "

आमचे दुय्यम फोरमन श्री. अडकूजी बोरकर यांनीं विचारलें.

त्यावर श्री. पंढरीनाथ वाघमारे यांनीं परस्पर उत्तर दिलें, " कारण गांवांत भलभलत्या कंड्या पिकविण्यांत आल्या आहेत भाऊसाहेबांविषयीं. तो गोडसे यांच्याकडे जेवून गेला, यांनीं त्याला स्टेशनावर पोंचवलं, असं कॉंग्रेसची चांगलीं जबाबदार माणसं सांगत सुटलीं आहेत. त्यामुळं खवळून गेले आहेत लोक. त्यांना थोडंच कळतंय खरं खोटं ?—"

" पण खऱ्याखोट्याचा विचार करायला आज डोकं ताळ्यावर आहे कुणाचं ? गोडसे जर खरोखरीच माझ्याकडे आले असते, तर माझ्या रिवाजाप्रमाणें मी त्यांना ऑफिसांत आणलं असतं आपल्या न् तुम्हांला सर्वांना ती गोष्ट कळली असती. पण इतकी खऱ्याखोट्याची शहानिशा करून घ्यायला आज कोण तयार आहे ! लोक अतिशय चिडलेले आहेत न् आपली ती चीड त्यांना कोणा ना कोणावर तरी राग काढून शांत करून घ्यायची आहे—"

" पण तुम्हीं ऑफिसांत नाहीं आलांत तरी चालेल, भाऊसाहेब. तुम्हीं घरून कॉपी पाठवा; आम्हीं प्रुफं घरीं पाठवूं--"

" पण, तुम्हीं सगळे छापखान्यांत येणार आहांत, तर मग मी तरी घरीं कशाला राहूं ? मी जेवल्याबरोबर येतों. मला खरोखरीच वाटत नाहीं आपल्याला कांहीं धोका आहे असं—"

कामगार परत जातात न जातात, तोंच केशव आला. मी त्याला विचारलें, " मी मजकूर डिक्टेट करतों, तो घेतोस का तूं ?--"

तो लगेच लिहावयाला बसला. मी ताज्या तारांतला महत्त्वाचा भाग प्रथम सांगितला; व नंतर आर्टिकल डिक्टेट केलें.

लिहिणें संपल्यावर तो मला म्हणाला " आज लोक फार चिडलेले आहेत न् ब्राह्मणांसंबंधीं वाटेल तें बोलताहेत—"

" हो. मी कालपासून ऐकतोय हें सारखं. पण आतां तुकडोजीमहाराजांचं भाषण आहे चिटणीस पार्कमध्यें. मला वाटतं, ते लोकांना समजुतीच्या गोष्टी सांगतील आणि त्याचा परिणाम इष्ट होईल. त्यांनीं मनांत आणलं, तर लोकांना आवरणं त्यांना अशक्य नाहीं. शनिवारीं संध्याकाळपर्यंत नागपूर पुष्कळच शांत होतं. पण पुण्याला आणि कोल्हापूरला झालेल्या दंगलीच्या बातम्या रेडिओवर आल्यापासून वातावरण झपाट्यानं बिघडत चाललंय—"

" पण गोडशाच्या कृत्याचा संबंध सबंध ब्राम्हण जातीशीं किंवा एकंदर महाराष्ट्राशीं लावणं अन्यायाचं नाहीं का ?— "

" तुझा मुद्दा अगदीं बरोबर आहे. पण, त्याहिपेक्षां मला दुःख आणि भय वाटतंय तें या गोष्टीचं कीं, गेली सत्तावीस वर्षे महाराष्ट्रांतील लेखकांनीं, वृत्तपत्रांनीं आणि निरनिराळ्या वृत्तींच्या बुद्धिवादी वर्गानीं गांधीवादाला

आणि गांधीजींच्या धोरणाला जो विरोध केला, त्या बौद्धिक, तत्त्वनिष्ठ, व्यक्ति-निरपेक्ष विरोधाशी या खुनाचा संबंध जोडला जाईल व त्याचं खापर महाराष्ट्रांतील बुद्धिवादी वर्गांच्या आणि वृत्तपत्रांच्या माथ्यावर फोडलं जाईल—"

"पण गांधीजींच्या तत्वज्ञानाला आणि कार्यक्रमाला काय फक्त महाराष्ट्रांतच विरोध झाला ? महाराष्ट्राप्रमाणेंच बंगाल आणि पंजाब हेहि गांधीजींशीं कधींच समरस होऊं शकले नाहींत. बंगालमधील कॉंग्रेस पक्षांत जी दुही माजली आणि ज्या दुहीचं पर्यवसान अखेर सुभाषबाबू देशोधडीला लागण्यांत झालं, ती दुही गांधीवादासंबंधींच्या तीव्र मतभेदांतूनच उद्भवलेली नव्हती का ? देशबंधु दास, सुभाषबाबू, फार कशाला डॉ. बिधानचंद्र रॉय हे सगळेच बंगाली नेते गांधीजींच्या धोरणाविरुद्ध निरनिराळ्या वेळीं उठाव करावयाला उभे राहिले आणि त्या साऱ्या यादवीचा परिणाम अखेर सुभाषबाबूंचा नाश होण्यांत झाला. जी गोष्ट बंगालची, तीच पंजाबची. लाला लजपतराय तर कॉंग्रेसविरुद्ध पक्ष-संघटना करण्यांत प्रमुख होते—"

"तूं म्हणतोस तें सगळं खरं. पण गांधीजींवर गोळ्या झाडणारा इसम हा आपल्या दुर्दैवानं महाराष्ट्रीय आणि त्यांतून ब्राह्मण आहे. तो कांहीं बंगाली किंवा पंजाबी नाहीं—"

"तेव्हां या गोष्टीचा फायदा घेऊन गांधीवादाला विरोध करणाऱ्या महाराष्ट्रांतील वृत्तपत्रांचा आणि बुद्धिवादी वर्गांचा सूड घेतला जाईल या वेळीं असं वाटतं तुम्हांला ? गोडश्यानं आपल्या आततायीपणानं ही छान संधि मिळवून दिली आहे खरी गांधीवाद्यांना—"

"वास्तविक गांधीवाद्यांना हें पूर्ण माहित आहे कीं, महाराष्ट्रांतले हे सगळे बुद्धिप्रधान आणि बुद्धिवादी वर्ग— मग ते ब्राह्मण असोत, ब्राह्मणेतर असोत वा अस्पृश्य असोत, नेमस्त असोत, महासभावादी असोत वा प्रतिसहयोगी असोत, कम्युनिस्ट असोत, रॅडिकल असोत वा सोशॅलिस्ट असोत—एकजात गांधीवादाच्या विरुद्ध होते, आजहि आहेत. गांधीवादाला एकट्या महाराष्ट्र ब्राह्मणांनीं विरोध केला असें म्हणणें केवळ मूर्खपणाचें आणि खोटेपणाचेंच नव्हे तर दुष्टपणाचेंहि आहे. केळकर, मुंजे, सावरकर, भोपटकर, वगैरे ब्राह्मणांप्रमाणेंच जयकर, लठ्ठे, जाधव, रामराव देशमुख, पंजाबराव देश-

मुख वगैरे ब्राह्मणेतरांनींहि गांधीजींच्या तत्त्वज्ञानाला आणि राजकारणाला निकरानें विरोध केलेला नाहीं काय ? १९३० सालापर्यंत महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर पक्ष कॉंग्रेसच्या विरुद्ध होता; व १९३६ सालापर्यंत त्या पक्षाच्या म्होरक्यांनीं कॉंग्रेसच्या विरुद्ध निवडणुकी लढविण्याचाहि प्रयत्न केला. १९३६ सालीं जेव्हां त्यांना दिसून आलें कीं, राज्यसत्तेचें केंद्र ब्रिटिश सरकारच्या मुठींतून निघून कॉंग्रेसच्या हातीं आतां नक्की जाणार तेव्हां कॉंग्रेसला 'भटजी-शेटजींची कॉंग्रेस' म्हणून निंदणारे हे संधिसाधु खादीचे कपडे चढवून भराभर कॉंग्रेसमध्यें शिरले! ब्राह्मणेतरांचा हा प्रकार. अस्पृश्यांविषयीं तर विचारायलाच नको. डॉ. अंबेडकर यांच्यासारखा गांधी आणि गांधीवाद यांचा शत्रु उभ्या हिंदुस्थानांत दुसरा झालाच नाहीं. गांधीजी आणि कॉंग्रेस यांना ज्या पद्धतीचा विरोध त्यांनीं गेलीं पंचवीस वर्षे केला, त्याला साऱ्या हिंदुस्थानांत तोड सांपडणें कठीण जाईल. सुभाषबाबू हे गांधीजींचे प्रतिमल्ल खरे. पण द्रोणाचार्यांशीं युद्धाला प्रारंभ करण्यापूर्वी त्याच्यावर नमनाचे बाण नम्रतेनें सोडणाऱ्या अर्जुनाप्रमाणें ते आमरण महात्माजींशी अत्यंत विनयानें वागत आले. पण गांधीजींविषयीं बोलतांना किंवा लिहितांना अंबेडकरांनीं तशी कोणतीच मर्यादा किंवा मुर्वत कधीं ठेवली नाहीं. आज कॉंग्रेसमध्यें जे ब्राह्मणेतर किंवा अस्पृश्य कार्यकर्ते आहेत, त्यांना फार तर कॉंग्रेसवादी म्हणतां येईल. गांधीवादी म्हणणें शक्य नाहीं. त्यांचें राजकारण सेवेचें आणि साधुतेचें नाहीं; तर सत्तेचें आणि स्पर्धेचें आहे. कॉंग्रेसनें समन्वयाच्या गांधीवादी धोरणाऐवजीं बहुजनसमाजाला सत्ता प्राप्त करून देण्यासाठीं वर्गविग्रहाच्या क्रांतिकारक धोरणाचा अंगीकार करावा, नाहीं तर आपलें कार्य संपलें अशी कबुली देऊन आत्मविसर्जन करावें, असा जो प्रचार श्री. शंकरराव मोरे यांच्यासारखे ब्राम्हणेतरांतील कुशाग्र बुद्धीचे आणि कुशल लेखणीचे नेते गेलीं दोन वर्षे करीत आहेत, तो ब्राम्हणेतरांच्या या वृत्तीचा निदर्शक आहे. कॉंग्रेसचें राज्य देशांत स्थापन झाल्यापासून गांधीवादाला श्री. मोरे यांच्या इतका तात्त्विक निष्ठुर विरोध महाराष्ट्रांतील दुसऱ्या कोणत्याहि कार्यकर्त्यानें केलेला नसेल. गांधीवाद ज्यांनीं आत्मसात् केला आहे आणि त्याच्या आचार-प्रचाराला ज्यांनीं आपलें आयुष्य वाहिलें आहे, असे त्यागी, सेवारत, चारित्र्यवान्, निष्ठावंत गांधीवादी महाराष्ट्रांत कोणी असतील, तर ते विनोबाजी,

काकासाहेब कालेलकर, अप्पासाहेब पटवर्धन, भागवत, शंकरराव देव, सानेगुरुजी. शंकरराव जावडेकर किंवा आबासाहेब वालावलकर यांच्यासारखे ब्राम्हणच होत, ब्राम्हणेतरांत हाताच्या बोटावर मोजण्य इतके तरी प्रामाणिक गांधीवादी निघतील कीं नाहीं, याची शंकाच आहे. ब्राम्हणेतर गांधीवादी नाहींत किंबहुना काँग्रेसवादीहि नाहींत. ते फक्त सत्तावादी आहेत. आणि या त्यांच्या सत्तावादित्वाबद्दल मी तरी त्यांना मुळींच दोष देणार नाहीं. महाराष्ट्रांत त्यांची प्रचंड बहुसंख्या आहे. ज्यांची बहुसंख्या, त्यांचा देश आणि त्यांचेंच राज्य, असा आजच्या लोकशाहीचा दंडक आहे. तेव्हां या संक्रमणकालांत ब्राह्मणेतरांनीं केवळ सत्तावादी व्हावें, ज्या कोणत्या साधनानी सत्ता हस्तगत करतां येईल त्या साधनांचा संधीनुसार अवलंब करावा हें अगदीं स्वाभाविक आहे, असेंच मी समजतों. पेशवाईमुळें गेलीं दोनशें वर्षे आपण सत्तेला मुकलों आणि ब्राह्मणांची पोळी महाराष्ट्रांत पिकली, असा त्यांचा एक समज आहे. आजचें त्यांचें सत्तावादित्व हें त्या समजांतून पैदा झालेलें आहे; व महाराष्ट्रांतील संपूर्ण राज्यसत्ता त्यांच्या हातीं येईपर्यंत हा सत्तावाद म्हणजेच खरोखरी ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद मिटणार नाहीं—"

"पण पेशवाईमुळें आपण सत्तेला मुकलों आणि महाराष्ट्रांत ब्राह्मणांची पोळी पिकली हा ब्राह्मणेतरांचा समज तरी खरा आहे का?—"

"या त्यांच्या समजुतींतहि तथ्य नाहीं फारसें. मराठशाहींत असा एक प्रकार प्रारंभापासून दृष्टीस पडतो कीं, शिवाजीपासून तों शेवटल्या बाजीरावापर्यंत मराठशाहीतील प्रत्येक राजकर्त्यानें पूर्वीच्या राजवटींतील मुत्सद्दी आणि सेनानी यांना मागें सारून आपले स्वतःचे मुत्सद्दी आणि सेनानी निर्माण करण्याचा प्रयत्न केला. शहाजी, शिवाजी, संभाजी, राजाराम आणि शाहू या मराठा किंवा बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, नानासाहेब, माधवराव आणि नाना फडणीस या ब्राह्मण राज्यकर्त्यांच्या कारकीर्दींत सर्रास हा प्रकार घडलेला दृष्टीस पडतो. आपल्या लोभांतले आणि विश्वासांतले मुत्सद्दी आणि सेनानी निर्माण करतांना यांपैकीं कोणत्याहि राजकर्त्यानें जात पाहिली, असें म्हणतां येणार नाहीं. शाहूनें पेशव्यांचें भट घराणें हातीं धरून उदयाला आणलें; तर उलट पेशव्यांनीं जाधव, घोरपडे, शिंदे, होळकर, पवार वगैरे ब्राह्मणेतर घराणीं नांवारूपाला आणलीं.

जर कांहीं पक्षपात कदाचित् झालाच असेल, तर तो उत्तर पशवाईंत नाना फडणीसाच्या मुठींत सर्व सत्ता गेल्यावर झाला. अर्थात् पेशव्याचें राज्य हे ' ब्राह्मणी राज्य ' होतें किंवा त्या राज्यांत मराठयांना मागें टाकण्याचा प्रय.न झाला, असें म्हणावयाला जागा नाहीं. सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत नाना आणि महादजी हे तुल्यबल होते, या गोष्टीचा अर्थच हा कीं, ब्राह्मण आणि मराठा या दोन्ही जाती मराठशाहींत शेवटपर्यंत सारख्याच तोलानें वागत होत्या. किंबहुना, मराठशाही बुडाल्यानंतर तिचे अवशेष म्हणून इंदूर, ग्वाल्हेर, बडोदें, कोल्हापूर, धार, फलटण, सांगली, मिरज वगैरे जीं संस्थानें शिल्लक राहिलीं, त्यांतहि विस्तार किंवा वैभव या दोन्ही बाबतींत असलेलें मराठा संस्थानांचें आधिक्य लक्षांत घेतलें असतां, पेशवाईत ब्राह्मणांनीं मराठ्यांना दडपून टाकलें, असें म्हणणें कठीण जाईल. मराठशाहींत काय किंवा पेशवाईंत काय, जी चुरस-सत्ता आणि नेतृत्व यांच्यासाठीं जी स्पर्धा–वेळोवेळीं झाली, तिचें स्वरूप केवळ वैयक्तिक होतें; जातीय नव्हे. धनाजी आणि संताजी, ताराबाई आणि शाहू, सदाशिवराव आणि राघोबादादा, तुकोजी आणि महादजी, बापू आणि नाना यांच्यांतील हेवेदावे, त्यांतून उद्भवलेले अंतःकलह आणि त्यामुळें झालेली दौलतीची फांटाफूट हीं सर्वस्वी वैयक्तिक होतीं. भोसल्यांकडून भटांकडे आणि भटांकडून भानूंकडे असें मध्यवर्ती सत्तेचें जें संक्रमण होत गेलें, त्यालाहि जातीयता कारण नसून व्यक्तींचें गुणाधिक्यच कारण होतें, हें कबूल करावें लागेल. महाराष्ट्रीयांच्या ठिकाणीं राष्ट्रीय, धार्मिक किंवा जातीय अहंकाराची जाणीव एकंदरींत इतकी कमी होती कीं, राजा किंवा सत्ताधारी याचें राष्ट्र, जात किंवा धर्म न पाहतां एकदां देशांत त्याची हुकमत स्थापन झाल्यावर 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या भावनेनें त्यांनीं त्याची इमानें इतबारें सेवा केल्याचे दाखले इतिहासांत हवे तितके आढळतात. मराठेशाहीच्या अत्यंत भरभराटीच्या काळांतसुद्धां ब्राह्मण आणि मराठे हे दोघेहि जिथें मोंगल बादशहा किंवा निजाम यांची नोकरी बजावित होते, तिथें ब्राह्मणांनीं जात्यभिमानानें मराठ्यांना दडपलें किंवा मराठ्यांनीं मत्सरानें ब्राह्मणांचा द्वेष केला, या म्हणण्यांत विशेष अर्थ नाहीं. महाराष्ट्रीयांच्या या विशिष्ट स्वभावामुळें निदान मराठशाहींतील राजकारणांत तरी जातीय दुरभिमान हे कधींच डोकें वर काढूं शकले नाहींत— "

" मग पेशवाईत ब्राह्मणांची सद्दी झाली आणि मराठे मागें पडले हा प्रवाद कसा पसरला ? जोतिबा फुले, सत्यशोधक समाज आणि ब्राह्मणेतर पक्ष यांच्या चळवळीचें सारें मूळ तर या प्रवादांत आहे—"

" हो. पण म्हणून कांहीं तो प्रवाद ऐतिहासिक सत्य आहे असें म्हणतां येणार नाहीं. गोरे इतिहासकार आणि गोरे ख्रिस्ती मिशनरी यांनीं मराठ्यांच्या इतिहासावर आणि हिंदु धर्मशास्त्रावर जी दुष्ट मल्लिनाथी केली, तिच्यांतून हा प्रवाद किंबहुना महाराष्ट्रांतील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद उद्भवला. जोतिबांचें लिहिणें कितीहि तळमळीचें असलें, तरी पुराणांतील कथा आणि इतिहासांतील प्रसंग यांचा जो हास्यास्पद अन्वयार्थ त्यांनीं आपल्या लिखाणांतून लावलेला आहे, त्याची स्फूर्ति त्यांना ख्रिस्ती मिशनरी आणि गोरे इतिहासकार यांच्यापासून मिळाली होती, हें स्पष्ट दिसतें. त्यांचें कोणतेंहि विधान संशोधनाच्या कसोटीला टिकणारें नाहीं. पेशवाईच्या उत्तरकालांत ग्रामण्यें झालीं, कांहीं जातींना हलकें ठरविण्याचा प्रयत्न झाला, जातिबंधनें एकंदरींत कडक करण्यांत आलीं, या गोष्टी खऱ्या. पण, त्या जातीय छळाच्या मागें तत्कालीन धार्मिक समजुती आणि रूढि होत्या व सत्ताधारी ब्राह्मण आणि मराठे हे दोघेहि त्या छळांत सामील होते, हें विसरून चालणार नाहीं. त्या छळाचा संबंध राजकारणाशीं जोडणें आणि त्यांतून राजकीय अर्थ काढणें हा शुद्ध वस्तुविपर्यास होय. ब्रिटिश राज्यकर्ते, इतिहासकार आणि मिशनरी यांनीं सतत दीडशें वर्षें विशिष्ट प्रचार करून जें धार्मिक आणि जातीय विद्वेषाचें विषारी वातावरण देशांत निर्माण केलें, त्यामुळें दूषित झालेल्या मनानें मराठशाहीच्या इतिहासाकडे पहाणें आणि त्यांतील घटनांची उपपत्ति लावणें अगदीं अयोग्य आहे. मराठ्यांच्या इतिहासांत राष्ट्रीयता आणि जातीयता या दोन्हीहि भावनांचा जोर विशेष दिसून येत नाहीं. श्रीशिवाजीमहाराजांनीं महाराष्ट्रांत धर्म-राष्ट्रीय (Religio-national) भावना निर्माण करून त्या संमिश्र भावनेच्या जोरावर 'मराठा राष्ट्र' स्थापन करण्याचा प्रयत्न केला; व 'मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्र धर्म वाढवावा' अशी घोषणा करून श्रीसमर्थ रामदासांनीं त्यांच्या या राष्ट्रनिर्मितीच्या विशाल, अभिनव उपक्रमाला अध्यात्मिक भूमिकेची जोड दिली. पण,शिवाजीच्या मृत्युनंतर या उज्ज्वल भावनेचा लोप होत जाऊन उत्तर पेशवाईंत तिचा अगदीं

अस्त होऊन गेला. तो इतका कीं, ब्राह्मण आणि मराठा या दोघांहि सत्ताधारी जातींच्या ठिकाणी राष्ट्रीय वैशिष्टयाचा अहंकार तर राहोच पण जाणीवहि शिल्लक उरली नाहीं त्यामुळें, ज्या महाराष्ट्र ब्राह्मणांच्या हातून हिंदुस्थानाची सार्वभौम सत्ता ब्रिटिशांनीं हिसकावून घेतली असें म्हटलें जातें, ते महाराष्ट्र ब्राह्मणच आपल्याला पदच्युत करणाऱ्या ब्रिटिशांच्या राज्याची घडी ठाकठीक बसवून देण्यासाठीं मोठ्या ईर्ष्येनें पुढें सरसावले ! व रावबाजीनें राजीनामा लिहून दिल्यानंतर ज्या शिंदे-होळकरांनीं वेलस्लीशीं शेवटचा सामना मराठशाहीच्या पुनरुत्थानासाठीं मोठ्या निकरानें दिला, त्यांचे वंशज सत्तावन सालच्या बंडाच्या वेळीं कोसळून पडूं पहाणाऱ्या नवोदित ब्रिटिश साम्राज्यशाहीला सांवरण्यासाठीं इमानदारीनें उभे ठाकले ! ! अशा स्थितींत आजच्या राजकीय, राष्ट्रीय किंवा जातीय भावनांचें मूळ मराठ्यांच्या इतिहासांत शोधण्यांत काय अर्थ आहे ?—"

"पण ब्राह्मणांनीं मराठी राज्य बुडविलें, ब्राह्मणेतर जातींवर जुलूम केला व इंग्रजांची ताबेदारी पत्करून स्वतःच्या जातीचें कोटकल्याण करून घेतलें, हे आरोप हा तर ब्राह्मणेतर चळवळीचा पाया आहे. राज्यकारभार आणि सरकारी नोकऱ्या यांत जें ब्राह्मणांचें वर्चस्व आज दिसतें, त्याच्याकडे बोट दाखवून ब्राह्मणेतर नेते आपल्या जातवार मागण्यांचें समर्थन करतात—"

"पण हे आरोप खरे नाहींत. इंग्रजांनीं ब्राह्मणांना हाताशीं धरलें, तें ब्राह्मणांविषयीं त्यांना प्रेम होतें म्हणून खास नव्हे; तर महाराष्ट्रांत जी कारकुनी कामांत वाकबगार, रोजच्या राज्यकारभाराच्या वहिवाटींत मुरलेली त्यांतल्या त्यांत सुशिक्षित जात त्यांना आढळली, तिला आपल्या राज्याची घडी बसविण्यासाठीं त्यांनीं केवळ सोईच्या दृष्टीनें हाताशीं धरलें. ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य या महाराष्ट्रांतील तीन प्रमुख समाजघटकांपैकीं ब्राह्मण हे बव्हंशीं कारकुनी पेशाचे आणि ब्राह्मणेतर हे बव्हंशीं शेतकरी किंवा शिलेदारी पेशाचे आहेत. लेखणी ही ब्राह्मणाची, तर नांगर आणि तरवार ही ब्राम्हणेतराची निशाणी म्हणतां येईल. मराठशाहींत लेखणीच्या जोडीला जरी ब्राम्हणांनीं तरवारहि उचलली, तरी कारकुनी आणि मुत्सद्देगिरी हाच त्यांचा मुख्य पेशा शेवटपर्यंत राहिला. तथापि ब्राह्मणांत तरवारबहाद्दर पुष्कळच निघाले; पण ब्राह्मणेतरांत मात्र लेखणीबहाद्दर निघाल्याचें उदाहरण एकाद दुसरेंच

सांपडेल. इंग्रजांनीं आपल्या सत्तेचा पाय रुजतांच ब्राह्मणेतरांच्या हातां-तली तरवार काढून घेतली. त्यामुळें त्यांच्या हातीं फक्त नांगर शिल्लक राहिला. उलट, इंग्रजांच्या बिनहत्यारी, कायदेबाज राजवटींत लेखणीचें काम-काज आणि महत्त्व पूर्वीच्या हत्यारी राजवटीपेक्षां किती तरी पटींनीं जास्त वाढल्यामुळें, ब्राह्मण आणि कायस्थ, पाठारे प्रभु वगैरे तत्सम विद्याव्यासंगी जाती साहजिकच पुढें सरसावल्या; राज्यकारभारांत सर्वत्र या ब्राह्मणादि पुढारलेल्या साक्षर जातींचें वर्चस्व दिसूं लागलें; व स्वराज्यांत लष्करी पेशाचें वैभव भोगलेल्या पराक्रमी ब्राह्मणेतर जाति मागें पडल्या. पण यांत ब्राह्मणादि पुढारलेल्या जातींचा कांहीं दोष नाहीं. इंग्रजी राज्यांत ब्राह्मणादि सुसंस्कृत महाराष्ट्रिय हिंदु जातींना जसा त्यांच्या विद्याव्यासंगी वृत्तीचा फायदा मिळाला, तसाच अँग्लो-इंडियन, पारशी, ख्रिस्ती, यहुदी, बोहरे वगैरे महाराष्ट्रांतील महारा-ष्ट्रीयेतर अहिंदु सुसंस्कृत समाजांनाहि मिळाला. मुंबई विद्यापीठ, मुंबई कॉर्पो-रेशन, मुंबई हायकोर्ट आणि मुंबई सेक्रेटरिएट यांचा जर गेल्या शंभर वर्षांचा इतिहास पाहिला, तर असें दिसून येईल कीं, विद्याव्यासंगी महा-राष्ट्रीयांपेक्षां या सुसंस्कृत महाराष्ट्रीयेतरांचेंच राजकीय आणि सामाजिक वर्चस्व मुंबईच्या कारभारांत जास्त होतें, आजहि आहे. अशा स्थितींत इंग्र-जांनीं केवळ आपल्या सोईसाठीं ब्राह्मणांना जें प्रामुख्य दिलें, त्याचा विपर्यास आजच्या जातीय दृष्टीनें करण्यांत कोणत्याच प्रकारचा विवेक नाहीं—"

"उलट इंग्रज हा महाराष्ट्र ब्राह्मणाचा द्वेष्टा आहे असाच गेल्या पन्नास वर्षांचा इतिहास नाहीं काय ?—"

"पन्नास वर्षांचा काय म्हणून ? इंग्रजाचा महाराष्ट्र ब्राह्मणाविषयींचा द्वेष त्यानें महाराष्ट्राच्या किनाऱ्यावर व्यापाराच्या निमित्तानें पाऊल ठेवल्या दिवसा-पासूनचा आहे; व इंग्रजाचें सर्व ऐतिहासिक आणि राजकीय लिखाण त्या द्वेषानें बरबटलेलें आहे मुसलमानाला जसा ब्राह्मणाविषयीं उपजत द्वेष होता, तसाच इंग्रजालाहि होता आणि आहे. हिंदु समाजांतील इतर कोणत्याहि जातीपेक्षां ब्राह्मण हाच आपल्या धार्मिक, सांस्कृतिक आणि राजकीय हितसंबंधांच्या बाब-तींत अत्यंत जागरूक आणि दक्ष असतो; व त्यामुळें विधर्मीय किंवा विदेशीय आक्रमकांना प्रतिकार करण्याचा प्रयत्नहि पण प्रथम त्याच्याचकडून होतो.

स्वत्वाची तीव्र जाणीव हें ब्राह्मणाचें जन्मजात अक्षय कवच आहे. आपल्या सांस्कृतिक श्रेष्ठतेच्या जाणिवेमुळें तो कोणत्याहि विधर्मीयाशीं किंवा विदेशीयाशीं समरस होऊं शकत नाहीं. इंग्रजांच्या तालमींत तयार झालेले अव्वल इंग्रजींतील ब्राह्मण पदवीधर, अधिकारी किंवा सुधारक जे इंग्रज राज्यकर्त्यांशीं, त्यांच्याचपासून शिकलेल्या सनदशीर वा गैरसनदशीर मार्गांनीं, दोन हात करावयाला तडाक्यानें उभे राहिले, ते याच कारणामुळें. म्हणूनच इंग्रजाला ब्राह्मणाचा विश्वास कधीं वाटला नाहीं; व त्याच्या राजकीय शब्दकोशांत ' मराठा ब्राह्मण,' 'पुण्याचा ब्राह्मण,' चित्पावन ब्राह्मण' वगैरे एकापेक्षा एक खुनशी शब्दप्रयोग पैदा होत गेले. आपली सर्वंकष संस्कृति आणि सार्वभौम सत्ता यांच्याशीं स्वतःच्या श्रेष्ठतेच्या आणि बुद्धिमत्तेच्या घमेंडीनें झुंज द्यावयाला उभ्या ठाकलेल्या ब्राह्मणाचा तेजोभंग करण्यासाठीं आणि त्यानें उभारलेल्या राष्ट्रीय आघाडींत फूट पाडण्यासाठीं इंग्रजी अधिकारी, मुत्सद्दी, मिशनरी आणि लेखक यांनीं ब्राह्मणेतर, अस्पृश्य आणि मुसलमान यांना त्याच्याविरुद्ध चिथावून त्याचे पाय ओढण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला. मुसलमान, ब्राह्मणेतर, अस्पृश्य वगैरे महाराष्ट्रांतील निरनिराळे जातवार पक्ष हीं इंग्रजाच्या या भेदनीतीचींच अपत्यें होत. आम्हीं उद्यां हिंदुस्थानांतून निघून गेल्यास सगळी सत्ता ब्राह्मणांच्या हातीं जाईल, असा जो लोकभ्रम त्यांनीं पैदा केला, त्या लोकभ्रमानें जोतिबा फुल्यांपासून अंबेडकरापर्यंत साऱ्या ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांना पछाडलेलें दिसतें. महाराष्ट्रांतील ब्राह्मणविरोधी आघाडीचा निर्माता इंग्रज आहे आणि आपली सार्वभौम सत्ता कायम ठेवण्यासाठीं ही आघाडी त्यानें धर्मशास्त्रें आणि इतिहास यांचा विपर्यास करून निर्माण केली आहे— '

" पण इंग्रजाच्या या ब्राह्मणविरोधी आघाडींत ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य जे सामील झाले, त्याला हिंदु धर्मातील ब्राह्मणाचें वर्णगुरुत्व, त्यांतून उद्भवलेली जातीय विषमता आणि त्या वर्णगुरुत्वाच्या भूमिकेला सर्वथैव विसंगत असें अन्यवर्णीयांना विद्यादान न करण्याचें ब्राह्मणांचें जनताद्रोही धोरण यांच्याविषयींची चीड हेंहि एक प्रबळ कारण नाहीं कां? किंबहुना ही चीड डिंवचूनच ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य यांना इंग्रजांनीं राष्ट्रीय आघाडींतून फोडून वेगळे काढले— "

" होय. खरें. पण ज्या ब्राम्हणांनीं इंग्रजांविरुद्ध चळवळीचा उठाव प्रथम केला, त्या सार्वजनिक काका, लोकहितवादी, रानडे वगैरे ब्राम्हणांनींच ब्राम्हणी जुलमाविरुद्धहि तितकाच जोराचा उठाव केला नाहीं काय? किंबहुना, अव्वल इंग्रजी अमदानींतील पहिल्या सुशिक्षित जागृत ब्राम्हण पिढीचा जितका जोराचा उठाव आपसांतील सामाजिक विषमतेविरुद्ध होता, तितका बाहेरील राजकीय पारतंत्र्याविरुद्ध नव्हता, हें प्रसिद्धच आहे. ब्राह्मणी जुलूम किंवा विषमता यांच्याविरुद्ध विचार करतांना आणखीहि एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. ती ही कीं, ब्राह्मणी जुलूम हा कितीहि भयंकर आहे असें मानलें, तरी तो आज तरी धार्मिक व्यवहारापुरताच मर्यादित आहे. राजकीय किंवा आर्थिक व्यवहारांत त्या जुलुमाला वाव नाहीं. म्हणजे असें कीं, बहुजनसमाजाचा रक्तशोष मुख्यतः ज्या व्यवहारांमुळें होतो, त्या आर्थिक व्यवहारांशीं ब्राह्मणाचा तादृश संबंध नाहीं. इंग्रजी अंमलांत ब्राह्मणाचा धार्मिक जुलूम हा अनेक कारणांमुळें झपाट्यानें नष्ट होत गेला. पण उलट ब्राह्मणाचा ज्याच्याशीं काडीचाहि संबंध नाहीं, तो बहुजनसमाजाचा आर्थिक रक्तशोष मात्र उत्तरोत्तर सारखा वाढत चाललेला आहे, हें कांहीं ब्राह्मणेतर कार्यकर्त्यांच्या लक्षांत येत नाहीं. महाराष्ट्रांतील जमीन, संपत्तीच्या उत्पादनाचीं केंद्रें आणि साधनें व महाराष्ट्रांतील भांडवल हें सारें महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचें साहित्यसर्वस्व आज महाराष्ट्रांतील ब्राह्मणाच्या हातीं नाहीं किंवा ब्राह्मणेतराच्याहि हातीं नाहीं. तें महाराष्ट्रांत स्थायिक झालेल्या किंवा व्यवसायपरत्वें आलेल्या महाराष्ट्रीयेतरांच्या मुठींत आहे, याची जाणीव ब्राह्मणेतरांना अद्याप तरी तीव्रतेनें झाल्याचें दिसत नाहीं. महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचीं सूत्रें आपल्या मुठींत केंद्रित करून बसलेल्या या उपऱ्या महाराष्ट्रीयेतर भांडवलशाहीचे बुद्धिजीवी ब्राह्मण आणि श्रमजीवी ब्राह्मणेतर हे दोघेहि आज निव्वळ कारकून आणि कामगार होऊन बसलेले आहेत. ब्राह्मण आपली बुद्धि किंवा लेखणी या भांडवलदाराला विकतो आणि ब्राह्मणेतर आपली शक्ति किंवा कारागिरी त्याला विकतो, एवढाच काय तो फरक! पण दोघेहि आर्थिक दृष्टया परतंत्र, दोघेहि उपऱ्या भांडवलदाराचे गुलामच-"

" पण, मला वाटतं, महाराष्ट्राचा स्वतःचा असा व्यापारी वर्ग कधीं नव्हताच. व्यापारधंद्यांकडे महाराष्ट्रीयांची प्रवृत्ति एकंदरींत कमीच—"

" खरं आहे तुझं म्हणणं. मराठशाहींत नवीं गांवें किंवा पेठा वसवितांना कौलनामे देऊन बाहेरच्या प्रांतांतून व्यापारी आणि कारागीर आणविले असे उल्लेख ऐतिहासिक कागदपत्रांतून जागोजाग आढळतात. याचा अर्थच असा कीं, महाराष्ट्रांतील व्यापारी वर्ग हा बव्हंशीं बाहेरून आलेला आहे. पण, महाराष्ट्रांत जोंपर्यंत महाराष्ट्रीयांचीच राज्यसत्ता गाजत होती, तोंपर्यंत परप्रांतीय व्यापारी आणि कारागीर यांची महाराष्ट्रांत सतत होणारी पैरवी हा मराठशाहीच्या गुणज्ञतेचा, उद्योगधंद्यांना आणि विद्याकलांना आश्रय देण्याच्या सामर्थ्याचाच एक गौरवास्पद भाग समजला जात होता. महाराष्ट्रीय मनुष्य हा त्या काळीं आपल्या भूमींत सर्वसत्ताधारी आणि परप्रांतीय व्यापारी वर्गाचा पोशिंदा असल्यामुळें त्याला त्या उपऱ्या वर्गाचें वर्चस्व कधीं जाणवलें नाहीं. पण, त्याच्या हातची राज्यसत्ता गेल्यावर, शिलेदारी आणि समशेर जाऊन तो परतंत्र झाल्यावर परप्रांतीय भांडवलदार आणि व्यापारी यांच्याकडून होणारी मराठी बहुजनसमाजाची पिळणूक त्याला जाणवूं लागली आणि त्याचे डोळे उघडत गेले. विशेषतः, हे उपरे भांडवलदार आणि व्यापारी ब्रिटिश बनियेशाहीचे मुनीम आणि अडत्ये बनून तिनें आरंभिलेल्या सर्वंकष, आसुरी पिळणुकीला जेव्हां नफेबाजीच्या हपापाने हातभार लावूं लागले, तेव्हां महाराष्ट्रीयांना आपलें आर्थिक परावलंबन आणि पिळणूक यांची खरी कल्पना आली. आज महाराष्ट्रांतील ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य यांपैकीं कोणीच महाराष्ट्राच्या संपत्तीचा स्वामी नाहीं; कोणाच्याच हातांत महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचीं सूत्रें नाहींत; व त्यामुळें महाराष्ट्रांतील राजकीय जीवनावरहि त्यांपैकीं कोणाचीच आज हुकमत चालत नाहीं. राजकीय आणि आर्थिक दृष्टया ब्राम्हण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य हे तिघेहि आज परावलंबी आणि परधार्जिणे होऊन बसलेले दिसतात. स्वतःच्या हक्काच्या भूमींत गुलामीचें जिणें कंठीत असलेले महाराष्ट्रीयांसारखे नादान, आपसांत झगडणारे, फुटीर वृत्तीचे करंटे, अदूरदर्शी लोक हिंदुस्थानांत दुसरे सांपडणार नाहींत. ब्राह्मणाचें जुनाट धार्मिक वर्चस्व आज बहुतेक संपुष्टांत आलेंच आहे. पण, ब्राम्हण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य या तिघांचाहि सारखाच रक्तशोष करणारें महाराष्ट्रावरील

परकीयांचें आर्थिक वर्चस्व मात्र सारखें वाढत आहे, हें परस्परांशीं झगडत असलेल्या या तिघांहि समाजघटकांच्या अद्याप लक्षांत येत नाहीं—"

" पण, महाराष्ट्रांत जो हा परप्रांतीय व्यापारी वर्ग आम्हींच आमंत्रण देऊन आणवला आणि जो आज पिढ्या न् पिढया इथं स्थायिक झालेला आहे, त्याला आपण परकीय आणि उपरा किती दिवस म्हणत रहाणार ? इतक्या वर्षांच्या वास्तव्यानंतरहि तो वर्ग जर महाराष्ट्रीय जीवनाशीं समरस झालेला नसेल तर तो आपलाच दोष नव्हे काय ? त्याला पचविण्याचें सामर्थ्य आपल्यांत नाहीं असाच त्याचा अर्थ होत नाहीं का ?–"

" होतो खराच. पण यावद्दल दोष मात्र मी जास्त या उपऱ्या, परप्रांतीय भांडवलदारांना आणि व्यापाऱ्यांना देईन. महाराष्ट्रांत शेकडो वर्षे राहून, त्याच्या संपत्तीवर परिपुष्ट होऊन आणि त्याच्या आर्थिक जीवनाचें शोषण करून ज्या या परप्रांतीय भांडवलदारांनीं आणि व्यापाऱ्यांनीं त्याचे सारे उद्योग-धंदे आणि बाजारपेठा बळकावल्या आहेत, त्यांनीं आपल्या या कर्मभूमीशीं समरस होऊं नये, तिच्या हितसंबंधांविषयीं जिव्हाळा बाळगूं नये, हा त्यांचा एक प्रकारचा कृतघ्नपणाच नव्हे काय ? आज महाराष्ट्र एकीकरणाला सगळ्यांत तीव्र विरोध जर कोणाचा असेल, तर तो या महाराष्ट्राचें मीठ पिढ्या न् पिढ्या खाऊन गबर झालेल्या उपऱ्या भांडवलदारांचा. त्यांना अशी भीति वाटते कीं, नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत सारा महाराष्ट्र एक होऊन मराठी बहुजनसमाजाचें लोकराज्य जर महाराष्ट्रांत स्थापन झालें, तर त्यांचें आर्थिक अधिराज्य नष्ट होईल. त्यामुळें संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीला शक्य त्या सर्व मार्गांनीं ते आज विरोध करीत आहेत. मुंबई शहर हा या उपऱ्या भांडवलदारांचा बालेकिल्ला असून, नागपूर, हिंगणघाट, अकोला, अमरावती, खामगांव, अमळनेर, जळगांव, सोलापूर, सांगली वगैरे महाराष्ट्रांतील सगळी औद्योगिक आणि व्यापारी शहरें हे त्यांचे त्या त्या भागांतील तळ आहेत. महाराष्ट्रभर सर्वत्र पसरलेल्या या त्यांच्या तळांचें नियंत्रण मुंबई करते; व म्हणूनच महाराष्ट्राचें एकीकरण यदाकदाचित् घडून आलेंच, तरी मुंबई शहर महाराष्ट्राला मिळूं नये, तें ' खुले ' ( Free ) रहावें आणि त्या आपल्या बालेकिल्ल्यांत ठाण मांडून सारा महा-

राष्ट्र एकीकृत झाल्यानंतरहि त्याचे शोषण आपल्याला पूर्ववत् करतां यावें, यासाठीं त्यांचा पद्धतशीर प्रयत्न आज चालू आहे. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचें मुंबई हें जें मर्मस्थान समजलें जातें, तें याच कारणामुळें. इतकेंच नव्हे, तर महाराष्ट्रांत आज अशी प्रबळ भावना आहे कीं, मुंबई जर महाराष्ट्राला मिळणार नसेल, तर सध्यांचा मुंबई प्रांत आहे तसाच कायम राहिलेला बरा! महाराष्ट्रांत स्थायिक झालेल्या परप्रांतीय भांडवलदारांच्या आपल्या कर्मभूमीशीं द्रोह करण्याच्या या शोषक धोरणामुळेंच मराठी जनतेला ते उपरे वाटतात, त्यांच्याविषयीं तिरस्कार आणि चीड वाटते. विशेषतः, काँग्रेसमध्यें असलेलें त्यांचें प्रस्थ महाराष्ट्र एकीकरणाला मारक होत असल्याचा प्रत्यय गेलीं दोन वर्षें सारखा येत असल्यामुळें, संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाला केवळ प्रादेशिक आणि राजकीय बाजूच नाहीं, तर त्याहिपेक्षां महत्त्वाची अशी आर्थिक बाजू आहे, ही गोष्ट आतां प्रत्येक महाराष्ट्रीयाच्या लक्षांत येऊन चुकली आहे. म्हणूनच संयुक्त महाराष्ट्राची स्थापना म्हणजे अखिल महाराष्ट्रांत समाजवादी लोकराज्याची स्थापना असा अत्यंत मूलगामी, व्यापक अर्थ महाराष्ट्र एकीकरणाच्या चळवळीला आपोआप आलेला आहे—"

"पण महाराष्ट्राला स्वतःचा व्यापारी वर्ग उत्पन्न करणं शक्य नाहीं का? गेलीं पंचवीस वर्षे महाराष्ट्रांत व्यापारी बाणा निर्माण करण्याचे प्रयत्न जोरानें चालू असून, अलिकडे बरेच महाराष्ट्रीय कारखानदार आणि भांडवलदार नावारूपाला आलेले दिसतात--"

"कसले आले आहेत महाराष्ट्रीय कारखानदार, भांडवलदार आणि व्यापारी? एकादा टाटा, बिर्ला किंवा डालमिया जर महाराष्ट्रांत उतरला, तर तो एका चेकनं महाराष्ट्रांतील या साऱ्या कारखानदारांना आणि भांडवलदारांना विकत घेऊन निकालांत काढील! आमचे कम्युनिस्ट ज्यांना 'पेटी बुर्ज्वा' म्हणतात ना, त्या कोटींतले महाराष्ट्रांतले हे सारे कारखानदार आणि भांडवलदार आहेत –"

"मग ब्राह्मणेतरांचा ब्राह्मणांवरील राग अनाठायीं आहे म्हणायचा तर?—"

" नाहीं. असं म्हणणंहि योग्य होणार नाहीं. जातिभेद जोंपर्यंत कायम आहे, तोंपर्यंत ब्राह्मणांच्या वर्णगुरुत्वाविषयींची चीड ही न्याय्यच समजली पाहिजे. विशेषतः सावकारी पासून चांभारकामापर्यंतचे सगळे धंदे करूं लागल्यानंतरहि ब्राह्मणांनीं स्वतःच्या आनुवंशिक किंवा सांस्कृतिक श्रेष्ठतेचें स्तोम माजवीत रहावें, यासारखी दुसरी अन्याय्य विसंगति नाहीं. शिवाय, प्रथम इंग्रजांच्या सत्तेचे वहिवाटदार म्हणून आणि आतां त्यांच्या सत्तेचे वारसदार म्हणून त्यांचें जें महत्त्व राज्यकारभारांत आहे, तें असण्यांत त्यांचा स्वतःचा जरी फारसा दोष नसला, तरीसुद्धां त्या महत्त्वाचा राग ब्राह्मणेतरांना वाटावा, हेंहि स्वाभाविक आहे. पण, लोकशाहीच्या या भरतीच्या काळांत ब्राह्मणांसारख्या अल्पसंख्य जातीचें राजकीय वर्चस्व टिकणें शक्य नाहीं. त्या दृष्टीनें महाराष्ट्रांतील बहुजनसमाजाची खरी शत्रु आतां भांडवलशाही ही आहे, ब्राह्मण जात नव्हे. पुढल्या निवडणुकीनंतर हें विदारक आर्थिक सत्य ब्राह्मणेतरांना उमगल्याशिवाय रहाणार नाहीं. ब्राह्मण खोत, ब्राम्हण सावकार, ब्राह्मण जमीनदार ब्राह्मण कारखानदार, ब्राह्मण वकील किंवा ब्राह्मण डॉक्टर हा कितीहि संपन्न झाला, तरी टाटा, बिर्ला, डालमिया, सेकसरिया, मोहता, रुइया किंवा वालचंद हिराचंद या उद्योगाधीशांपुढें तो कोण्या झाडाचा पाला? या उद्योगाधीशांची राज्ययंत्रावर आज जी हुकमत आहे, तिच्यामुळें ब्राह्मण पुढारी किंवा ब्राह्मण मंत्री हा त्यांच्या हातचें कळसूत्री बाहुलं होऊन बसलेला दिसत नाहीं काय? त्यामुळें ब्राह्मणांविषयीं ब्राह्मण म्हणून जितकी चीड आहे, तितकीच चीड तो मराठी जनतेची पिळणूक करणाऱ्या उपऱ्या भांडवलशाहीचा हस्तक बनल्याबद्दलहि आहे. आज प्रांतिक काय किंवा मध्यवर्ती काय मंत्रिमंडळांत जे ब्राह्मण अधिकारपदांवर विराजमान झालेले आहेत, त्यांना तीं महत्पदें केवळ त्यांच्या गुणांमुळें मिळालेलीं नसून, काँग्रेसश्रेष्ठींच्या तंत्राबरहुकूम वागण्याचें जें मिंधें धोरणं त्यांनीं स्वीकारलेलें आहे, त्यामुळेंच खरोखरी मिळालेली आहेत, हें न कळण्याइतके कांहीं लोक दुधखुळे नाहींत--"

मी हें बोलत आहें, तोंच सौ. शांताबाई माडीवरून खालीं आली आणि म्हणाली, " तुकडोजी महाराजांचं भाषण चांगलं झालं एकंदरींत. पण ' आजसे बम्मन हरिजन हो गया और हरिजन बम्मन हो गया ! ' हें जें वाक्य त्यांनीं

उच्चारलं, त्याचा अर्थ लोक काय करतील आणि त्यांतून कोणता अनर्थ उद्भवेल हें सांगणें कठीण आहे—"

"बरोबर आहे तुझी भीति. एका ब्राह्मण इसमाच्या हीन कृत्यामुळं सर्व ब्राह्मण जातीलाच मुळीं हीन ठरविणारे हें जें विधान महाराजांनीं केलं, तें त्यांच्या संतपणाच्या भूमिकेला मुळींच शोभणारं नाहीं. आजच्या खवळलेल्या जमावापुढें त्यांनीं केलेलं हें विधान म्हणजे दारूच्या तापलेल्या उघड्या ढिगाऱ्यावर शिलगावून फेकलेली काडीच होय! त्यांच्यासारख्या व्यवहारचतुर सत्पुरुषानं असं भरमसाट, अनर्थकारक विधान सध्यांच्या नाजुक, क्षुब्ध परिस्थितींत करावं हें दुर्दैव आहे खरोखरी—"

"मला राहून राहून आश्चर्य वाटतंय आज तें याच गोष्टीचं कीं, एका माथेफिरू इसमाच्या कृत्याबद्दल त्याच्या साऱ्या जातीला जबाबदार समजून लोक जे शिव्याशाप देत सुटले आहेत, ते कोणत्या तत्त्वाला किंवा तर्कशास्त्राला धरून?—"

"त्यांत तत्त्व नाहीं किंवा तर्कशास्त्रहि नाहीं. ब्राह्मणजातीच्या श्रेष्ठतेचा जो जुलूम हजारों वर्षे ब्राह्मणेतरांवर चालू आहे, त्या जुलमासंबंधींच्या क्रोधाचा आणि द्वेषाचा हा एक नैमित्तिक स्फोट आहे आणि ब्राह्मणांनीं तो मुकाट्यानं सहन केला पाहिजे—"

"कांहीं लोक गोडसे हा 'चित्पावन' आहे या मुद्यावरच कटाक्षानें जोर देऊन चित्पावन ब्राह्मण आणि पेशवाई यांचं हें पाप आहे, असा प्रचार करीत आहेत आणि त्या प्रचारांत चगले विचारी कार्यकर्ते ब्राह्मणसुद्धां सामील झालेले दिसतात. अर्थात् हा सगळा प्रचार म्हणजे खाजगी बैठकींतली कुरबुर आहे बरें कां!—"

"पण, त्यांना असं उलट विचारतां येण्यासारखं आहे कीं, याच चित्पावन ब्राह्मणांत लोकहितवादी, रानडे, आगरकर, गोखले, कर्वे, देवधर यांच्यासारखे कडवे कर्ते समाजसुधारक निर्माण झाले नाहींत काय? पेशवाईच्या उत्तर काळांत एका विशिष्ट जातीचं वर्चस्व राज्यकारभारांत झालें, त्या प्रमाणांत इतर जातींचा कोंडमारा झाला, ब्राह्मणेतरांतील कांहीं जातींची छळणूक करण्यांत आली आणि इंग्रजी अमल सुरू झाल्यावरहि हें पेशवाईतील जातीय वर्चस्व इंग्रजांनीं आपल्या

सोयीसाठीं कां होईना पुढें चालू राहूं दिलें, या सगळ्या गोष्टी खऱ्या आहेत; व न्या. रानडे यांनीहि पेशव्यांच्या रोजनिश्यांना लिहिलेल्या प्रस्तावनेंत त्या कबूल केलेल्या आहेत. पण, या सगळ्या गोष्टी कबूल केल्यावरहि जी एक गोष्ट शिल्लक राहते ती ही कीं, इंग्रजी राजवट स्थापन झाल्यापासून गेल्या सव्वाशें वर्षांत महाराष्ट्रामध्यें सामाजिक आणि राजकीय क्षेत्रांत क्रांति घडवून आणण्याचा प्रयत्न जर कोणत्या एका जातीनें बेदरकारपणानें केला असेल, समाजाची आमूलाग्र पुनर्घटना व्हावी म्हणून जनरोष आणि राजरोष कोणत्या एका जातीनें निर्भयतेनें सहन केला असेल, तर तो चित्पावनांनीच होय. महाराष्ट्राचें आजचें बौद्धिक जीवन हा बव्हंशीं त्यांच्या कर्तृत्वाचा परिपाक आहे. इंग्रजांनी हिंदुस्थान जिंकण्यापूर्वी आपलें साम्राज्य या देशांत अटकेपासून रामेश्वरापर्यंत गाजत होतें हा अहंकार कदाचित् चित्पावनांच्या देशभक्तीच्या मुळाशीं असेल; व पारतंत्र्याविषयींची, ब्रिटिशांच्या सत्तेविषयींची जी चीड चित्पावनांच्या कर्तबगारीला प्रेरक झाली, तिचें बीजहि कदाचित् स्वतःचें राज्य पुन्हा स्थापन करण्याच्या लालसेंत असेल. पण, तो अहंकार आणि ती चीड महाराष्ट्राच्या जागृतीला आणि उन्नतीला कारण झाली, हें विसरून कसें चालेल? वास्तविक चित्पावन आणि मराठा या दोन जातींशीं लढूनच इंग्रजांनीं हिंदुस्थानाची अधिसत्ता संपादन केली; व आजहि मराठ्यांचीं अनेक छोटीं मोठीं संस्थानें हिंदुस्थानांत अस्तित्वांत आहेत. किंबहुना मराठा जातच गेलीं हजार वर्षें महाराष्ट्रांत राज्यसत्ता उपभोगीत आलेली आहे. पण अशा या पराक्रमी जातीच्या 'राजन्यां' त पारतंत्र्याविषयींची प्रतिकारक चीड किंवा स्वतःच्या कर्तबगारीविषयींचा कार्यप्रेरक अहंकार उत्पन्न होऊं नये आणि एकट्या चित्पावनांनीं महाराष्ट्राच्या पुनरुत्थानाची धुरा आपल्या शिरावर घ्यावी, हें त्यांचें वैशिष्ट्य त्यांना किती भूषणास्पद आहे! देवगिरीच्या यादव साम्राज्याचा विध्वंस झाल्यानंतर ज्या मराठ्यांनीं सतत तीनशें वर्षें मुस्लिम बादशाह्यांशीं झुंज देऊन पुन्हा महाराष्ट्र राज्य स्थापन केलें, ज्या मराठा जातींत शहाजी आणि शिवाजी यांच्यासारखे सेनानी आणि मुत्सद्दी उत्पन्न होऊन त्यांनीं महाराष्ट्रांत 'केवळ नूतन सृष्टिच निर्माण केली', ती प्रतापी मराठा जाति इंग्रजापुढें हतबुद्ध आणि हतबल

व्हावी, याचें कोणाला नवल वाटणार नाहीं ? पण, कोणत्याहि कारणामुळें असो, पारतंत्र्याच्या उच्छेदाचें आपलें स्वाभाविक परंपरागत कर्तव्य मराठ्यांनीं केलें नाहीं आणि त्यांची जागा घेऊन चित्पावनांनीं तें केलें, याबद्दल त्यांचा आपण गौरव करावयाचा कीं त्यांच्या नांवानें जळफळावयाचें ? 'ब्राह्मणपदपादशाही'ची पुन्हा स्थापना करण्याच्या हेतूनें चित्पावनांनीं हा सगळा खटाटोप केला असें म्हणणें अत्यंत नादानपणाचें आहे. लोकशाहीच्या या युगांत कोणत्याहि एका आणि तेंहि अत्यल्पसंख्य जातीचें वर्चस्व टिकणार नाहीं, हें न कळण्याइतके जर चित्पावन निर्बुद्ध असतील, तर त्यांना पाताळयंत्री ठरवून ब्राह्मणेतरांना त्यांच्या नांवानें खडे फोडण्याचें कांहींच कारण नाहीं. आजचें युग हें जसें एका परीनें ' लोकयुग ' तसेंच दुसऱ्या परीनें ' अर्थयुग ' हि आहे; व म्हणून जिच्यामागें बहुमत नाहीं किंवा जिच्या हातीं भांडवल नाहीं अशी कोणतीहि व्यक्ति किंवा जाति राजकारणांत वर्चस्व गाजवूं शकणार नाहीं. चित्पावन जरी कदाचित् पाताळयंत्री आणि सत्ताकांक्षी असले, तरी ते अत्यल्पसंख्य आहेत; व आपल्या या अत्यल्पसंख्यत्वाची त्यांना पूर्ण जाणीवहि आहे. म्हणूनच, पेशवाईचें पुनरुज्जीवन करण्याच्या आकांक्षेचा जो आरोप त्यांच्यावर किंवा इतरहि ब्राह्मणांवर केला जातो, तो अगदीं अप्रयोजकपणाचा वाटतो—"

"हिंदुस्थानांतल्या इतर कोणत्याहि प्रांतांतील जनतेला 'ब्राम्हणपदपादशाही' स्थापन होण्याची भीति वाटत नाहीं; व त्या प्रांतांतून ब्राम्हण–ब्राम्हणेतर वादहि नाहीं. मग महाराष्ट्रांत ब्राम्हण आणि मराठे हे तुल्यबल असतां ही भीति आणि हा वाद कां उत्पन्न व्हावा ? "

" याला कारण महाराष्ट्राचा गेल्या दोनशें वर्षांचा इतिहास. हिंदुस्थानाच्या इतर भागांत एकाद दुसऱ्या ब्राम्हण राजवंशानें प्राचीन काळीं काय साम्राज्य-वैभव भोगलें असेल, तेवढेंच. पण, महाराष्ट्र हा एकच असा देश सबंध हिंदुस्थानांत आहे कीं, ज्या देशांत दोनशें वर्षांपूर्वी पराक्रमी ब्राम्हण राजवंश निर्माण झाले आणि त्यांनी आपल्या दिग्विजयाचे झेंडे आसेतुहिमाचल नाचवून हिंदुस्थानांत ब्राम्हणपदपादशाही स्थापन होत असल्याचा उज्ज्वल आभास कांहीं काळ उत्पन्न केला ! ' धन्य वंश एकेक पुरुष जणुं कल्पवृक्ष पिकले ' असा जो पेशव्यांच्या घराण्याचा यथार्थ पोवाडा प्रभाकर शाहिरानें रुद्ध कंठानें

गाइला आहे किंवा 'ब्राम्हणी राज्य जोरदार घोड्यावर स्वार होते शीपाई' असा जो पेशव्यांच्या जबर सद्दीचा प्रौढ प्रताप रामजोश्यानें मुक्त कंठानें वर्णिला आहे, तो याच उध्वस्त आभासाच्या उद्दाम अभिनिवेशानें!! थोरल्या बाजीरावापासून तों झाशीच्या राणीपर्यंत जे राजतेजानें रणांगणावर तळपणारे प्रतिसूर्यच असे भीमपराक्रमी ब्राह्मण सतत दीडशें वर्षे महाराष्ट्रांत एकामागून एक उदयाला आले आणि पारतंत्र्याच्या पुढील अवकाळांतहि ज्यांच्या त्या उदग्र तेजाचा अंश वासुदेव बळवंत फडके, महादेव गोविंद रानडे, बाळ गंगाधर टिळक, गोपाळ कृष्ण गोखले प्रभृति ब्राम्हणांच्या लोकोत्तर कर्तृत्वांत आविर्भूत झालेला पुनः पुन्हा दृष्टीस पडला, त्या प्रतापी ब्राम्हण राज्यकर्त्यांच्या स्मरणामुळें ब्राम्हणेतरांना अजूनहि अशी भीति वाटते कीं, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावर महाराष्ट्रांत पुन्हा कदाचित् 'ब्राम्हणपदपादशाही' स्थापन होईल!—"

"पण आजच्या संपूर्णपणे बदललेल्या काळांत जुन्या इतिहासाच्या पोटीं पैदा झालेली ब्राम्हणेतरांची ही भीति वेडगळपणाचीच नाहीं कां?—"

"निस्संशय! पण, त्या भीतीला आणि त्याहिपेक्षां तिच्यांतून उफाळलेल्या ब्राम्हण-ब्राम्हणेतर वादाला आणखीहि कांहीं सामाजिक आणि राजकीय कारणें आहेत, हें विसरून चालणार नाहीं. हिंदुस्थानांतील, विशेषतः उत्तर भारतांतील, कोणत्याहि प्रांतांत ब्राम्हण-ब्राम्हणेतर वाद उत्पन्न झालेला नाहीं, याचें कारण अगदीं उघड आहे. उत्तर हिंदुस्थानांतील बहुतेक प्रांतांतून ब्राह्मण हा सामान्यतः अक्षरशत्रु, मागासलेला आणि दरिद्री असून, ब्राम्हणेतर हा बव्हंशी सुसंस्कृत, संपन्न आणि सत्ताधारी आहे. 'पंडत,' 'महाराज' वगैरे उत्तर हिंदुस्थानांतील ब्राम्हणवाचक शब्द हे जे आपल्याकडे आचारी, पाणके, हुजरे, दरवान वगैरे शब्दांचे वाचक समजले जातात ते याच कारणामुळें. पंजाब, युक्तप्रांत, बंगाल, बिहार, ओरिसा, गुजरात वगैरे नर्मदोत्तर प्रांतांतून कायस्थ, खत्री, जाट, वैद्य, पाटीदार, वैश्य, कलवार, रजपूत, मारवाडी, भाटिये वगैरे ब्राम्हणेतर जाति याच सुविद्य, संपन्न आणि सत्ताधारी असून, त्या त्या प्रांताच्या राजकारणांत काय किंवा व्यापारांत काय त्यांचेच सर्वत्र वर्चस्व आहे. उत्तर हिंदुस्थानांत 'मुनशी' हा शब्द जो 'कायस्थ' या शब्दाचा जणुं पर्याय बनलेला आढळतो, तो त्या जातीच्या सांस्कृतिक आणि राजकीय वैशि-

ष्ट्याचा द्योतक होय. महाराष्ट्राच्या किंबहुना दक्षिण हिंदुस्थानाच्या सांस्कृतिक आणि राजकीय जीवनांत आज ब्राम्हणाला जें स्थान आहे, तेंच स्थान उत्तर हिंदुस्थानांत मुख्यत: कायस्थाला आहे. त्यामुळें नर्मदोत्तर प्रांतांत ब्राम्हण—ब्राम्हणेतर वाद उद्भवण्याचें मुळीं कारणच नाहीं दुसरीहि एक महत्वाची गोष्ट या बाबतींत लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही कीं, उत्तर हिंदुस्थानांतील पंचगौड ब्राम्हण हे बहुतेक मांसाहारी किंवा मत्स्याहारी असल्याकारणानें आहारभेदामुळें उद्भूत होणारी स्वच्छास्वच्छतेची, उच्चनीचतेची किंवा स्पृश्यास्पृश्यतेची विषम भावना तेथील ब्राम्हण—ब्राम्हणेतरांत नाहीं. उलट, दक्षिण हिंदुस्थानांतील पंचद्राविड ब्राम्हणांत शाकाहार हाच पवित्र आणि श्रेष्ठ मानला जात असल्याकारणानें, मांसाहारी जातींना अपवित्र आणि हीन लेखण्याची प्रवृत्ति त्यांच्यांत निर्माण होऊन विटाळाचें बंड बेसुमार बोकाळलें; व स्वत:ला स्वच्छ आणि उच्च समजणाऱ्या ब्राह्मणांच्या सोवळेपणाविषयीं विलक्षण चीड ब्राह्मणेतरांत साहजिकच पैदा झाली. महाराष्ट्रांतील शाकाहारी द्राविड ब्राह्मणांची स्वत:च्या श्रेष्ठतेविषयींची ही घमेंड तर इतकी विकोपाला गेलेली आहे कीं, कोंकणकिनाऱ्यावर स्थायिक झालेल्या सारस्वतांसारख्या अत्यंत शुचि, सुसंस्कृत आणि वेदपारंगत ब्राह्मण जातीलाहि, ते शाकाहारी नसल्यामुळेंच केवळ, दक्षिणी ब्राह्मण आपल्यापेक्षां हलके गणतात! महाराष्ट्र ब्राम्हण हा आहारमूलक असहिष्णुतेचा एक अजब नमुना आहे; व म्हणूनच महाराष्ट्रांतील जातिभेदाची धार या आहारभेदामुळें अधिक तीव्र झालेली आहे. उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं ब्राम्हण जाति मत्स्याहारी आणि मांसाहारी असल्यामुळें जातिभेदाची ही आहारभेदामुळें वाढलेली तीव्रता तेथें दृष्टीस पडत नाहीं—"

"पण मद्रास प्रांतांत कांहीं ब्राम्हण कधीं राज्यकर्ते झाले नाहींत. आणि ब्राह्मणेतर चळवळीचा उगम तर प्रथम त्या प्रांतांत होऊन नंतर तिचें लोण महाराष्ट्रांत येऊन थडकलें— "

"बरोबर आहे. मद्रास प्रांत हें हिंदुधर्मांतील कर्मठपणाचें आगर आहे. श्रीशंकराचार्यांपासून तों श्रीरामानुजापर्यंत आधुनिक काळांतील हिंदु धर्मांतले सारे आचार्य या द्राविड प्रांतांत उदयाला आले; व त्यांनीं जातिबंधनें

कडक करून आजचें कर्मकांड आणि पंथोपपंथ यांची पैदास केली. त्यामुळें जातिभेदाचें आणि अस्पृश्यतेचेंहि अत्यंत अमानुष स्वरूप मद्रास प्रांतात अनुभवाला येतें. त्याची इंग्रजी आमदानींतील प्रतिक्रिया म्हणजेच खरोखरी ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचा उद्भव! दुसरी गोष्ट अशी कीं, ईस्ट इंडिया कंपनीनें मद्रासच्या किनाऱ्यावर आपला पाय रुजतांच कारकुनी कामांत तरबेज असलेल्या तीव्र बुद्धीच्या लवचिक, कष्टाळू तामिळ ब्राह्मणाला हाताशीं धरला; व त्याच्या मदतीनें आपल्या कारभाराची घडी सर्वत्र सुरळीत बसविली. त्यामुळें, मद्रासी ब्राह्मण हा जरी प्रत्यक्ष राज्यकर्ता कधीं झाला नाहीं, तरी इंग्रजांचा इमानी राजनिष्ठ हस्तक म्हणून त्याचें जें प्राबल्य राज्यकारभाराच्या हर एक खात्यांत माजलें, तें त्याच्या धार्मिक वर्चस्वामुळें आधींच अतिशय दुखावलेल्या ब्राह्मणेतरांच्या डोळयांवर आलें; व ब्राह्मणांविषयीं दुहेरी चीड त्यांच्या मनांत उत्पन्न होऊन तिचा स्फोट ब्राह्मणेतर चळवळीच्या रूपानें अखेर झाला!"

"पण त्या चळवळीचें पर्यवसान शेवटीं काय झालें? ब्राह्मणेतर पुढारी ब्रिटिश सरकारचे हस्तक होण्यांतच कीं नाहीं? ब्राह्मणांपैकीं कांहींनीं जशी ब्रिटिश सरकारची मर्जी संपादन करून आपलें कोटकल्याण करून घेतलें, तशीच कांहींनीं ब्रिटिश सत्तेविरुद्ध झुंज देण्यासाठीं ठाण मांडून आनंदानें सर्वनाशाची आपत्ति पत्करली. पण, ब्राह्मणांच्या धार्मिक म्हणा वा राजकीय म्हणा वर्चस्वाविरुद्ध बंड पुकारणाऱ्या ब्राह्मणेतरांनीं मात्र, जीहुजूर वृत्तीच्या ब्राह्मणांचें अनुकरण करून, भराभर सरकारी नोकऱ्या पटकविल्या आणि आपलें स्वतःचें भलें करून घेतलें! त्यांच्यापैकीं एकहि पुढारी ब्रिटिश सत्तेविरुद्ध सामना द्यावयाला पुढें आला नाहीं. पण, बहुसंख्य ब्राह्मणेतर समाजांतील एकादा पानगल, एकादा पेत्रो, एकादा रेड्डी, एकादा मुदलियार, एकादा जाधव, एकादा कंबळी, एकादा कूपर, एकादा देशमुख किंवा एकादा नायडू हा दिवाण होणें म्हणजे कांहीं ब्राह्मणेतरांतील असंख्य शेतकरी-कामकरी श्रमजीविकांच्या हातीं सत्ता येणें नव्हे! १९३० सालीं ब्रिटिश सरकार कॉंग्रेसशीं बरोबरीच्या नात्यानें वाटाघाटी करावयाला तयार होऊन तिच्या हातीं राज्यसत्ता येण्याचीं चिन्हें दिसूं लागेपर्यंत ब्राह्मणेतर चळवळींतील एकहि म्होरका कॉंग्रेसकडे फिरकला नाहीं. सारे ब्रिटिशांची कृपा संपादन करून येन केन प्रकारेण बड्या नोकऱ्या मिळविण्याच्या पोटार्थी राजकारणांत गर्क होते.

सुशिक्षित ब्राह्मण आणि सुशिक्षित ब्राह्मणेतर यांची धार्मिक जात भिन्न असली, तरी राजकीय जात मात्र खरोखरी अभिन्न आणि एकच आहे. या दृष्टीनें ब्राह्मणेतर चळवळीला बहुजनसमाजाची चळवळ म्हणणें हा वस्तुविपर्यासच ठरणार नाहीं काय ?"

"खरे आहे तुझें म्हणणें. मद्रास प्रांतांतील काय किंवा महाराष्ट्रांतील काय ब्राह्मणेतर चळवळीच्या प्रवर्तकांपुढें सरकारी नोकऱ्या संपादन करण्यापलीकडे दुसरें कोणतेंच साध्य नव्हतें. श्रमजीवी बहुजनसमाजाच्या उन्नतीचा कोणत्याहि प्रकारचा मूलगामी आर्थिक किंवा राजकीय कार्यक्रम त्या चळवळीच्या प्रवर्तकांपुढें नव्हता. उलट, स्वार्थासाठीं परक्या ब्रिटिश साम्राज्यशाहीची तळी उचलून धरण्यांत त्यांनीं धन्यता मानली आणि राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या प्रत्येक आंदोलनाला त्यांनीं निकरानें विरोध केला. शेतकरी-कामकरी जनतेच्या दास्य-मोचनाकरितां परकीय साम्राज्यशाही व स्वकीय नोकरशाही आणि भांडवलशाही यांच्याशीं झुंज देण्यासाठीं आवश्यक असलेली मूलगामी राजकीय आणि आर्थिक दृष्टीच मुळीं त्यांना कधीं प्राप्त झाली नाही. अशा स्थितींत, ब्राह्मणांचे अनुकरण करून नोकऱ्या पटकावण्यांत त्यांनीं आपल्या चळवळीचें सार्थक मानलें, यांत नवल काय ? त्यामुळें श्री. केशवराव जेधे यांच्यासारखे नवी क्रांतिवादी दृष्टि नसलेले पण बहुजनसमाजाच्या उद्धारासाठीं तळमळणारे जे निःस्पृह, प्रामाणिक कार्यकर्ते ब्राह्मणेतर पक्षांत होते, ते अखेर काँग्रेसच्या किसान-कामगार राज्याच्या समाजवादी घोषणेनें मोहित होऊन सतरा वर्षांपूर्वी कांग्रेसला येऊन मिळाले—"

आमचें हें बोलणें चालू असतांनाच 'नरकेसरी' प्रेसचा एक कामगार गडबडीनें आंत आला आणि म्हणाला—

"भाऊसाहेब, आज रात्रीं आपण प्रेस उघडूं नये असं वाटतं मला—"

"का रे ? काय झालं ? मघाशीं तर तुम्ही सगळे अंक काढण्याच्या निश्चयानं आलां होतात—"

"हो. पण आतां सभेंत जें मी ऐकलं, त्यामुळं माझी खात्री होऊन चुकली आहे कीं, रात्रीं जर आपला प्रेस उघडा राहिला, तर कदाचित् प्रेसवर हल्ला करून तो जाळण्यांत येईल —"

" कोणाचं बोलणं ऐकलंस तूं ?—"

" नांवं सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं, भाऊसाहेब ! तुमच्याकडे नेहमीं येणारे तरुण लोकच आज वाटेल तें बडबडत होते तुमच्याबद्दल ! मी तें सगळं ऐकून घेतलं मुकाट्यानं न् तुम्हांला सावध करण्यासाठीं तडक इथं आलों--"

" मग प्रेस आज उघडायचा नाहीं न् उद्या अंक काढायचा नाहीं म्हणतोस तर ?—"

" हो. नाहीं तरी मिलचा हरताळ आहेच उद्यां. मग आपण तरी प्रेस उघडून धोका का घ्यावा ?--"

" ज्यांना प्रेस जाळायचाय ते तो बंद असतांनाहि जाळूं शकतात कीं !-"

" ते खरंच ! पण शहरांत हरताळ असतांना आपण प्रेस उघडा ठेवला अशी कुरापत काढून प्रेसवर हल्ला करण्याची तरी संधि कां द्यावी त्यांना ?—"

इतक्यांत श्री. अडकूजी बोरकर कॉपी नेण्यासाठीं आले.

" हा काय म्हणतोय ऐकलंस, अडकू ? मला वाटतं, प्रेस उघडूं नये आज आपण. निदान आपल्या चुकीमुळें प्रेस जाळला गेला असं तरी म्हणतां येणार नाहीं उद्यां कोणाला ! मग काय व्हायचं असेल तें होईल !--"

" तो म्हणतो ते खरं आहे. लोक आपल्या प्रेसविषयीं वाटेल तें बोलताहेत आज—"

" म्हणूनच, मला वाटतं, आज रात्रीं काम करूं नये आपण—"

तोंच श्री. सीतारामजी भाकरे आले. त्यांना हा बदललेला विचार सांगून मी म्हटलें, " तुम्ही जातांना बँकेच्या पहारेकऱ्यांना आपल्या प्रेसकडे लक्ष द्यायला बजावून सांगा. या जादा कामाबद्दल त्यांना पैसे देऊं मागाहून. पण, आपला प्रेस बँकेच्या आवारांत आहे आणि त्याला आग लागल्यास ती बँकेलाहि लागेल हें लक्षांत आणून द्या नीट त्यांच्या-—"

" ठीक आहे. त्यांना काय सांगायचं तें सांगतों आम्ही. पण तुम्ही स्वतःच्या बाबतींत काय करायचं ठरवलंय ?--"

" काय करणार ? घरीं स्वस्थ बसून काय घडेल तें मुकाट्यानं सोसणार—"

" आम्ही सोबतीला यायला तयार आहोंत आपल्या-"

आमचे दुय्यम फोरमन श्री. पुरुषोत्तमराव कुकडे म्हणाले.

" पण येऊन उपयोग काय ? घरावर जर हल्ला झालाच, तर आपण चार माणसं काय प्रतिकार करूं शकतों ? अशा वेळीं घरांतून मुकाट्यानं बाहेर पडून घर हल्लेखोरांच्या स्वाधीन करून मोकळं होणं हाच मार्ग उरतो एक ! शिवाय भास्करराव आणि मधुकरराव येणारच आहेत सोबतीला. नाहीं तरी रात्रभर जागायचंच आहे आज. तेव्हां गप्पा मारूं मजेंत !—"

× × × ×

कामगार निरोप घेऊन गेल्यावर त्या चिंताग्रस्त मनःस्थितींतच आम्ही जेवणें उरकून घेतलीं; व रेडियो लावून ऐकत बसलों.

तोंच भास्कर आला. त्याला मी विचारलें—

" काय रे ? काय ताजी बातमी ? "

" ताजी बातमी बरी आहे थोडीशी ! आज रात्रीं तरी आपलं घर जाळलं जाणार नाहीं. उद्यांचं उद्यां !—"

" म्हणजे आज आतां निश्चिंत मनानं झोप काढायला हरकत नाहीं म्हणतोस ?—"

" छे ! असं कुठं म्हटलं मी ? अहो, तिथं मिनिटा मिनिटाला नव्या कल्पना सुचताहेत आणि नवे बेत रचले जाताहेत ! या घटकेला तुमचं घर जाळूं नये अशी कल्पना आहे, एवढाच माझ्या म्हणण्याचा अर्थ—"

तो हें बोलत आहे, तोंच मधु आला आणि म्हणाला—

" या मिनिटामिनिटाला बदलणाऱ्या बातम्यांत कांहीं अर्थ नाहीं, भाऊसाहेब ! आपण रात्रभर जागता पहारा ठेवला पाहिजे हेंच खरं—"

" पण तुझ्या कानांवर काय आलंय तें तर सांगशील कीं नाहीं—"

" माझ्या कानांवर ढीग बातम्या आल्या आहेत न् त्या एकाहून एक अजब आहेत—"

" मग एकादा नमुना तर ऐकव आम्हाला—"

" नमुना ? एक बातमी अशी कीं, काँग्रेसविरुद्ध कलम चालविणारे तुमचे हात तोडून टाकणार आहेत !—"

" ऊंः ! हात तोडून काय होणार रे ? हात बिचारे काय फक्त लेखणी चालवितात. त्या लेखणींतून उतरणारे विचार पैदा होतात डोक्यांत !—"

"मग त्यांना काय हें समजत नाहीं म्हणतां कां? हा मधु काय सांगतो तुम्हाला, भाऊसाहेब? तिथं एकानं अशी शक्कल काढली होती आज कीं, तुम्हाला पोत्यांत घालून शुक्रवार तलावांत बुडवावं! म्हणजे हात न् डोकं यांना एकदमच जिवंत जलसमाधि!!—"

"ही शक्कल मात्र नामी आहे खरीच, भास्कर! आणि ज्यानं ती काढली, त्यानं मराठ्यांचा इतिहास अगदीं बारकाईनं वाचलेला दिसतोय!! अरे, बाळाजी विश्वनाथ पेशव्याचा थोरला भाऊ जानो विश्वनाथ याला जंजिऱ्याच्या नबाबानं पोत्यांत घालून समुद्रांत बुडवला! त्या अत्याचारामुळं बाळाजी विश्वनाथ पळून घाटावर शाहूमहाराजांच्या आश्रयाला आला न् त्याच्या पराक्रमानं पुढं पेशवाई स्थापन झाली. तेव्हां, असा ऐतिहासिक मृत्यु आला, तर तें एक भाग्यच म्हटलं पाहिजे!—"

"उद्या पहांटेपर्यंत माणसांना हाल हाल करून छळण्याच्या न् मारण्याच्या मुसलमानांच्या इतिहासांतील क्रूर कृत्यांवर मात करणाऱ्या अशा आणखी किती शक्कली पैदा होताहेत पहावं! यापुढं जें जें काय वाट्याला येईल, तें तें सगळं भाग्यच आहे आपलं!!—"

"आणि ही सगळी अमानुष कृत्यं गांधीजींच्या न् अहिंसेच्या नांवावर होणार ना?—"

"होय, बाई. गोडश्यानं गांधीजींचा खून केला. आतां हे नागपुरांतले आमचे गांधीभक्त तरुण त्याचा सूड म्हणून गांधीवादाचा खून करायला सज्ज झाले आहेत!—"

"बिचारे महात्माजी! त्यांच्या जिवंतपणीं तर त्यांच्या अनुयायांनी त्यांची फसवणूक केलीच. पण आतां त्यांच्या मृत्युनंतरहि त्यांच्या तत्वांची आणि स्मृतीची विटंबना करायचा चंग बांधलेला दिसतोय त्यांनीं!—"

"रात्र बहुतेक शांतपणानं पार पडेल असं वाटतं मला. पहाटे सभा आहे. तिथं पक्क्या याद्या न् कार्यक्रम तयार होईल—"

"आणि मग उद्यां सकाळीं 'महात्मा गांधी की जय' म्हणत लुटालुटीला जाळपोळीला न् मारहाणीला सुरवात होईल असं म्हणणं आहे कां तुझं? गुंडगिरीची इतकी पद्धतशीर योजना आखली जाते आहे शहरांत न् आपल्या मंत्रि-

मंडळाला कांहींच का दाद नाहीं या प्रकाराची ! मंत्रिमंडळ जिवंत आहे कीं घोर लागलाय त्याला अखेरचा ?—"

" महात्माजींच्या खुनाच्या दुःखानं आपलं मंत्रिमंडळ निश्चेष्ट झालेलं दिसतंय ! नाहीं तर आज भर दुपारी ' आदेश ' कचेरी फोडली गेल्यावर त्यानं नाकेबंदी केली नसती कां शहरांत आणि संरक्षण दिलं नसतं कां ' तरुण भारत ' कचेरीला ?- "

" कदाचित् परस्पर काटा काढायचा असेल मंत्रिमंडळाला ' तरुण भारता 'चा ! आपल्या हस्तकांकडून नालस्तीची मोहीम करवून आणि सरकारी जाहिराती बंद करूनहि ' तरुण भारता 'चं बालाग्रहि आपण वाकडं करूं शकलों नाहीं, म्हणून जळफळाट चाललाच आहे सध्यां त्यांच्या जिवाचा. आतां या संधीचा फायदा घेऊन ' तरुण भारता 'वर परस्पर मारेकरी घालण्याचा डाव असेल मंत्रिमंडळाचा ! एरवीं, शहरांत इतकी उधम सुरू असतां कोणतं जबाबदार, विवेकी मंत्रिमंडळ डोळ्यांवर कातडं ओढून स्वस्थ बसलं असतं ?—"

" आणि तरी तूं मला सारखं सांगते आहेस सकाळपासून पोलिस-प्रोटेक्शन मागण्याबद्दल ! ज्या मंत्रिमंडळाला दिवसाढवळ्या शहराच्या मुख्य चौकांत झालेली एका वर्तमानपत्राच्या कचेरीची नासधूस पाहूनहि जाग आला नाहीं किंवा अत्याचारी भाषा उघडउघड बोलली जात असतांहि जादा बंदोबस्त करण्याची बुद्धि ज्या मंत्रिमंडळाला होत नाहीं, तें मंत्रिमंडळ काय संरक्षण देणार आपल्याला ? कदाचित् ' तरुण भारता 'चा आणि माझाहि नाश परस्पर या प्रक्षोभांत व्हावा, असाहि डाव असेल आपल्या धूर्त, खुनशी मंत्र्यांचा !— "

" मी संरक्षण मागायला सांगितलं तें कांहीं याचना किंवा कृपा म्हणून नव्हे. तुम्ही कर भरणारे नागरिक आहांत; व म्हणून संरक्षण मागायचा हक्क आहे तुम्हांला. तो हक्क तुम्ही बजावावा एवढंच म्हणणं आहे माझं. तुम्हाला संकटाचा आगाऊ इषारा मिळालेला असतांनासुद्धां तुम्ही सरकारला त्यासंबंधीं माहिती दिली नाहीं न् संरक्षण मागितलं नाहींत, असा ठपका मंत्रिमंडळाला पुढं तुम्हाला देतां नेऊं नये, म्हणून मी आग्रह केला संरक्षण मागायचा— "

" पण आपले मंत्री कांहीं आंधळे किंवा बहिरे नाहींत. कोल्हापूर, पुणें आणि मुंबई येथें काय प्रकार घडले, हें आपल्या प्रमाणंच रेडियोवर ऐकलं असलं पाहिजे त्यांनीं. खुद्द नागपुरांत गेले दोन दिवस खवळलेले लोक कोणती भाषा बोलताहेत, कोणत्या गटाचीं पाऊलें कोणत्या विचारानं पडताहेत आणि कोणाचीं घरं जाळण्याच्या याद्या कुठं तयार होत आहेत, हें न कळण्याइतकं कां मंत्रि-मंडळ नादान आहे आपलं ? —"

" आपले मंत्री नादान आहेत, खुनशी आहेत कीं धूर्त आहेत, हें माझ्या-पेक्षां तुम्हांलाच जास्त माहित आहे खरोखरी ! ते पक्षद्वेषानें म्हणा किंवा व्यक्तिद्वेषानें म्हणा कितीहि विवेकभ्रष्ट झालेले असले, तरी त्यांना हें कळायला हवें कीं, आज त्यांना अप्रिय असलेल्या व्यक्तींचा, वृत्तपत्रांचा किंवा पक्षांचा नाश करण्यासाठीं जर त्यांनी गुंडगिरीला मोकाट वाव दिला, तर उद्यां मंत्रिमंडळाचं एकादं कृत्य न आवडल्यास कायदा हातीं घ्यावयाला सवकलेली तीच गुंडगिरी सरकारवरहि उलटल्याशिवाय राहणार नाहीं— "

" उलटेल तेव्हां पाहून घेतील ! पण आज तर परस्पर आपला काटा काढला जाण्याचा योग आलाय ना ? तो त्यांनीं का दवडावा ? — "

" छान ! हीच नीति शिकवली वाटतं गांधीजींनीं या मंत्र्यांना ? — "

" अहो, कसली नीति घेऊन बसला आहांत, बाई ! या मंत्र्यांजवळ ना कांहीं नीति ना तत्व. त्यांच्यापैकीं एकाची तरी गांधीवादावर श्रद्धा आहे का ? आपले एक मंत्री तर उघड उघड गांधीवादाची टिंगल उडवतात खाजगी संभाषणांत ! गांधीभक्ति हें फक्त त्यांचं राजकीय भांडवल आहे. त्याच्या जोरा-वर सत्ता आणि संपत्ति संपादन करण्यापलिकडे दुसरं कांहीं साध्य नाहीं त्यांच्या डोळयापुढं— "

" पण आपल्याला काय करायचंय मंत्र्यांच्या नीतीची चर्चा करून ? त्यांच्या जवळ संरक्षण मागायचं नाहीं हें एकदां ठरल्यानंतर मग त्यांच्यासंबंधीं कोण-त्याच प्रकारचा विचार करायचं कारण नाहीं आपल्याला. मंत्रिमंडळ आणि सरकार यांच्याविषयींचा विश्वास, आदर आणि धाक कमी व्हायला असले प्रकार कारण होतील, याचं मात्र दुःख वाटतं मला— "

मी तीं कटुतर होत चाललेली चर्चा बंद करण्याच्या उद्देशानें म्हटलें रेडियो-वर करुण स्वरांत भजन चालू होतें. त्याचा सूर मंद करण्यासाठीं खुंटी पिरगळीत मधूनें म्हटलें—

"काय छान पार्श्वसंगीताची जोड मिळाली आहे आपल्या या चर्चेला! बिचारे महात्माजी निघून गेले. पण त्यांच्या खुनाचा फायदा घेऊन निरनिराळे गट न् व्यक्ति डाव साधून घेताहेत आपआपले—"

"यालाच राजकारण म्हणतात, बाबा!"

भास्करनें समारोप केला आणि आम्ही निजण्यासाठीं माडीवर गेलों.

× × × ×

जातांना मी नेहमींप्रमाणें जिन्यावरला दिवा लावला. तेव्हां तो विझवून शांताबाई म्हणाली, "दिवे लावलेत, तर लगेच दगड येतील रस्त्यावरून! कालची आठवण आहे ना रात्रीची? आजच्या दिवस गणेशचतुर्थी आहे असं समजून दिवे लावल्याशिवायच रात्र काढूं या सगळी!—"

"गणेशचतुर्थी? मी समजलों नाहीं बाई, तुमच्या म्हणण्याचा अर्थ?-"

"अर्थ अगदीं स्पष्ट आहे. दरवर्षी गणेशचतुर्थीला शहरांतले सज्जन, धर्मशील लोक चंद्रदर्शनामुळं आपल्यावर चोरीचा आळ येऊं नये म्हणून रात्रभर दगड मारतात येतां जातां शेजारच्या घरांवर! त्याची आठवण झाली मला काल रात्रीं. म्हणून म्हणतें, माडीवर गेल्यावर दिवा लावूं नका. प्रकाश दिसतांच दगड येतील घरावर—"

पण भास्करनें वर गेल्याबरोबर माडीचा दरवाजा उघडून बटन दाबलें. तत्क्षणींच एक भला थोरला दगड दणकन भिंतीवर येऊन आदळला. लगेच त्यानें दिवा मालवून दार लावलें आणि आम्ही अंधारांतच गप्पा मारावयाला सुरवात केली. सर्व खिडक्या बंद करून घेतलेल्या होत्या. रात्रीं बाराच्या सुमारास एकदम दगड यावयाला सुरवात झाली; व अर्धा तासपर्यंत एकसारखा दगडांचा मारा चालू होता. त्यानंतर मात्र अगदीं सामसूम झालें.

"तुम्ही निजा, भाऊसाहेब! आज कांहीं होणार नाहीं आतां. शिवाय मी जागा आहेच—"

भास्कर मला म्हणाला आणि लगेच अंथरुणावर लेटला.

पण माझें मन अतिशय बेचैन झालें होतें. मला कोणत्याहि प्रकारची भीति किंवा चिंता वाटत नव्हती. सकाळीं डॉ. आकरे यांची चिठी आल्यापासूनच मी अगदीं वाईटांतल्या वाईट गोष्टी गृहीत धरून चाललों होतों. आपले हात तोडतील, आपल्याला पोत्यांत घालून तलावांत बुडवतील, जळत्या घरांतून बाहेर पडूं न देतां जिवंत जाळतील, वगैरे एकापेक्षां एक सर्व भयंकर प्रकार घडतील, असें समजून मी गेल्या बारा तासांत मन दगडासारखें घट्ट केलें होतें. पण एक प्रकारची विलक्षण चीड माझ्या मनांत उत्पन्न झाली होती, एक प्रकारचा विलक्षण त्वेष माझ्या मनांत थैमान घालीत होता. काल सकाळीं ते कँग्रेस कार्यकर्ते मला हिणवून हेटाळून म्हणाले होते, " महाराष्ट्र एकीकरणा-साठीं ज्या बहुजनसमाजाचा ढोल तुम्ही इतक्या ईर्ष्येनें पिटलात आणि ज्या ब्राह्मणेतरांची तुम्ही इतकी वरवर केलीत, तो बहुजनसमाज आणि ते ब्राह्मणे-तरच तुम्हाला जिवंत जाळण्याची भाषा आज बोलत आहेत !" मघाशीं बबनहि सभेंतून परत आल्यावर मला म्हणाला होता, " तुमच्याकडे नेहमीं येणारे तरुण लोकच आज वाटेल ते बडबडत होते तुमच्याविषयीं ! " खरें असेल का हें ? माणसें इतकीं कृतघ्न, इतकीं अविवेकी, इतकीं आततायी असतात ? हातांत लेखणी धरल्यापासून गेलीं तीस वर्षें मी जर कोणत्या एका कल्पनेचा प्रचार निष्ठेनें केला असेन, कोणत्या एका ध्येयाच्या साफल्यासाठीं आपल्या स्वल्प शक्तींचा उपयोग निर्धारानें केला असेन, तर तो महाराष्ट्र एकीकरणाच्या कल्प-नेचा, संयुक्त महाराष्ट्र अस्तित्वांत येऊन त्यांत मराठी लोकराज्य स्थापन व्हावें या ध्येयाचा ! ' तरुण भारत ' निघाल्यापासून तर गेल्या चार वर्षांत दुसरा कोणताहि विचार मी मनांत येऊं दिलेला नाहीं. ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य यांचा जो पुरस्कार मी ' तरुण भारतां'तून केला, त्याबद्दल अनेकांनीं मला नांवें ठेवलीं; " तुमचा ' तरुण भारत ' हें कुणबटांचें आणि म्हारांचें मुखपत्र आहे ! " असे उद्गार अनेकांनीं माझ्या तोंडावर काढले.

पण मी त्या सर्व टीकेला नेहमीं एकच उत्तर देत असें —" आपला महाराष्ट्रच मुळीं कुणब्यांचा आणि महारांचा आहे. केवळ महाराष्ट्र ब्राम्हण म्हणजे कांहीं महाराष्ट्र नव्हे. मराठा, कुणबी आणि महार म्हणजेच खरोखरी महाराष्ट्र

महाराष्ट्राचें पुनरुज्जीवन जर व्हावयाला हवें असेल, श्रीशिवाजी महाराज आणि श्रीसमर्थ रामदास यांनीं निर्माण केलेल्या मराठा राष्ट्राचें पुनरुत्थान जर व्हावयाला हवे असेल, तर मराठा, कुणबी आणि महार यांच्या ठिकाणीं प्रथम स्वत्वाची, महाराष्ट्रीयत्वाची जाणीव उत्पन्न केली पाहिजे. गोदावरीपासून नर्मदेपर्यंत पसरलेल्या या पूर्वमहाराष्ट्रांत, हिंदीच्या वर्चस्वाखालीं दडपून गुदमरून गेलेल्या या महाविदर्भांत मला ही एकच जाणीव उत्पन्न करावयाची आहे—"आम्ही महाराष्ट्रीय आहोंत; आम्ही मराठे आहोंत; आम्हाला महाराष्ट्राशीं एकरूप होऊन महत्तर महाराष्ट्र निर्माण करावयाचा आहे!" पूर्वमहाराष्ट्राची, महाविदर्भाची अस्मिता जागृत झाली, तरच संयुक्त महाराष्ट्राचें स्वप्न सफल होईल. एरवीं नाहीं. त्या स्वप्नाच्या सफलतेसाठीं नुसत्या ब्राम्हणांना, नुसत्या पांढरपेशांना, नुसत्या सुविद्यांना आणि सुसंस्कृतांना हांक मारून निभणार नाहीं; तर ज्यांच्या निढळाच्या घामानें काळी फुलारून सोनें पिकविते आणि ज्यांच्या रक्ताच्या घामानें कापसाच्या पेळूंतून रंगीबेरंगी वस्त्रसंपदा पैदा होते, त्या शेतकऱ्यांना आणि कामकऱ्यांना, त्या कुणब्यांना आणि महारांनाच मला हांक दिली पाहिजे. ज्यांचा महाराष्ट्र हा त्यांचा आहे; त्यांच्या संघटनेनें आणि सामर्थ्यानें मुंबईचा भांडवलशाही बालेकिल्ला जिंकून तो स्थापन व्हावयाचा आहे. म्हणून माझी हांक कुणब्यांना आणि महारांना आहे. महाराष्ट्र एकीकरण म्हणजे कांहीं केवळ जमिनीच्या चार तुकड्यांचें एकीकरण नव्हे. तसें तें असतें, तर कदाचित् बुद्धिबळांतील चार प्यादी पुढें मागें सारून तें साध्य करून घेतां आलें असतें. पण माझें महाराष्ट्र एकीकरण म्हणजे जाति आणि वर्ग यांनीं विभागलेल्या आजच्या विच्छिन्न महाराष्ट्रांतून एकात्म आणि एकसंध असें मराठा राष्ट्र निर्माण करणें होय. म्हणून माझी हांक महाराष्ट्रभूच्या केवळ अग्रजांनाच नाहीं; तर मुख्यतः अनुजांना आणि अंत्यजांना आहे—"

बेळगांवच्या साहित्यसंमेलनानंतर १९४६ च्या मेमध्यें आम्ही गोमंतकांत गेलों होतों. तेथें श्रीशांतादुर्गाच्या दर्शनाला आम्ही गेलों असतां आमच्याबरोबर असलेले सुप्रसिद्ध गोमंतकीय कार्यकर्ते श्री. जना कामत यांनीं मला विचारलें, "काय भाऊसाहेब, काय मागायचं देवीजवळ?" मी त्यांना म्हटलें, "माझ्या डोळ्यांदेखत संयुक्त महाराष्ट्र स्थापन झालेला पहाण्याचं भाग्य मला लाभावं,

एवढंच मागणं आहे माझें!" श्री· माधव मनोहर जवळच उभे होते. ते हा माझा भोळा भाव बघून हसले. तेव्हां मी त्यांना म्हणालो," माधवराव, यांत हसण्यासारखं कांहीं नाहीं. जनाभाऊंनीं मला प्रश्न विचारतांच, "तुझा तूं वाढवी राजा। शीघ्र आम्हांचि देखता।" या समर्थांनी प्रतापगडच्या भवानी-पाशीं भाकलेल्या करुणेची मला आठवण झाली. मी आधुनिक नाहीं तुमच्या-सारखा! माझी बुद्धि, माझं हृदय, माझी हाडं त्या महाराष्ट्र परंपरेंत वाढलेली न् मुरलेली आहेत--"

म्हणूनच मला वाटतें कीं, महाराष्ट्राची इतिहाससिद्ध प्रकृति, संस्कृति आणि नियति यांना योग्य असें स्थान त्याला हिंदी संघराज्यांत मिळालें पाहिजे; व त्यासाठीं संयुक्त, समर्थ आणि स्वायत्त असा महाराष्ट्र, या सत्तांतराच्या संमक्रण-काळांतच, निर्माण झाला पाहिजे. आजच्या विभागलेल्या छिन्नविछिन्न महा-राष्ट्राला उज्ज्वल भवितव्य नाहीं—

आणि, संयुक्त महाराष्ट्राला उज्ज्वल भवितव्य नाहीं म्हणजे, माझ्या दृष्टीनें, हिंदुस्थानालाहि उज्ज्वल भवितव्य नाहीं. मुसलमानांनीं हिंदुस्थानावर स्वारी केल्यापासून गेल्या आठशें वर्षांच्या पारतंत्र्याच्या दुर्धर काळांत भरतखंडांतील कोणत्या एका राष्ट्रकानें जर पुनः पुन्हा स्वतंत्र होण्याचा प्रयत्न यशस्वी रीतीनें केला असेल, तर तो महाराष्ट्रानें. शंकरदेव यादवाचा वध होऊन दोनशें वर्षें होतात न होतात, तोंच आपल्या वंशांत महाराष्ट्राचा छत्रपति अवतीर्ण होईल असें स्वातंत्र्याकांक्षी स्वप्न पाहणाऱ्या मालोजीचा उदय झाला; व शनवार वाड्यावर तांबडें निशाण लागून पन्नास वर्षे होतात न होतात, तोंच वासुदेव बळवंतानें ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंडाचा झेंडा उभारला. धर्मराष्ट्रीय (Religio-National) स्फूर्तीनें प्रवृत्त होऊन संतांनी आणि सेनानींनी राष्ट्रनिर्माणाचा उपक्रम जर या भरतखंडांत कुठें केलेला असेल, तर तो फक्त महाराष्ट्रांत. सर्व हिंदुस्थानांत अदृष्ट अशी ती उदात्त प्रवृत्ति आणि तो अचाट उपक्रम लक्षांत घेऊनच बहुधा श्री. प्रभाकर पाध्ये हे महाराष्ट्राला भारताचा 'खड्गहस्त' म्हणत असावेत. एरवीं रजपूत, जाट, गुरखा, शीख वगैरे इंग्रजांनी लढाऊ म्हणून गौरविलेल्या अनेक शूर जाती हिंदुस्थानांत असतांना आणि या यांत्रिक युद्धपद्धतीच्या युगांत केवळ शौर्यापेक्षां बुद्धिबलाचेंच महत्व अधिक मानले जात

असतां, एकट्या महाराष्ट्राला 'खड्गहस्त' म्हणण्यांत काय औचित्य किंवा स्वारस्य आहे ? महाराष्ट्र हें केवळ शूर राष्ट्रकच नाहीं; तर त्याच्या शौर्यामागें स्वातंत्र्याची स्फूर्ती आणि समयज्ञतेची परंपरा असून, तें शौर्य भरतखंडाच्या उत्कर्षाच्या कारणीं लागण्यांतच त्याचें साफल्य आहे, अशी दृष्टीहि पण महाराष्ट्रांतील द्रष्ट्या आणि कर्त्या पुरुषांच्या ठिकाणीं आहे. असा हा भारताचा केवळ बलशालीच नव्हे, तर बुद्धिशाली, स्वातंत्र्यनिष्ठ 'खड्गहस्त' खिळखिळा आणि दुबळा राहून कसे चालेल ? भावी काळांतील त्याचें इतिहाससिद्ध स्थान आणि कर्तव्य अगदी स्पष्ट आहे. तें कर्तव्य करावयाला तो समर्थ न होण्यांत त्याची स्वतःची जितकी हानी आहे, तितकीच हिंदुस्थानाचीहि नाहीं काय ? --

या तीव्र जाणिवेनें आणि त्या जाणिवेंतून उत्पन्न झालेल्या ईर्ष्येनें मी संयुक्त महाराष्ट्रासाठीं बहुजनसमाजाचा पुरस्कार करीत आलों, मराठा, कुणबी आणि महार यांना हांक दिली—

पण एकात्म, एकसंध समाजाची माझी ही कल्पना महाराष्ट्रापुरतीच मर्यादित नाहीं. महाराष्ट्राप्रमाणेंच सगळा भारतीय लोकसमाजहि जाति, वर्ग आणि धर्म यांचे भेद लुप्त होऊन, एकात्म झाला पाहिजे, तरच बलशाली भारत उत्पन्न होईल आणि तो आपल्याबरोबर आशियांतील राष्ट्रांचीहि उन्नति करून प्रशांत महासागरांत 'भारतीय राष्ट्रकुटुंब' ( Commonwealth of Indian nations ) स्थापन करील, याहि कल्पनेचा पुरस्कार मी गलीं सत्तावीस वर्षें करीत आलों आहे—

आणि एकांत एक अनुस्यूत झालेलीं हीं दोन स्वप्नें !–संयुक्त महाराष्ट्र आणि भारतीय राष्ट्रकुटुंब यांच्या स्थापनेचीं हीं उज्ज्वल, भव्य स्वप्नें !–या दोन स्वप्नांच्या साफल्याच्या इर्ष्येनें मी विशाल हिंदुत्वाचा, आंतरजातीय आणि आंतरधर्मीय विवाहाचा, ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य यांच्या एकंकाराचा व ही विराट् समाजक्रांति घडवून आणण्यासाठीं मार्क्सवादाचाहि पुरस्कार गेलीं सत्तावीस वर्षें करीत आलों आहे—

याच भावनेनें वीस वर्षांपूर्वी खान—मालिनी विवाहाचें समर्थन मी 'स्वतंत्र भारतां'तून केलें आणि त्यामुळें उद्भवलेलें वादळहि मुकाट्यानें सोसलें. त्या विवाहाच्या निषेधार्थ भरलेल्या राजाराम वाचनालयांतील सभेंत डॉ. मुंजे यांनीं असे

उद्गार काढले होते कीं, " अशा प्रकारचा लेख लिहिणारा इसम जिवंत रहातो, हेंच आश्चर्य ! अमेरिकेंत अशा इसमाला 'लिंच' (Lynch) केला असता ! " रामभाऊ रुईकर, दादा धर्माधिकारी आणि दादा घोरपडे हे तिघे त्या वेळीं माझ्या बाजूनें उभे राहिले; व 'महाराष्ट्रां'तून मला काढून टाकण्याचा आग्रह दादा ओगल्यांना करण्यांत आला असतांहि, त्या लोकक्षोभाच्या प्रसंगीं त्यांनीं मला अंतर दिलें नाहीं—

"भरतखंडाला आपली मातृभूमी मानील आणि भारतीय संस्कृतीचा स्वीकार करील, तो हिंदु- मग त्याचा धर्म, वर्ण, जाति किंवा राष्ट्र कोणतेंहि असो, "–या हिंदुत्वाच्या व्यापक सांस्कृतिक कल्पनेचें प्रतिपादन मी त्या लेखांत आवेशानें केलें होतें; व ख्रिस्ती, मुसलमान वगैरे अन्यधर्मीयांना हिंदुत्वाच्या या व्यापक भावनेनें आपण आत्मसात् करून, हिंदु करून, घेतलें पाहिजे, असा माझा आग्रह होता. श्री. देवदत्त टिळक यांनीं माझ्या या विचारसरणीला पूर्ण पाठिंबा दिला; व प्रत्येक व्यक्तीला आपला धर्म कायम ठेवून अन्यधर्मीयाशीं विवाह आणि संसार करतां आला पाहिजे, तरच नाना धर्मांनीं आणि नाना पंथांनीं गजबजलेल्या या भरतखंडांतून एकात्म हिंदु राष्ट्राचा उदय होईल, हें जें माझें खान-मालिनी विवाहाच्या समर्थनांतील मुख्य प्रतिपाद्य सूत्र, तेंहि त्यांनीं मान्य केलें. सावरकरांनीं हिंदुत्वाच्या या व्यापक, संस्कृतिनिष्ठ कल्पनेला संमति दर्शविली; पण, ख्रिस्ती लोक जरी कदाचित् या कल्पनेप्रमाणें स्वतःला हिंदु म्हणवून घ्यावयाला तयार झाले, तरी मुसलमान कदापि होणार नाहींत, असाहि संशय त्यांनीं व्यक्त केला.

तथापि, माझी अशी श्रद्धा त्या वेळीं होती आणि आजहि आहे कीं, प्रत्येक व्यक्तीला जरूर तर आपला धर्म कायम ठेवून आंतरधर्मीय विवाह करणें सुलभ झाल्याशिवाय अनेक धर्म, वर्ण, पंथ आणि जाति यांचें आश्रयस्थान होऊन बसलेल्या या भरतखंडांतून एकात्म भारतीय राष्ट्र कधींहि निर्माण होणार नाहीं. ज्या भारतीय समाजानें प्राचीन काळीं शक, हूण, बर्बर, यवन किंवा पर्शु यांना आत्मसात् करून घेतलें, त्याला या अर्वाचीन काळांत ख्रिस्ती आणि मुसलमान यांना आत्मसात् करून घेणें अशक्य का व्हावें ? भारतीय राष्ट्राचें

दार्ढ्य, सामर्थ्य आणि विकासक्षमता ही त्याच्या आंतर एकात्मतेंत आणि बाह्यांना आत्मसात् करण्याच्या शक्तींत आहे. आंतरधर्मीय आणि आंतरजातीय विवाह रूढ झाल्याविना तसा शक्तिशाली एकात्म भारत उत्पन्न होणार नाहीं.

आणि, जें भारताला, तेंच त्याचा घटक असलेल्या महाराष्ट्रालाहि लागू आहे. आज महाराष्ट्रांतील ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य हे एकाच भूमींत रहातात, एकच भाषा बोलतात आणि एकच धर्म आचरतात. पण त्यांच्या जीवनांत मात्र एकता नाहीं आणि समानताहि नाहीं. म्हणून एकात्म महाराष्ट्र जर निर्माण व्हावयाला हवा असेल, तर ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य यांच्यांत विवाह झाले पाहिजेत, त्यांच्या जीवनाचे ओघ एकमेकांत पूर्णपणें मिसळले पाहिजेत—

—संयुक्त महाराष्ट्राचा माझा अर्थ हा आहे; व गेलीं चार वर्षें या एकात्मतेचा पुरस्कार 'तरुण भारत' सतत करीत आलेला आहे. या एकात्मतेच्या परिपोषासाठींच ब्राह्मणेतरांचा आणि अस्पृश्यांचा पक्ष 'तरुण भारता'नें ईर्ष्येनें उचलून धरला आणि पुढेंही धरील—

—तरीसुद्धां ब्राह्मणेतरांचा 'तरुण भारता'वर राग? गांधीजींच्या खुनाचा सूड 'तरुण भारता'वर घेण्याची त्यांची तयारी? आपण काय करतों आहोंत याची जाणीव आहे का त्यांना? खरोखरीच इतके कृतघ्न, इतके अविवेकी, इतके आततायी आहेत हे तरुण? का कोणी त्यांना दुष्टाव्यानें चिथावणी दिली असेल? पण, कोणी कांहींहि चिथावणी दिली, तरी तिला बळी पडण्याइतकीं त्यांचीं मनें आणि माथीं हलकीं कां असावींत?—"

--हे प्रश्न माझ्या मनांत सारखे थैमान घालीत होते. एक प्रकारची विलक्षण चीड, विलक्षण संताप, विलक्षण त्वेष माझ्या मनांत सारखा धिंगाणा घालीत होता.

त्या तळमळींतच पहाटे केव्हां तरी माझा डोळा लागला आणि त्या मिटलेल्या डोळ्यांपुढें भयंकर दृश्य प्रकटलें!—

रात्रीचीं वेळ. शांताबाई आणि मी नेहमींप्रमाणें गच्चीच्या कठड्याला ओठंगून गप्पा मारीत होतों. रस्ता अगदीं निर्मनुष्य, निःशब्द होता. दुरून कुठून तरी भजनाचे आर्त सूर कानांवर येत होते.

इतक्यांत एकदम गलका होत असल्यासारखा वाटला.

पण समोरचा तो रुंद रस्ता तर अगदीं शांत, अगदीं स्तब्ध होता. दिवसभर सतत नाना प्रकारचे भार वाहून शिणल्यामुळें जणुं त्याला निश्चेष्टता आली होती!

पण गलका सारखा वाढत होता, सारखा जवळहि येत चालला होता.

म्हणून शांताबाईला शंका येऊन तिनें मागल्या रस्त्याकडे पाहिलें. तों हातांत पेटते पलिते घेऊन गांधीजींचा जयजयकार करीत मिरवणूक झपाट्यानें आमच्या बाजूला येत असल्याचें तिच्या दृष्टीस पडलें.

" कसली मिरवणूक आहे ही? पहा तरी जरा—"

तिनें मला म्हटलें. मी त्या किंचित् भयानक पण किंचित् लोभनीय अशा दीप्तिमान् दृश्याकडे पहात उद्गारलों, " अग, आपल्या ओळखीचीच तर तरुण मंडळी आहेत ही—"

तोंच ' शांतानिवासा 'चें मागलें फाटक जोरानें उघडून ती मिरवणूक आंत घुसली आणि पुढें असलेल्या त्या तरुणानें आपल्या हातांतला पलिता समोरच्या खिडकीला लावला—

त्याबरोबर मी वरूनच त्याला हांक मारून विचारलें, "........काय करतो आहेस रे हें तूं? खिडकी पेटेल ना अशानं?—"

" तुमचं घर पेटवून द्यायलाच आलों आहोंत आम्ही आज, भाऊसाहेब! तुम्ही मागें वळून तर पहा एकदां तुमच्या ' तरुण भारता 'ची चिता कशी भडकली आहे ती!—"

मी तत्क्षणींच मागें वळून पाहिलें. ' नरकेसरी ' प्रेसच्या शेडमधून उंच ज्वाळा वर उफाळत होत्या.

" प्रथम ' तरुण भारता'ची चिता पेटवली आम्ही! आतां तुमची पेटवणार!!—"

त्या तरुणानें हातांतला पलिता नाचवीत विकट हास्य केलें.

मी दचकून जागा झालों. मिलचा पोंगा जोरानें वाजत होता.

माझ्या उशाशीं उभा असलेला भास्कर मला हंसत हंसत म्हणाला, "भाऊसाहेब, उठा आतां. रात्र सुरक्षित पार पडली एकदांची!—"

* * *

आम्ही खालीं आलों, त्या वेळीं रस्त्यांत कामगारांची गर्दी होती. चहाचे पेले आमच्यापुढें ठेवून शांताबाई म्हणाली, " मिल आज सुरू आहे, हें तरी सुदैवच म्हटलं पाहिजे एक. मिल जर चालू राहिली, तर गडबड होणार नाहीं फारशी—"

" पण, लोक आतां कामावर जात असतांना दिसत असले, तरी ते परत फिरतील लगेच, बाई ! हरताळ तीन दिवस चालू राह्यचाय—"

" माझा तर अंदाज असा आहे कीं, ऑफिसंसुद्धां बंद राहतील आज—"

" मग मात्र कठीण आहे. कामगार जर दिवसभर रिकामे राहिले, तर काय होईल हें सांगतां येत नाहीं—"

इतक्यांत मिलचा शेवटला पोंगा झाला.

आणि, पुराच्या पाणलोटाला पुढें जावयाला वाव न मिळाल्यामुळें नदीचा प्रवाह जसा थड्या ओलांडून वेगानें उलटा वाहूं लागावा, त्याप्रमाणें कामगारांचा उत्संखळ जमाव रस्त्यानें जाणारीं वाहनें अडवीत, लोकांच्या डोक्यावरल्या टोप्या काढीत आणि ' बम्मनकू काट डालो ' अशा घोषणा करीत त्वेषानें परत फिरला.

" लक्षण कांहीं ठीक दिसत नाहीं, " शांताबाई उद्गारली.

" मी जरा शहरांतून चक्कर मारून येतो, भाऊसाहेब. म्हणजे पहांटे भरलेल्या सभेंत काय ठरलं तें कळेल तरी —"

" जर कांहीं विशेष बातमी असेल, तर तसं लगेच येऊन सांग, भास्कर, आम्हांला. बाकी करून तरी काय उपयोग व्हायचाय म्हणा ! हे कांहीं पोलिसचं संरक्षण मागायला तयार नाहींत—"

" तुम्ही काळजी करूं नका, बाई. आम्ही शक्य तितक्या लवकर परत येतों. तुम्ही म्हणाल, तर दिवसभर राहूं आम्ही इथं—"

" मला माझ्याबद्दल काळजी वाटत नाहीं मुळींच. वाटते, ती फक्त यांच्याबद्दलच. काल सकाळपासून सारखे निरोप येताहेत यांना न् हे कांहीं हलायला तयार नाहींत जागचे. मी कालच यांना सुचवलं, तुम्ही धंतोलीवर नाहीं तर चिचभुवनला जाऊन-रहा दहा बारा दिवस हें वादळ शांत होईपर्यंत, म्हणून. पण हे कांहींच ऐकायला तयार नाहींत—"

" अग, ज्यांच्या मनांत मला मारायचंय, ते मी कुठेंहि गेलों, तरी माझा शोध काढून गाठतील मला ! त्यापेक्षां स्वतःच्या घरीं राहूनच काय होईल तें भोगलेलं काय वाईट ? निदान दुसऱ्यावर तरी संकट यायला नको आपल्यामुळं-"

" चिचभुवनला कांहीं दुसऱ्याचं घर नाहीं. आपलं स्वतःचं हक्काचं घर आहे अगदीं. तिथं जाऊन आठ दिवस राह्यला काय हरकत आहे ? विश्रांति न् संरक्षण दोन्हीहि मिळतील. तुम्ही घरांत नाहीं असं कळल्यावर मग कोण कशाला येतंय आपल्या घरावर ? धोका सगळा फक्त तुम्हांला आहे; आम्हांला किंवा घराला नाहीं —"

" खरं आहे बाई म्हणतात तें. तुम्ही आमच्या घरीं चलता का, भाऊसाहेब ?—"

" नाहीं, मधु ! स्वतःचं संकट दुसऱ्यावर घालण्याची इच्छा नाहीं माझी—"

" आमच्यावर कांहीं संकट नाहीं, भाऊसाहेब तुम्ही आमच्या घरीं आहांत याचा पत्ता नाहीं लागणार कुणाला—"

" तूं म्हणतोस तें सगळं खरं. पण या घटकेला तरी विचार नाहीं माझा कुठं जायचा. तुम्ही एकदां फेरी मारून काय बातमी मिळते ती पहा. मग ठरवूं काय करायचं तें—"

इतक्यांत ' नरकेसरी ' प्रेसचीं टाइप सोडविणारीं मुलें किल्ल्या मागण्यासाठीं आलीं.

" काय रे, कांहीं गडबड आहे का रस्त्यांत ?—"

मी त्यांना विचारलें. त्यावर पांडुरंग म्हणाला—

" भीड आहे जी ! पण गडबड नाहीं फारशी—"

भास्करनें त्याला किल्ल्या दिल्या. मी शांताबाईला म्हटलें—

" पाह्यलसं ! आपल्याला उगाचच भीति वाटते घरांत बसल्या बसल्या ! मुलं रोजच्याप्रमाणं कामावर आलीं याचा अर्थच हा कीं, आपल्याला वाटते तशी कांहीं गडबड शहरांत नाहीं—"

" तुमच्या तोंडांत साखर पडो ! शहरांत गडबड आहे कीं नाहीं हा प्रश्न नाहीं आपल्यापुढें. तुम्हांला धोका असल्याचे निरोप येताहेत कालपासून सारखे, ह्या दृष्टीनं विचार करायला हवा आपण—"

" पण, शहरांत जर कांहीं गडबड नसेल, तर काय मला एकट्यालाच दिवसाढवळ्या पोत्यांत घालून शुक्रवार तलावांत जलसमाधि देणार आहेत ? नागपूरसारख्या राजधानीच्या शहरांत असले प्रकार घडायला सरकार कांहीं ब्रह्मीभूत झालेलं नाहीं अद्याप आपलं—"

" फुकट वाद कशाला घालतां बाई, तुम्ही त्यांच्याशीं ? आम्ही जाऊन येतों बाहेरून आणि मग ठरवूं काय करायचं तें. मग मात्र तुम्हांला ऐकावं लागेल हं आमचं मुकाट्यानं, भाऊसाहेब ! "

" तें पाहीन मी, मधु ! तुम्ही एकदां जाऊन तर या. मी आतां अंकाच्या तयारीला लागतों. डिस्ट्रिब्यूटर आले आहेत, त्या अर्थी कांहीं हरताळ दिसत नाहीं आज प्रेसचा तरी—"

ते दोघे निघून गेले. शांताबाईनें बातम्या ऐकण्यासाठीं रेडिओ लावला.

बातम्या संपतात न संपतात, तोंच वीर हरकरे आंत आले.

" केव्हां आलांत भंडाऱ्याहून, बाबुराव ?—"

" तुम्हांला कसं कळलं मी भंडाऱ्याला गेलों होतो हें ? "

" काल हातीं आलेल्या बातमीपत्रांत गांधीजींवरलं भाषण आहे तुमचं ! छान बोललांत तुम्ही—"

" भंडाऱ्याची सभा उत्तम झाली. पण इथं मात्र हवा अगदीं निराळी दिसतेय—"

" का ? आज कांहीं गडबड आहे का ?—"

" रस्त्यांत धूम आहे लोकांची; न् ब्राह्मणांविषयीं वाटेल तें बोलताहेत. पण कालच्या इतकी गरमी नाहीं दिसत आज हवेंत. जसजसा वेळ जाईल तसतसा उतरून जाईल हा जोष !—"

" पण मी तर बातम्या निराळ्याच ऐकतोंय कालपासून—"

" हो. तुम्ही म्हणतां तें खरं आहे, भाऊराव. या संधीचा फायदा घेऊन आपल्या मार्गातले काटे कायमचे काढून टाकायचा घाट घातलाय कांहीं मंडळींनीं. याद्याहि तयार झाल्या आहेत म्हणून ऐकलं—

" हो. आणि आश्चर्याची गोष्ट अशी कीं, त्या याद्यांत माझ्यासारख्यांचींच नावं आहेत असं नव्हे; तर तुमचे दोघे दादा–धर्माधिकारी न् बालिंगे,–तसंच

देशपांडे न् विमलाबाई यांचींहि नांवं आहेत, म्हणे ! माझी एक सूचना आहे तुम्हाला—"

" कसली ?—"

" तुम्ही दोघेहि दादा न् देशपांडे यांना सावध करा—"

" मी त्याचे बाजूला जायच्या विचारांत आहे. कदाचित् दादांना भेटेनहि. पण देशपांड्यांसंबंधीं नक्की सांगतां येत नाहीं—"

" पण दादांशीं तर बोलाल ?—"

" हो. त्यांना सावध करतों—"

वीर हरकरे लगेच उठले आणि मी लिहावयाला बसलों.

तोंच आमची मोलकरीण पार्वती घाबऱ्या घाबऱ्या येऊन म्हणाली, " फाटकापाशीं उभे असलेले लोक मला म्हणतात, 'तूं या घरीं काम करशील, तर बरी गत नाहीं तुझी—"

" लोक म्हणूं देत कांहींहि ! तूं मुकाट्यानं आंत जाऊन कामाला लाग—"

शांताबाईनें पार्वतीला सांगितलें आणि ती मला म्हणाली, " तुम्ही, ऐका माझं ! पं. शुक्लांना आतांच्या आतां फोन करून हा सारा प्रकार कळवा न् संरक्षण मागा ताबडतोब. मला कांहीं लक्षण ठीक दिसत नाहीं—"

पण मी कांहीं बोललों नाहीं. रस्त्यावरला गलका सारखा वाढत होता; व मधून मधून एकाद दुसरा दगडहि येत होता घरावर. रस्त्यांतलीं माणसें माझ्या-संबंधीं बोलत आणि चौकशी करीत आहेत, हेंहि माझ्या कानांवर आलें.

पण मी स्वस्थ चित्तानें लिहित होतों. अग्रलेख हातावेगळा झाल्यावर मी शांताबाईला म्हटलें, " तुम्ही जेवणं उरकून घ्या लवकर. मी आसनं करून मग स्नान करीन—"

" पण आसनं करायला आज माडीवर जाऊं नका नेहमींप्रमाणें. बाहेर तुमच्या-संबंधीं सारखं लोक बोलताहेत. तुम्ही जर त्यांच्या दृष्टीस पडलात, तर काय होईल सांगवत नाहीं. इथं माजघरांतच आसनं उरकून घ्या आपलीं आज—"

इतक्यांत 'नरकेसरी' प्रेसमधलीं मुलें किल्ल्या घेऊन आलीं. मी त्यांना विचारलें, " का रे, का आलांत ? मी तर कॉपी मागायला येईल कुणी तरी म्हणून वाट पहात होतों— "

" लोक सगळे आलेले परत गेले, भाऊसाहेब. जोशी हायस्कूलसमोर हमला सुरू आहे न् आपल्याहि प्रेससमोर गडबड आहे. म्हणून फोरमनच्या सांगण्या-प्रमाणें प्रेस बंद करून आलों आम्ही—"

ते गेल्यावर शांताबाई मला म्हणाली, "अजून तरी ऐका तुम्ही माझं! तुम्ही फोन केलात, तर तुम्हांला स्वत:ला न् तुमच्या प्रेसला खात्रीनं संरक्षण मिळेल. तुम्हांला संरक्षण नाकारणं शक्य नाहीं त्यांना!—"

मी कांहीं बोललों नाहीं. ती भिंतीला ओठंगून स्तब्ध उभी होती. आसनें करण्यासाठीं उठतांना मी तिला म्हटलें, "चंद्रशेखरला अगदीं बाहेर जाऊं देऊं नकोस. मधु न् भास्कर येतीलच बहुतेक जेवणं उरकून इतक्यांत—"

ती कांहीं बोलली नाहीं.

मी माजघरांत जाऊन आसनें करावयाला सुरवात केली.

मी शीर्षासन उरकून अर्धांगासनाला सुरवात करतों, तोंच पश्चिमेच्या बाजूनें घरावर एकदम दगडांचा मारा सुरू झाला. खिडक्या आणि दारें सर्व बंद करून घेतलेलीं होतीं. त्या बंद केलेल्या खिडक्यांवर आणि दारांवर दणादण दगड येऊन आदळत होते.

इतक्यांत दारावरली विजेची घंटी जोरानें खणखणूं लागली. तेव्हां मी एकदम उठून शांताबाईला म्हटलें, " तूं खिडक्या न् दारं उघडून टाक प्रथम सगळ्या. पाहूं या तरी एकदां लोक काय करतात तें! —"

त्याबरोबर ती दार उघडून बाहेर आली आणि अंगणांत गलका करीत असलेल्या जमावाला म्हणाली, "काय हवंय तुम्हांला? उगाच दगड मारून नासधूस करूं नका घराची. तुम्हांला काय हवंय तें सांगा—"

" आम्हाला मालकांशीं काम आहे, बाई. ते आहेत ना घरांत? —"

हातांत काठी असलेल्या आणि केस पिंजारलेल्या एका तरुणानें पुढें होऊन विचारलें. सुमारें दोन तीनशें मुलें त्याच्या मागें उभीं होतीं. त्यांपैकीं बहुतेकांच्या हातांत काठ्या होत्या.

" ते घरीं आहेत. पण तुमचं काय काम आहे तें मलाच सांगा. ते आंत कामांत आहेत—"

" आमचं काम त्यांच्याशींच आहे, बाई! —"

त्या तरुणानें उत्तर दिलें आणि माझ्या नांवानें गलका सुरू झाला. चौरस्त्या वर उभे असलेले पोलिस ती गडबड मुकाट्यानें पहात होते.

म्हणून मी तडक उठून बाहेर आलों आणि त्या तरुणाला म्हटलें, "हा पहा आलों मी! काय काम आहे तुमचं माझ्याशीं? उगाच दगडफेक करून घराचा विध्वंस का करतां? मी समोर उभा आहे तुमच्या. वाटल्यास माझ्या डोक्यांत दगड घाला! बोला काय काम आहे माझ्याशीं तें! —"

मी अगदीं शांतपणानें म्हटलें. हातांत काठ्या, दगड, विटा घेतलेला तो जमाव आम्हा दोघांकडे टकमका पहात उभा होता. क्षणैक अगदीं स्तब्धता होती.

मी पुन्हा कांहीं बोलणार, तोंच त्या जवानानें आपल्या भोंवतालच्या वानर-सेनेला म्हटलें, "चलो, चलो रे, यहांसे! यहां कुछ भी करना नहीं! चलो, हटो!—"

तत्क्षणींच भराभर तीं सारीं तरुण मुलें परत फिरलीं.

आणि आम्ही आंत आलों.

शांताबाईनें दार लावून घेतलें. तेव्हां मी तिला म्हटलें—

"छे, छे! दारं लावूं नकोस. अशा प्रसंगीं दारं लावणं हें चूक आहे अगदीं. दारं उघडींच असूं देत. पाहूं या कोण आंत येतो न् काय करतो तें!—"

"आतांचा जमाव परत गेला म्हणून म्हणतां कां तुम्ही हें? चूक आहे तुमची अगदीं! बाहेर काय भयंकर गलका चालला आहे ऐकता ना? अशा स्थितींत दारं उघडीं ठेवा म्हणून कसं सांगतां तुम्ही?—"

"आपण दारं बंद केलीं, तर तीं फोडली जाणार नाहींत, अशी खात्री आहे कां तुझी? मघाशीं आणखी थोडा वेळ दगड आले असते, तर दारं आपो-आप उघडीं झालीं असतीं त्या दगडांच्या प्रभावानं!—"

मी हंसून म्हटलें.

पण माझें मन विलक्षण संतप्त, विलक्षण क्षुब्ध होऊन गेलें होतें. ती दगड-फेक आणि तो जमाव!—मला अगदीं चीड आली होती, त्यांच्या त्या आत-तायी वर्तनाची. माझा शोध कशासाठीं? माझ्या घरावर दगडांचा मारा कशा-साठीं? केवळ मी गांधीजींवर टीका करीत आलों म्हणूनच ना? पण, गांधी-जींनीं देशाची कितीहि थोर सेवा केलेली असली, साधुपुरुष म्हणून ते कितीहि

पूज्य असले, तरी त्यांचीं जीं मतें किंवा कृत्यें आपल्या बुद्धीला पटत नाहींत, त्यांच्यावर टीका करावयाची नाहीं, गांधीजींच्या चुका दाखवावयाच्या नाहींत, हा कुठला न्याय ? स्वतः त्यांनींच आपण हिमालयाएवढ्या चुका केल्याची कबुली अनेकदां जाहीर रीतीनें दिलेली नाहीं काय ? खुद्द पंडितजींनीं, सरदारांनीं आणि राजाजींनींहि त्यांच्या चुका अनेकदां त्यांच्या पदरांत घातलेल्या नाहींत काय ? डॉ. अंबेडकर यांनीं हिंदुस्थानाची फाळणी अपरिहार्य आहे, कांहीं एका मर्यादेपर्यंत लोकसंख्येची अदलाबदलहि अपरिहार्य आहे आणि या दोन्ही गोष्टी लक्षांत घेऊन आपण योग्य ती दक्षता वेळींच घेणें जरूर आहे, असा इषारा पुनः पुन्हा दिला होता. पण गांधीजींनीं तो मनावर घेतला नाहीं. ते अखंड हिंदुस्थानाची भाषा बोलत राहिले, लोकसंख्येची अदलाबदल अनिष्ट आणि अशक्य आहे म्हणून वादत राहिले. आणि अखेर झालें काय ? हिंदुस्थानाची वेडीवांकडी चीरफाड आणि महायुद्धाला लाजवतील अशा भयंकर कत्तली ! गांधीजींचा हट्ट, त्यांचा अदूरदर्शीपणाच या अनर्थाबद्दल जबाबदार नाहीं काय ? त्यांनीं स्वातंत्र्य मिळवून देण्यासाठीं भगीरथ परिश्रम केले, ही गोष्ट खरी. पण, तें स्वातंत्र्य शापगर्भ आहे, रक्ताळलेलें आहे, असें म्हणण्यांत चूक कोणती ? चर्चिलनें इंग्लंडला विजय मिळवून दिला. पण, युद्धकाळांत देशाच्या हिताला आवश्यक असलेली त्याची हुकूमशाही नंतरच्या शांतताकाळांत देशाच्या आणि लोकशाहीच्या नाशाला कारण होईल, हें लक्षांत घेऊन ब्रिटिश जनतेनें आपल्या मायदेशाला आणि साम्राज्याला प्राणांतिक गंडांतरांतून वाचविणाऱ्या त्या विजयी राष्ट्रनेत्याचा युद्ध संपल्याबरोबर झालेल्या निवडणुकींत पाडाव करून त्याला प्रधान-मंत्रिपदावरून खालीं खेचलें. ब्रिटिश जनतेची ती विवेकी जागरूकता कुठें आणि आपल्या लोकांची ही आंधळी विभूतिपूजा कुठें ! असल्या या अंधश्रद्धाळु देशांत लोकशाही टिकणार कशी आणि विकसणार तरी कशी ?—

नौखालीपासून तों कराचीपर्यंतच्या गेल्या दीड वर्षांतल्या एकापेक्षां एक भीषण असलेल्या त्या सर्व रक्तलांछित, अघोर घटना माझ्या डोळ्यांपुढें उभ्या राहिल्या. त्या सगळ्या रक्ताच्या पाटांतून अब्रूला मुकलेल्या स्त्रियांच्या, आईबापांना आंचवलेल्या अर्भकांच्या आणि घरादारांना दुरावलेल्या कुटुंबांच्या

किंकाळयांतून, सडल्या प्रेतांच्या राशींतून आणि जळत्या घरांच्या चितांतून वाट काढीत, अहिंसेचा मंत्र पुटपुटत आलेलें तें स्वातंत्र्य !— तें आपादमस्तक रक्तानें न्हालेलें स्वातंत्र्य माझ्या डोळयांपुढें उभें राहिलें—

—आणि, मनांत आलें, या साऱ्या अघोर, अमानुष घटनांना कारण झालेल्या आत्मकेंद्रित, अदूरदर्शी, लहरी नेतृत्वावर टीका केल्याबद्दल हें प्रायश्चित्त ? कीं केवळ गांधीजींच्या खुनाचें निमित्त करून आमच्या वाईटावर असलेले इसम खवळलेल्या जमावाला दुष्ट चिथावणी देऊन हा सूड घेऊं पाहात आहेत आमच्यावर ?

माझें मन तळतळत होतें, डोळे जळत होते—

तोंच दारावरली घंटी वाजली.

शांताबाईनें दरवाजा उघडला.

त्याबरोबर श्रीमंत राजे प्रतापसिंहमहाराज भोसले यांचे विश्वासू कामदार श्री. अण्णासाहेब शिर्के यांनीं आंत येऊन मधूची चिठी माझ्या हातीं दिली आणि मला घेऊन जाण्यासाठीं आपण आलों असल्याचें सांगितलें.

ती चिठी मी वाचून शांताबाईला दिली. तिच्यावर नजर टाकून शांताबाईनें मला म्हटलें, " उठा, तुम्ही ताबडतोब जा यांच्याबरोबर. माझं काय होईल याचा विचार करूं नका. माझी काळजी घ्यायला मी समर्थ आहे—"

आणि, आमच्या दोघां मुलांना घेऊन, सोमवार ता. २ फेब्रुवारी १९४८ रोजीं दुपारीं ११-३५ वाजतां मी घरांतून बाहेर पडलों.

× × × ×

आम्ही राजवाड्यांत गेलों, त्या वेळीं मधु आणि भास्कर दोघेहि तेथें बसलेले होते. मधु मला म्हणाला, " तुम्ही घरीं सांपडलांत, तर तुम्हांला निश्चित कांहीं तरी धोका होईल, असं नऊ वाजतांच आम्हांला कळलं. तेव्हांपासून आम्ही दोघे तुम्हांला कुठं तरी सुरक्षित स्थळीं आणावं, अशा खटपटींत होतों. दोन तीन ठिकाणीं प्रयत्न केला, पण जमलं नाहीं. आज जो तो आपआपल्या फिकिरींत आहे. तेव्हां कुणाला आग्रह करणंहि योग्य झालं नसतं. पण, इथं आल्यावर महाराजांना सारी परिस्थिति आम्ही स्पष्ट सांगतांक्षणींच त्यांनीं तुम्हाला आणायचं ठरवलं न् मोटर पाठविली. पण, मला सारखं वाटत होतं, बाईंना सोडून तुम्ही येता कीं नाहीं !—"

" बरोबर आहे तुझी शंका. शांताबाईनं जर निक्षून सांगितलं नसतं, तर कांहीं त्या दोघींना घरीं सोडून मी आलों नसतों आज इथं—"

" चूक झाली असती, भाऊसाहेब, तुमची! लोकांचा राग तुमच्यावर आहे, त्यांच्यावर नाहीं; धोका तुम्हाला आहे, त्यांना नाहीं. मोटर पाठवून जर तुम्ही आला नसतांत, तर आम्ही महाराजांना घेऊन आलों असतों तुम्हाला न्यायला—"

" पण, भास्कर, त्या दोघी घरीं एकट्या आहेत. मी त्यांना सांगून आलों येतांना तुमच्यापैकीं कोणाला तरी पाठवतों लगेच म्हणून—"

" तुम्ही यांना पाठवूं नका या स्थितींत बाहेर, भाऊसाहेब. मी माझा माणूस पाठवतों आपल्या घरीं. तो काळजी घेईल आपल्या मंडळीची. बाकी तशी कांहीं भीति नाहीं म्हणा बायामाणसांना. धोका खरोखरी तुम्हालाच होता!—"

राजेसाहेब म्हणाले. मी त्यावर कांहीं बोललों नाहीं. फक्त मधुकडे पाहिलें. त्यानें माझें मनोगत ओळखलें आणि तो राजेसाहेबांना म्हणाला, " महाराज, आम्हीच जातों बाईंच्या सोबतीला. आपण मनुष्य पाठवूं नका—"

" हें काय भलतंच बोलतां तुम्ही? बाहेर केवढा कल्ला चालला आहे आणि तुम्ही कुठं जाणार त्या दंगलींत? छे, छे! तुम्ही इथंच थांबा. मी पाठवतों आमच्या माणसाला—"

आणि त्यांनी हुजऱ्याला हांकहि मारली.

तोंच प्रभाकर आणि मधु आंत आले.

त्यांना पहातांच भास्कर म्हणाला, " मधु, तूं न् प्रभाकर इथं थांबा. मी न् मधु जातों बाईंच्या सोबतीला—"

आणि महाराजांनीं कांहीं म्हणण्यापूर्वीच ते दोघे बाहेर पडले.

ते दोघे गेल्यावर महाराजांनीं प्रथम आपले आप्त ग्वाल्हेरचे सरदार श्रीमंत काकासाहेब इंगळे यांच्याशीं माझा परिचय करून दिला; व हुजऱ्याला आमच्या जेवणाची तयारी करावयाला सांगितलें.

तेव्हां मी त्यांना म्हटलें, " मला सोमवार असल्यामुळं मी सूर्यास्तानंतर जेवीन, महाराज. मुलांचीं जेवणें झालेलीं आहेत. पण माझं स्नान मात्र व्हायचंय—"

त्यांनीं हुजऱ्याला स्नानाची तयारी करावयाला सांगितलें. इतक्यांत त्यांच्या पत्नी सौ. कांचनमालाराणीसाहेब आणि भगिनी कु. प्रमिलाराजे तेथें आल्या. त्या दोघींशीं त्यांनीं आमची ओळख करून दिल्यावर कु. प्रमिलाराजे मीनाला आंत घेऊन गेल्या; व मी स्नानाला जाण्यासाठीं उठलों.

बाहेर सुरू असलेला प्रचंड गलका सारखा कानांवर आदळत होता. महाराज अत्यंत अस्वस्थ झालेले होते. ते एकदम टेलिफोनवर हात ठेवून उद्गारले, "शहरांत इतकी धूम मचली असतां हे कर्फ्यू का नाहीं जारी करीत अजून? तुम्ही इथं आलांत भाऊसाहेब, त्याच वेळीं जोशी हायस्कूलच्या इमारतीला आग लावून जमाव डॉ. परांजप्यांच्या हॉस्पिटलकडे वळला होता. खरोखरी जोशी हायस्कूलवर हल्ला झाला, तेव्हांच कर्फ्यूचा हुकूम काढून मिलिटरी पाठवायला हवी होती त्यांनीं शहरांत! कालपासून शहरांत गडबड आहे हें काय त्यांना माहित नव्हतं? मी फोन करून पाहूं का पं. शुक्लजींना?—"

"मला वाटतं, तुम्ही प्रथम कोतवालींत फोन करून चौकशी करा न् मग पंडितजींशीं बोला —"

मी त्यांना सुचविलें आणि स्नान करावयाला गेलों.

मी न्हाणीघरांतून बाहेर येतों न येतों, तोंच श्री. शिर्के मला बोलवावयाला आले.

मी ताबडतोब खालीं आलों. महाराज टेबलापाशीं उभेच होते. मला पहातांच ते उद्गारले, "तुम्ही पाह्यलं का भाऊसाहेब, वरच्या गच्चींतून? आपल्या शेजारच्या गोखल्यांच्या दुकानाची लूट चालली आहे—"

"काय? गोखल्यांच्या दुकानाची लूट? म्हणजे शहर कोतवालीच्या अगदीं नाकासमोरच दंगल सुरू आहे म्हणायची! पण पोलिस काय करताहेत?—"

"कोतवालींत तर कोणीच असल्याचं दिसत नाहीं. मी मघाचपासून सारखा फोनवर हात ठेवूनच बसलोंय. पण कोणी उत्तर देईल तर शपथ! डी. सी., डी. एस्. पी. सारे गायब झालेले दिसताहेत आज!—"

"ते शहरांत फिरतीवर असतील बहुतेक—"

"पण मग कोतवालीपासून हाकेच्या अंतरावर असलेल्या दुकानाची लूट कशी होऊं शकते? पोलीस काय करताहेत?—"

" पण, महाराज, जोशी हायस्कूलची इमारत जी जाळण्यांत आली, ती सुद्धां पोलीस नाक्याच्या अगदीं समोरच आहे ना? त्याच प्रकाराची आवृत्ति आतां या दुकानाच्या बाबतींत निघतेय म्हणायची!—"

तोंच श्री. शिर्के गडबडीनें आंत येऊन म्हणाले, " महाराज, गोखल्यांच्या दुकानाला आग लावली आहे लोकांनीं. आपल्या गच्चीवरून दिसतोय सगळा प्रकार. ज्वाळा न् धूर यांचे नुसते लोट चालले आहेत—"

" छान! आपल्या वाड्यापर्यंत येऊन थडकली म्हणायची दंगल! काका-साहेब, तुम्ही बंदुका काढून भरायला सांगा आपल्या. आपण तयारीनं असलं पाहिजे—"

" महाराज, आपण आतां फोन करा पंडितजींना—"

" मी मघाशींच फोन करणार होतों, भाऊसाहेब. पण तुम्ही नको म्हणा-लांत म्हणून थांबलो. पण, आतां जर मी फोन केला, तर गैरसमज होईल माझ्याबद्दल—"

" का बरं? गैरसमज कशाबद्दल होणार?—"

" तुम्हाला माहित नाहीं, भाऊसाहेब! गोखल्यांचं दुकान आमच्या इमारतींत आहे. आतां मी जर फोन केला, तर पोलिस अधिकारी म्हणतील स्वतःच्या इमारतीला आग लागल्यामुळं फोन केला मी!—"

" नाहीं महाराज, असं कोणी म्हणूं शकणार नाहीं आपल्याला या वेळीं! गोखल्यांच्या दुकानाला लावण्यांत आलेली आग जर भडकली, तर त्या बाजूच्या सगळ्या दुकानांची होळी होऊन जाईल. आपण फोन करा ताबडतोब पंडित-जींना न् त्यांच्या कानांवर प्रकार घाला हा सगळा!—"

महाराजांचा हात फोनवर होताच. त्यांनीं तत्क्षणींच मुख्य प्रधान पं. शुक्ल यांना फोन केला आणि त्यांना सर्व हकीकत सांगून कर्फ्यू ताबडतोब जारी करण्याची विनंति केली.

टेलिफोनवर चालू असलेलें तें संभाषण आम्ही मुकाट्यानें ऐकत होतों. गोखल्यांचें दुकान राजवाड्यापासून पुरतें एक फर्लांगाच्या अंतरावरहि नव्हतें. तेथपर्यंत लुटालूट आणि जाळपोळ यांचें सत्र येऊन थडकल्यामुळें महाराज

साहजिकच क्षुब्ध होऊन गेले होते. पं. शुक्ल त्यांच्याशीं काय बोलत होते, हें कळावयाला अर्थातच मार्ग नव्हता. पण महाराजांचा क्षोभ मात्र सारखा वाढत होता. ते शेवटीं उद्गारले, "आपण मला परवानगी द्या, पंडितजी! म्हणजे मी शहराच्या बंदोबस्ताची सारी जबाबदारी स्वतःवर घेऊन दंगल आटोक्यांत आणतों ताबडतोब!...सकाळीं नऊ वाजल्यापासून शहरांत उधम चालू आहे. जोशी हायस्कूल आपल्या साऱ्या अधिकाऱ्यांच्या डोळ्यासमोर जाळलं गेलं असं सांगताहेत मंडळी. महालांतलीं दुकानंहि लुटलीं न् जाळलीं जात आहेत. आणि अजून कर्फ्यू लागू करण्यांत येऊं नये, याचा अर्थ लोक काय करतील?......आपण मला हुकूम करा! मी आतां दंगल आटोक्यांत आणून दाखवतों आपल्याला—"

आणि त्यांनीं रागारागानें फोन खालीं ठेवला.

ते बोलण्याच्या मनःस्थितींत नव्हते. त्यांनीं हुजऱ्याला हांक मारून मोटर काढावयाला सांगितली आणि ते मला म्हणाले, "मी जरा शहरांतून फेरफटका करून येतों. तुम्ही आराम करा आतां—"

"मला वाटतं, आपण पं. मिश्र यांना फोन करून पहावा एकदा—"

माझी ही सूचना ऐकतांच ते हसले आणि म्हणाले, "तुम्हाला माहित नाहीं, भाऊसाहेब? पं. मिश्र इथं नाहींत. दिल्लीला गेले आहेत ते आज नागपुरांत असते, तर हें इतकं खचित पेटूं दिलं नसतं त्यांनीं!—"

"मला वाटतं, शहरांत इतकी धूम चालू आहे हें कळल्यावर तरी आपल्या मंत्र्यांनीं स्वतः जातीनं दंगलीच्या भागांत येऊन शांतता स्थापन करण्याचा प्रयत्न करायला हवा होता. लोकांना समजुतीच्या गोष्टी सांगून आवरणं हें काम आहे त्यांचं. हा कांहीं जातीय किंवा राजकीय दंगा नव्हे. एका प्रकारें लोकक्षोभाचा स्फोट आहे हा! कॉंग्रेसमंत्री आणि कॉंग्रेसनेते यांनीं जर मनांत आणलं न् एकवटून प्रयत्न केला, तर खवळलेल्या जमावाला शांत करणं कठीण नाहीं त्यांना—"

"तुम्हांला कांहीं कल्पना नाहीं, भाऊसाहेब, शहरांत काय चाललं आहे याची! म्हणून तुम्ही बोलतां आहांत या गोष्टी! कुंपणानं शेत खायला सुरवात

करावी, तसा प्रकार चाललेला आहे शहरांत सध्यां! आतां दोन वाजले आहेत. मी पाहून येतों शहरांत काय चाललंय तें—"

महाराज लगेच आंत गेले आणि लष्करी पोषाख करून बाहेर आले. त्यांच्या पाठोपाठ राणीसाहेब आणि प्रमिलाराजेहि आल्या.

"अजून स्नान न् जेवण झालेलं नाहीं आपलं. आणि इतकी भयंकर दंगल चालू असतां आपण कुठं जातां बाहेर?—"

"जेवण आज दंगल थांबल्यावर! आपण कांहीं काळजी करूं नका, राणीसाहेब. मी कुठंहि गेलों, तरी रक्षण करूं शकतों आपलं. शहरांत इतकी उधम चालू असतां, आपलेच लोक बेफामपणानं आपल्या लोकांचीं घरदारं लुटीत न् जाळीत सुटले असतां घरीं स्वस्थ बसणं शोभणार नाहीं भोसल्यांच्या घराण्यांत जन्म घेतलेल्या माणसाला!—"

महाराज हंसून उद्गारले. राणीसाहेब आणि राजभगिनी कांहीं बोलल्या नाहींत. पण मी म्हटलें, "आपलं हें बोलणं ऐकून आपले वडील राजे लक्ष्मणरावसाहेब यांची आठवण झाली मला. चोवीस वर्षांपूर्वी हिंदु-मुसलमानांच्या दंग्याच्या वेळीं गोळीबार चालू असतां त्या गोळयांच्या वर्षावांत ते जाऊन उभे राहिले होते कोष्टीपुऱ्यांतील चौकांत! डॉ. मुंजे नेहमीं मोठ्या अभिमानानं वर्णन करित असतात त्या विलक्षण प्रसंगाचं—"

"तेंच रक्त आहे हें, भाऊसाहेब! संकटाच्या वेळीं जर लोकांच्या हांकेला आम्ही धावून गेलों नाहीं, तर नागपुरांत रहायचं कशाला आम्ही आणि भोसले तरी म्हणवून कशाला घ्यायचं स्वतःला?—"

महाराज मोटारींत बसले आणि मी वर दिवाणखान्यांत येऊन कोचावर लेटलों.

माझ्या मनाला यत्किंचित्‌हि स्वस्थता नव्हती. मला सारखें वाटत होतें, भास्कर आणि मधु हे जरी शांताबाईच्या सोबतीला जाण्यासाठीं निघाले असले, तरी ते जर घरीं पोंचूं शकले नाहींत, तर जमावानें घेरलेल्या त्या घरांत त्या दोघींची स्थिति काय झाली असेल? त्यांना धीर कोण देईल? गेले दोन दिवस माझ्या एकट्याच्या जिवाला धोका आहे, असेच निरोप सारखे येत होते, ही गोष्ट खरी. पण त्याबरोबरच घराला आग लावली जाणार असल्याचीहि एक बातमी वारंवार कानावर येतच होती ना? जोशी हायस्कूल जाळण्यांत आलें,

ताम्हनकर आणि गोखले यांचीं दुकानें जळत आहेत, 'नरकेसरी' प्रेसची शेड फोडून त्याची नासधूस करण्यांत आली, डॉ. परांजपे यांच्या मोटारी शुक्रवार तलावांत टाकण्यांत आल्या, या जर मधांचपासून ऐकलेल्या विध्वंसाच्या हकीकती खऱ्या असतील, तर आपल्या 'शांतानिवासा'चें तरी काय झालें असेल? त्यालाहि आग लावण्यांत आली नसेल कशावरून? आणि, त्याला जर आग लावण्यांत आली असेल, तर?...तर शांताबाई आणि तिची वृद्ध आत्या या क्षणीं कोणत्या अवस्थेंत, कोणत्या परिस्थितींत आणि मनःस्थितींत असतील? मी घरांत नाहीं असें पाहिल्यावर चिडलेल्या नादान, माथेफिरू, अत्याचारी जमावानें घराचीं सारीं दारें लावून घेऊन, त्या दोन असहाय एकाकी अबलांना घरांत कोंडून तर त्याला आग लावून दिली नसेल ना?—

— माझ्या जिवाची सारखी तडफड होत होती, माझे डोळे सारखे जळत होते. मला क्षणोक्षणीं वाटत होतें, आपण त्या दोघींना घरीं एकटें टाकून येण्यांत चूक केली. शांताबाईच्या धैर्याबद्दल माझी खात्री होती. १९४४ च्या डिसेंबरांत त्या वेळीं भूमिगत असलेल्या सौ. अरुणा असफअली या श्री. अच्युत पटवर्धन यांची चिठ्ठी घेऊन गुप्त वेषानें अकस्मात् आमच्याकडे आल्या असतां तिला त्यांचें स्वागत करावयाला यत्किंचितही शंका वाटली नव्हती. किंबहुना, १९४२ च्या ऑगस्टमधील दंगलींत शहरांत लष्कराची गस्त आणि गोळीबार चालू असतां, कर्फ्यूचा अंमल सुरू झाल्यावर लष्कर आणि जमाव यांचा झटापट जागोजाग सुरू असतां, त्या भयानक परिस्थितींत ती इतवारींतील ऑगस्ट कार्यकर्त्यांच्या गुप्त सभेला हजर राहून रात्रीं सुखरूप घरीं परत आली होती. पण तो प्रसंग वेगळा आणि हा प्रसंग वेगळा! त्या वेळीं जमाव आमच्या बाजूला होता; आज तो आमच्यावर उलटलेला आहे. अशा वेळीं शांताबाई कितीहि धीट, कितीहि प्रसंगावधानी असली, तरी एकटी काय करूं शकेल? समजा, मी घरांत नाहीं असें दिसून आल्यावर चवताळलेल्या जमावानें जर दारें बंद करून घराला आग लावली, तर ती त्या आगींतून आपल्या आत्याला घेऊन कशी बाहेर पडूं शकेल? तिला त्या भयंकर प्रसंगांत कोण सहाय्य करील? तिच्या हांकेला कोण धांवेल? छे, छे! तिला एकटी टाकून येण्यांत चूक केली आपण —

हे विचार माझ्या मनांत थैमान घालीत आहेत, तोंच हुजऱ्या आंत आला न् मला म्हणाला, " खालीं बोलवताहेत आपल्याला— "

मला वाटलें, महाराज परत आले असावेत शहरांतून फिरून. म्हणून मी तसाच गडबडीनें उठून खालीं आलों, तों भास्कर आणि मधु माझी वाट पहात उभे असलेले दिसले.

" का रे ? का आलांत ? घरीं गेलां होतात ना ? का वाटेंतूनच परतावं लागलं तुम्हाला ? — "

" वाटेंतून परतण्यासारखीच परिस्थिति होती खरोखरी, भाऊसाहेब ! पण आम्ही बोळा बोळांतून रस्ता काढीत कसेबसे घरीं पोचलों. दुपारीं दोनच्या सुमारास घरावर एकदम जमाव चालून आला. तीन चार हजार तरी लोक असावेत. खिडक्या दारं सगळीं बंद केलेलीं होतीं. पण, एवढे मोठमोठाले दगड सगळ्या बाजूंनीं घरावर आले कीं, शेवटीं बाईनीं दारं उघडायला सांगितलीं आम्हाला. दारं उघडल्याबरोबर लोकांनीं आंत घुसून प्रथम चौकशी केली तुमची. बाईनीं त्यांना सांगितलं, तुम्ही घरांत नाहीं म्हणून. त्यांनीं सगळीकडे तपास करून शोध घेतला तुमचा. माडीवरहि जाऊन आले. तुम्ही घरांत नाहीं अशी त्यांची पक्की खात्री झाल्यावर त्यांनीं आम्हाला विचारलं ' कुठं गेले आहेत ? '—' आम्हाला माहित नाहीं ! ' असं उत्तर दिलें आम्ही. त्याबरोबर त्यांनीं आम्हाला बाहेर निघायला सांगितलं. बाई बाहेर निघायला बिलकूल तयार नव्हत्या. त्या सारख्या म्हणत होत्या, ' काय व्हायचं असेल, तें इथेंच होऊं द्या आमचं ! त्यांनीं माझ्यासाठीं एवढ्या हौसेनें रक्ताचं पाणी करून बांधलेलं घर आहे हें ! — तें सोडून जाणार नाहीं मी ! पाहूं या काय करतात तें आमचं ! ' पण आम्ही दोघांनीं त्यांना न् आत्याबाईंना अखेर हात धरून बाहेर काढल्या. जमावानं मुकाट्यानं रस्ता करून दिला आम्हांला. आमच्या समोरच घराची नासधूस न् सामानाची लुटालूट व्हायला सुरवात झाली होती. मी रस्त्यावर आल्यावर बाईंना विचारलं, ' कुठं जायचं आपण आतां ? ' तेव्हां त्या म्हणाल्या, ' कोठीवानांकडे पोंचवून द्या आम्हांला. तिथं गेल्यावर मग ठरवूं पुढं काय करायचं तें ! ' त्याप्रमाणें त्यांना कोठी-वानांकडे पोंचवून दिलं आम्ही न् लगेच इथं आलों — "

" कोठीवानांनीं ताबडतोब घेतलं त्यांना घरांत ?—"

" हो. बाईनीं सरळच विचारलं त्यांना, ' तुमची तयारी आहे ना आम्हांला घरांत घ्यायची ? आमच्यामुळं तुम्हांलाहि त्रास होईल एकादे वेळीं ! ' पण, शंकरराव आणि सुशीलाबाई दोघंहि म्हणाली, ' आमचं काय होईल, तें होवो ! पण तुम्हाला आम्ही जाऊं देणार नाहीं या वेळीं दुसरीकडे ! ' त्या आंत गेल्यावर आम्ही तसेच तडक तुम्हाला हें सगळं सांगण्यासाठीं इथं आलों—'

" आणि घर तसंच उघडं पडलेलं आहे ? त्याची काय व्यवस्था ?—"

" तुम्ही म्हणत असाल, तर आम्ही पुन्हा परत जाऊन कुलपं लावून येतों घराला. बाकी आमच्या समोरच लुटालुटीला न् नासधुशीला सुरवात झाली होती—"

" आग तर नव्हती लावली ना घराला तुमच्या समोर ?—"

" नाहीं. आणि आग लावणारहि नाहींत बहुतेक. कारण, त्या भागांत तेंच घर सर्वात मोठं असल्यामुळें, तें जर पेटलं, तर त्या भागांतल्या सगळ्या घरांची होळी होऊन जाईल. आणि भोवतालचीं तीं सगळीं घरं ब्राह्मणेतरांचीं आहेत ! तेव्हां तुमचं घर जाळून त्याची राखरांगोळी करावी असं जरी कदाचित् त्यांच्या मनांत असलं, तरी भोंवतालचीं सगळीं घरं त्यांच्याच लोकांचीं असल्यामुळं, आपल्या घराला आग लावली जाणार नाहीं असं वाटतं मला. फार तर घर साफ करून टाकतील सगळं !—"

" पण, मला वाटतं, तुम्ही पुन्हा एकदां तिथपर्यंत जाऊन घर बंद करून यावं. घर जर उघडं राह्यलं, तर त्याचीं खिडक्या दारंसुद्धां शिल्लक ठेवणार नाहींत लोक !— "

हें मी त्या दोघांशीं बोलत आहे, तोंच महाराज आंत आले. त्याबरोबर मी त्यांना विचारलें, " काय खबर आहे, महाराज ?—"

" कर्फ्यू लागतोय, आतां भाऊसाहेब. पुकारा सुरू झाला आहे—"

" इतकी जाळपोळ न् लुटालूट झाल्यावर आमच्या मंत्रिमंडळाला अखेर जाग आला म्हणायचा !—"

नंतर मी महाराजांना आमच्या घरासंबंधींची माहिती सांगितली. तेव्हां त्यांनीं विचारलें, " तुम्ही बाईना इथं का नाहीं आणलंत, भास्करराव ?—"

"शक्य नव्हतं, महाराज. रस्त्यांत इतकी भयंकर गर्दी न् दंगल आहे कीं, इतक्या लांब त्यांना आणणं मुष्किल झालं असतं. कोठीवानांचं घर जवळ आहे त्या मानानं; न् बाईंनींहि तिथंच जायचा आग्रह धरला. कोठीवानांनीं जर त्यांना ठेऊन घेतलं नसतं, तर मग कसंहि करून त्यांना इथं आणणं भागच पडलं असतं आम्हाला—"

"कोठीवानांनीं मोठी हिंमत केली, भाऊसाहेब!—"

"हो. अशा संकटांत कोण कुणाला थारा देतो, महाराज? आपले न् कोठीवानांचे फार उपकार झाले खरोखरी आमच्यावर—"

"उपकारांची बात बोलूं नका, भाऊसाहेब. आम्ही स्वतःला आजहि नागपूरकर भोसले म्हणवतो; न् नागपूर आमचं आहे असं समजतों आम्ही. तेव्हां आमचं कर्तव्यच आहे संकटाच्या प्रसंगीं नागपूरच्या जनतेला संरक्षण द्यायचं. आमचं जें कांहीं राजेपण लोकांच्या दृष्टीनं अजून शिल्लक उरलंय, तें कामीं आलं पाहिजे अशा वेळीं! तरच त्याचा उपयोग! पण कोठीवानांची मात्र हिंमत खरी! त्यांतून ते ब्राह्मण आहेत!!—"

महाराज हंसत हंसत म्हणाले.

"खरं आहे महाराज, आपलं म्हणणं. या सगळ्या संकटांत एक समाधान मात्र माझ्या मनाला नेहमींच राहील—"

"कसलं समाधान?—"

"माझं घर जरी बहुजनसमाजानं उध्वस्त केलं असलं, तरी त्या बहुजनसमाजापैकींच एकानं मला या संकटांत आश्रय दिला—"

"पण तुमचा तो बहुजनसमाज मला पुठं आपला समजतो आहे, भाऊसाहेब?—"

"तेंहि बरोबरच आहे, महाराज! आपण बहुजनसमाजापैकीं असलांत, तरी अखेर 'राजे' आहांत, हें विसरूं नका. आपण बहुजनसमाजाचे खरे; पण आपलं स्थान मात्र बहुजनसमाजांत नाहीं. आपण त्यांच्यापैकीं आहांत; पण त्यांचे मात्र नाहीं—"

"तुम्ही काय म्हणाल तें खरं आहे, भाऊसाहेब! तुम्हीच हें बहुजनसमाजाचं खूळ वाढवलं या नागपुरांत. तुमच्या 'तरुण भारता'नं जर बहुजन-

समाजवाल्यांना उचलून धरलं नसतं, तर नागपुरांत कोणी पुसत नव्हतं त्यांना! 'तरुण भारता 'नं त्यांना प्रसिद्धि देऊन मोठं केलं—"

"त्या उपकारांचे आज छान पांग फेडले बहुजनसमाजवाल्यांनीं 'तरुण भारता 'चा विध्वंस करून! पण, महाराज, माझी एक विनंति आहे आपल्याला—"

"काय? बाईंना आणायच्या इथं? चला, माझी तयारी आहे—"

"नाहीं. कर्फ्यू जारी होऊन शहर शांत झाल्यावर बाईंना घेऊन येऊं आपण संध्याकाळीं. त्या कोठीवानांकडे असल्यामुळं आतां सुरक्षित आहेत अगदीं. माझी विनंति एवढीच आहे कीं, आपण तीन चार कुलपं द्यावींत ताबडतोब आम्हांला--"

"कुलपं कशासाठीं?—"

"हे दोघे सांगताहेत कीं, घर उघडं आहे अगदीं. तेव्हां, घराची किंवा आंतल्या सामानाची आणखी नासधूस होऊं नये म्हणून घर बंद करायला चालले आहेत हे—"

"पण भास्करराव, तुम्ही जाणार कसे आतां बाहेर? कर्फ्यूचा पुकारा सुरू झालाय न् मिलिटरी नाकेबंदी करून राह्यली आहे. अशा स्थितींत तुम्हांला बाहेर जाणं शक्य नाहीं अगदीं—"

"पण घर उघडं टाकून कसं चालेल महाराज?—"

"तें तर खरंच. पण हे घरापर्यंत जाऊं कसे शकतील हा प्रश्न आहे माझ्यापुढं—"

"आम्ही जाऊं कसे तरी, महाराज! आपल्याला काळजी नको त्याची. फक्त आपण तीन चार कुलपं द्या लवकर आम्हांला म्हणजे झालं—"

"आनंद्या, कुलपं आणा रे चार पांच चांगलीं मोठालीं! कुलपं देतो मी तुम्हांला, भास्करराव पण कर्फ्यूचा अंमल जारी झाल्यावर तुम्हीं दोघांनीं बाहेर जाणं, हें दंग्यांत बाहेर जाण्यापेक्षांहि जास्त धोक्याचं आहे एका दृष्टीनं—"

"मला वाटतं, हे आपल्या वाड्याच्या मागून कोठींतून जाऊं शकतील भाऊसाहेबांच्या घरापर्यंत. कोठींतला रस्ता अगदीं खाजगी आहे—"

सरदार काकासाहेब इंगळे यांनीं सूचना केली. त्याबरोबर महाराज हंसून उद्गारले, " हो, माझ्या लक्षांतच नव्हता आपल्या कोठींतला रस्ता. कुणीतरी माहितगार मनुष्य द्या यांच्याबरोबर रस्ता दाखवायला. पण, भास्करराव, तरी सुद्धां फार काळजी घेतली पाहिजे तुम्ही. नाहीं तर कोतवालींत नेऊन बसवतील तुम्हांला—"

" बसवलं तरी कांहीं हरकत नाहीं ! तेथून फोन करूं आम्ही आपल्याला न् सुटका करून घेऊं स्वतःची—"

त्यानें हंसत हंसत उत्तर दिलें; व हुजऱ्यानें आणलेलीं तीं अवजड भक्कम कुलपें घेऊन तो मधुसह त्याच्या मागोमाग बाहेर पडला.

" आतां आधीं जेवण उरकून घ्या महाराज, आपण. दंगा थांबण्यासंबंधींची आपली अट पूर्ण झाली आहे. म्हणून प्रथम आपण भोजन करा आतां—"

" मी सुद्धां त्याच विचारांत आहे, भाऊसाहेब. कर्फ्यूची दंवडी झाली असली, तरी अद्याप कल्ला थांबलेला दिसत नाहीं. दंगेखोरांना फार तर सात आठ तासच मिळाले असतील उधम मचवायला. पण तेवढ्या वेळांत त्यांनीं महालांत किती जाळपोळ न् नासधूस केली ! पाध्ये, ताम्हनकर, गोखले वगैरेंचीं दुकानं साफ निकालांत निघालीं न् हजारों रुपयांचा माल हमरस्त्यावर जाळला गेला. आणि हें सगळं पोलिस अधिकाऱ्यांच्या डोळ्यांदेखत घडलं—"

" मला वाईट वाटतं, तें याच गोष्टीचं. सरकारविषयीं लोकांना वाटणारा धाक अशा प्रकारामुळं एकदां का कमी झाला, म्हणजे सरकारचं अस्तित्व संपलं म्हणूनच समजायला हवं खरोखरी. गांधीजींच्या खुनामुळं लोकांनीं चवताळून खवळून जावं हें अगदीं स्वाभाविक आहे. पण, खून होऊन गेल्यावर आतां तीन दिवसांनीं झालेली ही दंगल मात्र स्वाभाविक वाटत नाहीं; न् पोलिसांच्या डोळ्यांदेखत दिवसाढवळ्या शहराच्या मुख्य भागांत जाळपोळ व्हावी हा प्रकारहि आकस्मिक वाटत नाहीं—"

" आपण हें इथं बसून बोलतां आहांत, भाऊसाहेब ! माझ्याप्रमाणं शहरांत फिरून जर आपण सर्व प्रकार पाहला असतात तर, मला वाटतं, आपण यापेक्षां फार भयंकर बोलला असतात ! आपल्याला कल्पना नाहीं आज सकाळपासून

शहरांत सारे वरिष्ठ अधिकारी फिरत असतां काय काय प्रकार कसे कसे घडले आहेत याची—"

" मला पूर्ण कल्पना आहे, महाराज ! गेल्या शनिवारपासून ज्या अर्थी माझ्या जिवाला धोका असल्याचे न् आमचा प्रेस जाळला जाणार असल्याचे निरोप सारखे येत होते, त्या अर्थी मला कल्पना नाहीं असं कसं म्हणतां आपण ? पण कल्पना असून तरी काय उपयोग होता या परिस्थितींत ? शहर कोतवालीपासून हांकेच्या अंतरावर म्युनिसिपल कचेरीच्या अगदीं समोर असलेलं गोखल्यांचं हमरस्त्यावरलं दुकान लुटलं न् जाळलं जावं, त्यांना कोणत्याही प्रकारची मदत कोतवालीकडून किंवा म्युनिसिपालिटीकडून मिळूं नये, याचा अर्थ काय होतो ? लोकांचीं माथीं भडकून गेलीं होतीं, हें खरें; पण जबाबदार मंत्र्यांचीं माथीं तर ठिकाणावर होतीं ना ? ते काय करीत होते शहरांत लुटालूट न् जाळपोळ चालू असतांना ? जोशी हायस्कूल सकाळीं दहाच्या सुमाराला जेव्हां जाळलं गेलं, तेव्हांच जर त्यांनीं कर्फ्यू लागू केला असता, तर परिस्थिति इतकी खचित विकोपाला गेली नसती. वरिष्ठ सरकारी अधिकारी हजर असतां त्यांच्या डोळ्यांदेखत पोलिस नाक्यासमोर असलेलं तें हायस्कूल जाळलं गेलं न् त्यानंतर पांच तासांनीं कर्फ्यू लागला, हा प्रकार काय आमच्या मंत्र्यांच्या कीर्तींत भर घालणारा आहे ? मंत्र्यांच्या असल्या ढिल्या न् भित्र्या धोरणामुळं लोकांचा सरकारविषयींचा धाक न् विश्वास जर कमी झाला, वाटेल तेव्हां हातांत कायदा घेण्याची ही जमावाची प्रवृत्ति जर बळावत गेली, तर सरकार, स्वातंत्र्य आणि सुराज्य हीं तरी किती दिवस टिकतील ? कचदिल, कमजोर मंत्री हेच कोणत्याहि सरकारचे, कोणत्याहि देशाच्या स्वातंत्र्याचे आणि सुराज्याचे खरे शत्रु असतात—"

" आपण ' तरुण भारतां 'तून लिहिणार का हें सगळं ?—"

महाराजांनीं हंसून विचारलें.

" तें कसं सांगूं मी आज ? या संकटांतून बाहेर पडल्यानंतरच्या गोष्टी आहेत त्या. पण एक गोष्ट मात्र, महाराज, मी आतांच आपल्याला सांगून ठेवतों. माझ्या लेखणीचं सगळं बळ एकवटून अखिल महाराष्ट्राच्या निदर्शनाला हा सारा प्रकार आणल्याशिवाय राहणार नाहीं मी ! कॉंग्रेस कार्यकर्ते आणि

काँग्रेसमंत्री यांची जी वृत्ति या साऱ्या प्रकरणांत प्रतीत झालेली आहे, ती स्वातंत्र्य, सभ्यता आणि नागरिकत्व यांच्या सगळ्या कल्पनांना हरताळ फांसणारी आहे. अडाणी, अप्रबुद्ध जमावाला मी दोष देत नाहीं आणि जबाबदारहि धरीत नाहीं या प्रकाराबद्दल. खुनाची बातमी आल्यापासून ज्यांनीं भलभलत्या कंड्या पिकवून आणि खोटानाटा प्रचार करवून रान उठवलं, या संधीचा फायदा घेऊन आपल्याला अप्रिय असलेल्या जातींवर, पक्षावर, संस्थांवर आणि व्यक्तींवर सूड घेण्याचा व्यूह रचला, त्यांना जबाबदार धरतों मी या साऱ्या अत्याचारांबद्दल. चवताळलेल्या जमावाच्या क्रोधाचा फायदा घेऊन त्यांनीं आपले खुनशी डाव परस्पर साधून घेतले ! शहरांत या अत्याचारांची तयारी चालू असल्याचं मंत्र्यांच्या कानांवर खात्रीनं गेलेलं होतं. तरीहि ते आपल्या कर्तव्याला जागले नाहींत न् सरकारच्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारी कमजोरी त्यांनीं दाखविली, याबद्दल त्यांनाहि दोष देतों मी. काँग्रेस कार्यकर्ते आणि काँग्रेसमंत्री हे जर या वेळीं आपल्या तत्वाला, ब्रीदाला आणि कर्तव्याला धैर्यानं जागले असते, तर निदान नागपुरास तरी ही आग खचित पेटती ना !—"

महाराज कांहीं बोलले नाहींत. ते आपले लष्करी कपडे उतरीत होते. आंत जातांना त्यांनीं मला विचारलें, " आपण जेवत नाहीं का माझ्याबरोबर ? आतां चार वाजून गेले आहेत, सोमवार सोडायला कांहीं हरकत नाहीं—"

" नाहीं, महाराज. मी सूर्यास्त झाल्यावरच सोमवार सोडतों नेहमीं—"

" मग आपण चहा घ्या आतां. मी जेवून येतों लगेच —"

मी चहा घेण्यासाठीं दिवाणखान्यांत गेलों. चंद्रशेखर आणि मीना दोघेहि तेथें आधींच आलेलीं होतीं. काकासाहेबांनीं चहा ओतला. मी तोंडाला कप लावून घोट घेतों न घेतों, तोंच भास्कर आणि मधु आंत आले; व त्यांनीं माझ्यासमोर कुलपें ठेवलीं.

" का रे ? कुलपं परत कां आणलींत ? तुम्ही घरापर्यंत जाऊं शकला नाहींत का ?—"

" छे ! छे ! आम्ही घरापर्यंत जाऊन न् घर चांगलं आंतून बाहेरून मनसोक्त पाहून आलों—"

" मग घर बंद का नाहीं केलंत तुम्ही ?—"

" बंद करायला उरलंय काय घरांत ? साऱ्या घरभर कांचांचे तुकडे न् कागदांचा ढीग पडलेला आहे नुसता ! माडीवरल्या तुमच्या एवढ्या मोठ्या लायब्ररीपैकीं फक्त एवढं एक पुस्तक हाताला लागलं आमच्या. तें मुद्दाम त्या लायब्ररीचं ' स्मारक ' म्हणून आणलं आम्ही येतांना—"

बडोद्याच्या कविमंडळाचें 'करभार' हें पुस्तक भास्करनें हंसत हंसत माझ्या समोर ठेवलें

" घरांतलीं कपाटं, टेबलं, पलंग न् खुर्च्या हीं सुद्धां गेलीं का ? अगदीं कांहीं नाहीं राह्यलं घरांत ?—"

मीनानें हातांतला चहाचा कप खालीं ठेवून विचारलें. तिचे डोळे भरून आले होते.

" अग, टेबलखुर्च्यांचं काय विचारतेस, मीना ? घराचीं खिडक्या न् दारं सुद्धां शिल्लक उरलेलीं नाहींत. विजेचं फिटिंगसुद्धां सगळ उखडून टाकलंय ! न् नळांच्या तोट्या काढून टाकल्यामुळें त्यांचं पाणी धो धो वहातंय ! ! फक्त भिंती न् छप्पर तेवढं शाबूत आहे अजून ! म्हणून तर कुलपं परत घेऊन आलों आम्ही ! दारंच नाहींत, तर कुलपं लावायचीं तरी कुठं ?—"

भास्करनें उत्तर दिलें मीना कांहीं बोलली नाहीं, तिच्या डोळ्यांतून घळ घळा अश्रु वाहूं लागले.

" माडीवरलीं सगळीं पुस्तकं गेलीं, भास्कर ? मी न् चंदूनं सतत महिनाभर खपून त्यांचं वर्गीकरण केलं डिसेंबरच्या सुटींत न् नीट लावून ठेवलीं होतीं तीं कपाटांत. इतक्या पुस्तकांचं काय केलं असेल रे त्यांनीं ?—"

" सगळ्या घरभर कागदांचा ढीग झाला आहे, चंद्रशेखर ! फाडून, फेकून जाळून टाकलीं आहेत सारीं पुस्तकं ! आम्हांला परत येतांना आगाऱ्यांची ज्ञानेश्वरी शुक्रवार तलावांत तरंगतांना दिसली !—"

" तुकारामाच्या अभंगांची आई आहे ज्ञानेश्वरी ही ! त्या अभंगांच्या वह्या जर इंद्रायणींत तरल्या, तर ज्ञानेश्वरी कशी बुडेल शुक्रवार तलावांत ?—"

मी हंसत हंसत म्हटलें. पण चंद्रशेखरनें पुन्हा विचारलें, " घरांतलं सारं सामान गुंडांनीं लांबवलं न् जाळलं याचं नवल वाटत नाहीं मला. पण पुस्तकांचा नाश करून काय मिळालं त्यांना ?—"

" काय मिळालं ? अरे, नाश केल्याचा आनंद ! भाऊसाहेबांच्या बहुजन-समाजाला पुस्तकांचा काय उपयोग आहे ? पुस्तकांची किंमत तुम्हां आम्हांला! बिनडोक्याच्या, माथेफिरू, मूर्ख लोकांना पुस्तकें काय करायचीं आहेत ? त्यांनीं जर पुस्तकांचा योग्य उपयोग केला असता, तर असले अत्याचार करवले नसते त्यांना !—"

" खरं आहे तुझं म्हणणं, भास्कर ! अलेक्झांड्रियाची प्रचंड लायब्ररी जेव्हां धर्मवेड्या आततायी मुसलमान सैन्यानं जाळली, तेव्हां त्यांच्या सेनापतीनं असा युक्तिवाद केला होता कीं, ' या लायब्ररींतल्या पुस्तकांत जर कुराणांतलंच ज्ञान साठवलेलं असलं, तर त्यांचा कांहीं उपयोग नाहीं; न् कुराणाबाहेरलं ज्ञान जर त्यांत असलं, तर तें धर्मबाह्य म्हणून अनर्थकारक आहे. तेव्हां कोणत्याहि दृष्टीनं पाहिलं, तरी ही लायब्ररी जाळायला हरकत नाहीं. ' त्या मुसलमान सेनापतीच्या कोटींतले आहेत हे आपले गुंड ! मी मराठी पत्रकार परिषदेला सुचविलेल्या योजनेप्रमाणें जर नागपूर विद्यापीठातर्फे ' केळकर वृत्तविद्यालय ' ( Kelkar school of journalism ) निघालं असतं, तर त्याला हा सगळा ग्रंथ-संग्रह द्यायचा विचार होता माझा. पण आमच्या बहुजनसमाजानं निकाल लावला त्याचा—"

" एवढं सगळं सामान कुठं नेलं असेल त्यांनीं ?—"

मीनानें डोळे पुशीत विचारलें. मघाशीं अर्धवट पिऊन बाकी ठेवलेला चहाचा कप कांहीं तिनें पुन्हा उचलला नव्हता.

" अग, कुठं म्हणून काय विचारतेस ? एवढा शुक्रवार तलाव आहे कीं जवळच ! त्याच्या मायपोटांत आपलं घरसुद्धां मावलं असतं ! तें उचलून तलावांत टाकणं शक्य नव्हतं म्हणून भिंती न् छप्पर शाबूत राहिलंय त्याचं ! नाहीं तर भाऊसाहेबांचा सहृदय बहुजनसमाज तें सुद्धा करायला चुकला नसता !—"

भास्करचे ते उद्गार ऐकून मीना रडावयाला लागली. तेव्हां मी चटकन् उठून तिला जवळ घेतलें आणि तिच्या मस्तकावरून हात फिरवीत म्हटलें, " रडूं नकोस, बेटा ! मी पुन्हा पहिल्यासारखं घर सजवून देईन तुला. पण तूं पाणी काढूं नकोस डोळ्यांतून—"

" भाऊराव, आपण त्या घरांत आतां रात्रीं जाऊं नये पुन्हा असं वाटतं मला—"

चंद्रशेखरनें मध्येंच म्हटलें.

" ठीक आहे. जसं तुम्ही म्हणाल तसं. आपण धंतोलीवरच रात्रीं जाऊं, बेटा. पण तूं रडूं नकोस—"

" अग, रडण्यासारखं काय आहे त्यांत एवढं, मीना? श्रीकृष्णाची सोन्याची द्वारका त्याच्या डोळ्यांसमोर समुद्रांत बुडाली! पण त्याला एवढंसुद्धां वाईट वाटलं नाहीं त्याबद्दल आणि तूं अशी ओक्साबोक्शी रडते आहेस—"

चंद्रशेखरनें हंसत हंसत तिला म्हटलें.

पण मीना माझ्या कुशींत तोंड लपवून सारखी रडत होती.

तितक्यांत मधु आला आणि तिला म्हणाला—

" तूं घरीं चल आमच्या, मीना! तिथं कुसुम आहे. मजेंत वेळ जाईल तुझा—"

" नाहीं. मी भाऊरावांना सोडून जाणार नाहीं कुठं. पण भाऊराव, तुम्ही आतांच्या आतां बाईला न् आत्याला घेऊन या ना इथं—"

" आणूं हं, बेटा! महाराज जेवून उठले कीं लगेच बाईला घेऊन येऊं आम्ही—"

मधु, भास्कर आणि मधु तिघे आपसांत हळुहळू बोलत होते. भास्कर मला म्हणाला, " भाऊसाहेब, तुम्ही म्हणत असाल, तर आम्ही घेऊन येतों बाईंना आतांच्या आतां. मोटर आहेच दारांत उभी—"

" नको. महाराजांचं जेवण झाल्यावर मग पाहूं—"

तोंच हुजऱ्या वर येऊन म्हणाला, " महाराज खालीं बोलावताहेत आपल्याला—"

आम्ही खालीं गेलों, तों महाराज हातांत फोन घेऊन बसलेले आम्हांला दिसले. मला पहातांच ते उद्गारले, " आमच्या गोपाळराव पाठकांच्या घराची लूट चालली आहे, अशी बातमी आली आतांच. जेवण संपवून इथं आलों न् फोन आला बघा!—"

" काय सांगतां ? गोपाळराव कांहीं अ.मच्यासारखे कॉंग्रेसविरोधी समजले जात नाहींत. ते तर कॉंग्रेसचे आणि मंत्रिमंडळाचे कट्टे अभिमानी आहेत. मिश्रजींच्या गोटांतले न् मर्जीतले. त्यांच्यासारख्या कॉंग्रेसनिष्ठ माणसाचं घर कसं लुटलं जाईल, महाराज ?—"

" कसं लुटलं जाईल ? अहो, लूट चालू आहे आतां या वेळीं ! "

महाराज मनगटावरल्या घड्याळाकडे पहात उद्गारले.

" पण कर्फ्यू जारी होऊन आतां दीड तास होत आला आणि तरी घर लुटलं जातंय त्यांचं ?—"

" तीच तर मजा आहे, भाऊसाहेब !—"

" पण मग कर्फ्यू लागलाय कां खरोखरी ?—"

" त्याबद्दल शंकाच नाहीं. मी आतांच गच्चीवरून पाहून आलों सारं. रस्ते बहुतेक रिकामे झालेले आहेत; न् गस्तहि चालू आहे—"

" पण मग गोपाळरावांच्या घराची लूट कशी सुरू आहे या वेळीं ?—"

" तीच तर मख्खी आहे आजच्या दंगलीची ! कर्फ्यू लागला, रस्ते मोकळे झाले, गस्त चालू आहे आणि तरीहि लुटालूट कांहीं थांबलेली नाहीं ! त्यांच्य प्रमाणंच रामभाऊ साखरदांड्यांचंहि घर लुटलं जातंय असं ऐकलं मी —"

" नवल आहे खरोखरी ! मग कर्फ्यूचा उपयोग काय ?—"

" उपयोग हा दिसूनच राह्यलाय ! मी आतांच फोन केला कोतवालींत. ते म्हणतात, आम्ही इंतजाम करून राह्यलों आहोंत ! त्यांचा इंतजाम पुरा होई-पर्यंत आणखी किती घरं लुटलीं न् जाळलीं जाणार आहेत कोण जाणें —"

आणि लगेच महाराजांनीं फोनचा परिग्राहक उचलून आरोग्यमंत्री ना. डॉ. बालिंगे यांच्याशीं बोलावयाला सुरवात केली.

" दादा, हें काय चाललंय शहरांत ? आपलं लक्ष नाहीं का ? कर्फ्यू लागून आतां दोन तास होत आले, तरी लुटालूट न् जाळपोळ थांबत नाहीं शहरांतली, याचा अर्थ काय ? आतां या वेळेस आपल्या गोपाळराव पाठकांचं घर लुटलं जातंय............आपण शहरांत येऊन एकदां सारी परिस्थिति समक्ष पाहिल्याशिवाय आपल्याला कल्पना येणार नाहीं इथं काय चाललंय याची ! ...............भाऊसाहेब माडखोलकर दुपारीं बारा वाजल्यापासूनच आलेले

आहेत माझ्या घरीं. त्यांच्या घराचा न् 'तरुण भारत' प्रेसचा निकाल लागला जमावानें आज—"

आणि त्यांनीं माझ्या हातीं फोन देऊन म्हटलें, "दादा बोलताहेत तुमच्याशीं, भाऊसाहेब—"

ना. डॉ. बालिंगे यांनीं झालेल्या प्रकाराबद्दल खेद व्यक्त करून आमची कळकळीनें चौकशी केली आणि म्हणाले, "तुम्ही माझ्याकडेच राहायला या, भाऊराव. तुम्हांला कांहीं संकोच वाटण्याचं कारण नाहीं—"

त्यांच्या त्या अगत्याबद्दल मी त्यांचे आभार मानले आणि फोन पुन्हा महाराजांच्या हातीं दिला.

"मग आपण येताहांत ना शहरांत?............मी एकदां कोतवालींत जाऊन येतोंय पुन्हा............मग घरींच आहे मी—"

महाराजांनीं फोन खालीं ठेवला आणि ते मला म्हणाले, 'दादा आतां आधीं पंडितजींना भेटताहेत न् मग येताहेत शहरांत. मी जरा बाहेरून जाऊन येतों तोंपर्यंत. आपण जेवायला बसणार ना आणखी थोड्या वेळानं? मी काकासाहेबांना न् प्रमिलाराजांना सांगून ठेवलंयआपल्या जेवणाची तयारी करण्याबद्दल—"

आणि ते लगेच बाहेर पडले.

मी वरती गच्चींत जाऊन उभा राहिलों. शहर आतां बहुतेक शांत झालें होतें. मावळत्या सूर्यानें रित्या केलेल्या उजळ आकाशांत आज गिरण्यांच्या चिमण्यांऐवजीं जळत्या घरांच्या ज्वाळा धूर ओकीत होत्या. जणूं कांहीं दिवसभर दंगल करून थकलेल्या शहराचे उष्ण, श्रांत निःश्वास होते ते! ती कृत्रिम, भयानक शांतता—! पण तिचाहि भंग लांब कुठें तरी चालू असलेला कल्ला भेसूरतेनें करीत होता. मी दूरवर न्याहाळून पाहिलें. पण, तो कल्ला कुठें चालू आहे, याचा कांहींच अंदाज मला लागेना.

"भाऊराव, जेवायला येता ना तुम्ही? प्रमिलाराजे विचारीत होत्या पान वाढायचं का म्हणून—"

मागाहून हळूच आलेल्या मीनानें मला बिलगून विचारलें.

मी तिला पोटाशीं धरून म्हटलें, "नाहीं, बेटा. अजून वेळ आहे थोडा. सूर्य मावळला, म्हणजे आपण बरोबरच बसूं जेवायला—"

" मग जेवल्याबरोबर तुम्ही बाईला न् आत्याला घेऊन याल ना ?—"

" हो. जेवून उठल्यावर पहिलं काम तें—"

" खरंच ? "

" हो. अगदीं खरं—"

तो माझा उद्गार ऐकतांच ती माझ्या अंगाला अधिकच बिलगली आणि कांहीं क्षणानीं तिनें मला हळूच विचारलें, " भाऊराव, तुमचीं पुस्तकं खरंच का हो गेलीं सगळीं ?—"

मी नुसती मान हलवली. तेव्हां ती पुढें म्हणाली, " पण पुस्तकांचा नाश करून काय मिळालं हो त्यांना? आपल्या घरांतले दागिने, कपडे न् सामान लुटण्यांत फायदा होता त्यांचा. पण इतक्या पुस्तकांचं काय केलं असेल त्यांनीं ? खरंच का शुक्रवार तलावांत टाकून दिलीं असतील ? आणि आतां पुस्तकां-शिवाय कसं होईल हो तुमचं ?—"

तिच्या त्या प्रश्नांना मी कांहींच उत्तर दिलें नाहीं. मी कांहीं बोलत नाहीं असें पाहिल्यावर ती म्हणाली, " प्रमिलाराजे वाट पहात असतील. मी खालीं जाऊन सांगून येतें त्यांना जेवायला थोडा वेळ आहे म्हणून— "

आणि मीना खालीं गेली—

—पण तिच्या त्या बालिश, निर्व्याज प्रश्नांनीं माझ्या उदास, विषण्ण मनांत केवढा आगीचा डोंब उठवला !—" आणि आतां पुस्तकांशिवाय कसं होईल हो तुमचं ?"—किती साधा पण किती विदारक प्रश्न होता तो तिचा ! माझं सर्वस्व, माझं सगळं जीवनधन म्हणजे माडीवर ठेवलेला तो दोन पिढ्यांचा ग्रंथसंग्रह होता. मी एकाद्या कृपणाप्रमाणं जपत असे त्या ग्रंथसंग्रहाला. बाबूला, केशवला, भास्करला किंवा मधूला सुद्धां मी सहसा कधीं नेऊं दिलीं नाहींत त्यांतलीं पुस्तकें बाहेर. संचित धनावर बस-लेल्या एकाद्या नागासारखी माझी वृत्ति असे त्या ग्रंथसंग्रहाच्या बाबतींत. कारण, माझ्या दृष्टीनें, तीं पुस्तकें म्हणजे निव्वळ पुस्तकें नव्हतीं. माझ्या जीविताचे, बौद्धिक आणि हार्दिक जीविताचे, दोन पिढ्यांचे आणि दोन तपांचे सारे ऋणानुबंध त्या ग्रंथसंग्रहाशी निगडित झालेले होते. तीं पुस्तकें म्हणजे

जणुं त्या त्या काळांतले माझे गुरु, मित्र, अंतेवासी किंवा सहप्रवासी होते. नंदर्गीकरांचा रघुवंश, पंडितांचें विक्रमोर्वशीय किंवा दादोबांची यशोदा-पांडुरंगी उघडली, म्हणजे माझ्या डोळ्यापुढें माझे आईवडील उभे रहात असत; आयर्लंडच्या इतिहासाचे ते हिरवे जाड व्हॉल्यूम्स हातांत घेतले, म्हणजे डांगे, पर्वते आणि जोगळेकर यांच्याशीं झालेले वाद-संवाद माझ्या हृदयांत निनादत असत; व अर्नोल्ड, टेन, सेंट्‌ब्यू, लेसिंग, ब्रँडिस, रॅले प्रभृतींचे टीकाग्रंथ पाहिले म्हणजे पराडकर, नवरे, कुलकर्णी, मराठे आणि कर्णिक यांच्याशीं महालक्ष्मीवर, डेक्कन कॉलेजच्या वसतिगृहांत किंवा गोरेगांवच्या तालवनांत झालेल्या आल्हाद-दायक संभाषणांच्या आठवणी माझ्या मनांत उचंबळून येत असत. उमर-खय्यामचें रुबायत, शेक्सपियरचीं नाटकें आणि सुनीतें, मिल्टन, वर्डस्वर्थ, बायरन, शेले, कीट्‌स्, टेनिसन, स्विनबर्न, बोदलेअर प्रभृतींचीं काव्यें आणि 'सॉनेट' 'लिरिक,' 'एलेजी' इत्यादि काव्यप्रकारांवरील चर्चात्मक प्रबंध वगैरे पुस्तकांच्या आल्मारींतील सुबक रांगा म्हणजे रविकिरणमंडळाच्या प्रभावी कालखंडाचें निरनिराळया प्रकारचें वैशिष्ट्य सूचित करणाऱ्या स्मृति-शलाकाच होत्या जणुं! माझ्या वडलांचा सगळा संस्कृत ग्रंथसंग्रह, विविध-ज्ञानविस्तार, काव्येतिहाससंग्रह, सरस्वतीमंदिर, इतिहाससंग्रह, भारतवर्ष, इतिहास आणि ऐतिहासिक, रामदास आणि रामदासी वगैरे नियतकालिकांची बांधलेलीं वर्षे, राजवाडे, खरे आणि सरदेसाई यांचे सर्व खंड, प्रो. वि ह. कुलकर्णी यांनीं दिलेले वेगवेगळे कोश आणि संदर्भग्रंथ!— मला या सर्व पुस्तकांचीं गेलीं चोवीस वर्षे इतकी संवय झालेली होती कीं, मध्यरात्रीं अंधारांत सुद्धां माझे हात वाटेल तो ग्रंथ अचूक ओळखून काढीत असत. ऑस्कर वाइल्ड, बर्नार्ड शॉ किंवा हार्डी यांचें ललित वाङ्मय, मार्क्स, बर्ट्रंड रसेल किंवा इवॉन ब्लॉश यांचें शास्त्रीय वाङ्मय, दादाभाई नौरोजी, रानडे किंवा गोखले यांचीं भाषणें आणि 'एव्हरी मॅन्स,' 'होम युनिव्हर्सिटी' किंवा 'पेंग्विन' या मालांचीं पुस्तकें मला पुन्हा विकत घेणें शक्य आहे पण, नंदर्गीकरांचा रघुवंश, राजवाड्यांचे खंड, आपट्यांचे कोश किंवा विविधज्ञानविस्तारादि नियतकालिकांचीं वर्षें आतां मला कुठें मिळतील! १९२२ सालीं मुंबईहून पुण्याला येतांना किंवा १९२४ सालीं पुण्याहून नागपूरला येतांना मी आमचा इतर सारा संसार

त्या त्या ठिकाणीं टाकून आलों. पण पुस्तकें मात्र सगळीं अत्यंत काळजीपूर्वक मी जिथें गेलों तिथें माझ्याबरोबर नेलीं. ते हे माझे वाङ्मयीन जीवनांतले सहप्रवासी आज मला कायमचे सोडून गेले. मीनानें अगदीं अजाणतेपणानें विचारलें, "आतां पुस्तकांशिवाय कसं होईल हो तुमचं ?—" तो प्रश्न विचारून तिनें जणुं माझ्या हृदयाला झालेल्या जखमेवर हात ठेवला. तें उध्वस्त करण्यांत आलेलें घर, मधांशीं तिला सांगितल्याप्रमाणें, मी पुन्हा पूर्वीसारखें सजवूं शकेन. पण, आतां मी जेव्हां जेव्हां माडीवर जाईन, तेव्हां तेव्हां त्या भकास खोल्या आणि तीं रिकामीं कपाटें स्वतःच्या निःशब्द शून्यतेनें मला सांगतील कीं, आपलें जीवनधन कायमचें गेलें, आपल्या वाङ्मयीन आयुष्यक्रमांतील सहप्रवासी आपल्याला कायमचे अंतरले —

आणि केवळ माझेंच जीवनधन नव्हे, तर माझ्यावर निरतिशय प्रेम करणाऱ्या साहित्यसुहृदांचेंहि ! माझे गुरु तात्यासाहेब कोल्हटकर यांचें आत्मचरित्र १९२१ सालापासून त्यांच्या मृत्युपर्यंत माझ्यापाशीं होतें. आणि, तें या अटीवर त्यांनीं माझ्या स्वाधीन केलें होतें कीं, त्यांच्या निधनानंतर निदान पंधरा वर्षें तरी तें प्रसिद्ध करण्यांत येऊं नये. कोल्हटकर लेखसंग्रहाच्या प्रकाशनाच्या वेळीं त्यांचें चरित्र श्री. खांडेकर आणि मी अशा दोघांनीं मिळून लिहावें असें ठरलें; व म्हणून खांडेकरांना देण्यासाठीं त्या चरित्राच्या तीन टंकलिखित प्रती मी त्यांच्या संमतीनें मुद्दाम तयार करवून घेतल्या. तात्यासाहेबांनीं त्यापैकीं एक प्रत स्वतः काळजीपूर्वक मूळावरून तपासून घेऊन त्यांतील विधानांना कांहीं ठिकाणीं खुलासेवार टीपा जोडल्या होत्या; व कांहीं ठिकाणीं थोडी भरहि घातली होती. त्यांच्या मरणानंतर श्री. प्र. श्री. कोल्हटकर यांनीं त्यांचें आत्मचरित्र तारेनें परत मागितलें; व मीहि तें ताबडतोब परत केलें. पण त्याची ही तात्यासाहेबांनीं स्वहस्तानें सुधारलेली अधिकृत, टंकलिखित प्रत मजजवळच राहिली होती. ती बहुमोल प्रत या सर्वनाशांत कायमची नष्ट होऊन गेली.

पण तेवढयानेंच भागलें नाहीं. आम्ही दोघांनीं तात्यासाहेबांचें चरित्र लिहावें असें ठरल्यानंतर त्यांच्या जीवनांतील ज्या नाजूक, हृदयंगम घटनांचें प्रतिबिंब त्यांच्या नाटक-कादंबऱ्यांत पडलेले होतें व त्यांच्या प्रतिभाविकासाला ज्या विशेष व्यक्तींचें मधुर साहचर्य प्रेरक झालेलें होतें, त्या घटना आणि त्या व्यक्ति

यांच्याविषयींचीं संस्मरणें, वाङ्मयविवेचनाला उपयुक्त होतील अश दृष्टीनें, त्यांनीं लिहावीत, असा आग्रह मी त्यांना केला; व मजविषयींच्या प्रेमातिशया-मुळें-त्यांनीं त्या आग्रहाला मान देऊन श्री. वि. अं. गिजरे यांना दर बुधवार–रविवारीं तोंडी मजकुर सांगितला. हीं टिपणेंहि त्यांनीं स्वतः तपासून माझ्या स्वाधीन केलीं होतीं. इतकेंच नव्हे, तर पुढें पुण्यास गेल्यावर त्याच्या नाटक–कादंबऱ्यांतील निरनिराळ्या पात्र–प्रसंगांसबंधीं मी विचारलेल्या प्रश्नांना सविस्तर उत्तरें पाठवून त्यांनीं अनेक महत्वाच्या मुद्यांचा उलगडा केलेला होता. त्यांच्या सहीचीं तीं सगळीं टिपणें आणि पत्रेंहि कायमचीं नष्ट होऊन गेलीं.

तीच दशा कवि माधव आणि श्री. के. नी. जोगळेकर याच्या आठवणींची. ' दोन तपें ' हें पुस्तक ज्या वेळीं मी लिहावयाचें ठरविलें, त्या वेळीं या माझ्या दोघां जुन्या मित्रांना त्या काळांतील आठवणी पाठविण्याविषयीं विनंति केली. तदनुसार श्री. माधवराव काटदरे यांनीं १९२० च्या मेपासून १९४५ अखेर पर्यंतच्या कालखंडांतील आपल्या वाङ्मयविषयक आठवणी अत्यंत तपशीलवार लिहून मजकडे पाठविल्या. या आठवणींची प्रत्येकीं बत्तीस पानांचीं अठ्ठेचाळिस एक्झरसाइज बुकें झालीं होतीं! मुंबईच्या ' साहित्या ' चे संपादक श्री. वामनराव ढवळे यांना त्यांतील निवडक भाग त्या नियतकालिकांतून प्रसिद्ध करण्याची उत्कट इच्छा होती. पण, या आठवणींत अनेक व्यक्तींसंबंधींचे विवाद्य निर्देश आलेले असल्यामुळें, मी ही त्यांची इच्छा पूर्ण करूं शकलों नाहीं. पुण्या–मुंबईतलि वाङ्मयविषयक चळवळींचा आणि वाद–प्रवादांचा गेल्या पंचवीस वर्षांचा विशिष्ट दृष्टीनें लिहिलेला अत्यंत मनोरंजक वृत्तांत या आठवणींत आलेला असून, भारतीय इतिहासाविषयींच्या माधवरावांच्या अनेक नावीन्यपूर्ण कल्पना आणि संशोधन यांचेहि निष्कर्ष, त्यांत ओघाओघानें, अनुस्यूत होऊन गेलेले होते; व म्हणून या आठवणींतील वादग्रस्त वैयक्तिक भाग गाळून त्या क्रमशः 'साहित्यां'तून प्रकाशित करण्याचा आमचा विचार चालला होता. किंबहुना, गेल्या डिसेंबरमध्यें मी मुंबईला गेलों असतांना श्री. ढवळे यांनीं तशा प्रकारची कबुली माझ्याकडून घेऊन हें काम जर माझ्या हातून वेळेवर झालें नाहीं, तर त्या सर्व वह्या मी त्यांच्या स्वाधीन कराव्यात, असेंहि वचन मजकडून घेतलें

होतें. श्री. काटदरे यांनींहि या योजनेला संमति दिली होती. पण, या अठ्ठेचाळिस वह्यांपैकीं फक्त दोन वह्या विध्वंसानंतर दहा दिवसांनीं घर ज्या वेळीं दुरुस्तीसाठीं ताब्यांत घेऊन त्याची साफसफाई करण्यांत आली, त्या वेळीं उपसलेल्या फाटक्या कागदांच्या राशींत आमच्या हातीं लागल्या ! श्री. जोगळेकर यांच्या आठवणींच्या सहा वह्यांपैकीं एकहि वही सांपडली नाहीं. पण मला अतिशय दुःख झालें, तें माधवरावांच्या आठवणी नष्ट झाल्याबद्दल. रक्तदाबाच्या विकारानें त्यांची प्रकृति खालावलेली असतांनाहि केवळ मजविषयींच्या असीम आत्मीयतेमुळें त्यांनीं त्या आठवणी अत्यंत परिश्रमपूर्वक लिहून काढल्या होत्या. पण, महाराष्ट्रांतील एका श्रेष्ठ, अभिजात प्रतिभेच्या कवीनें केलेलें तें गतकालाच्या सिंहावलोकनाचें स्मृतिधन आज आततायी जमावाच्या क्रोधानलांत भस्म होऊन गेलें.

कै. तात्यासाहेब कोल्हटकर यांचें आत्मचरित्र आणि श्री माधवराव काटदरे यांच्या आठवणी या अमोल साहित्यसंपदेप्रमाणेंच गेल्या अठ्ठावीस वर्षांतला माझा सारा पत्रव्यवहारहि आज नष्ट होऊन गेला कै. तात्यासाहेब कोल्हटकर, कै. तात्यासाहेब केळकर, कै. प्रो. वा. म. जोशी, कै. डॉ. राघवेंद्र राव, कै. डॉ. बा. शि. मुंजे, ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर, श्री. शंकरराव देव, बॅ. रामराव देशमुख, पं. द्वारकाप्रसाद मिश्र, म. म. प्रो. द. वा. पोतदार, श्री. श्री. अ. डांगे, श्री दे. ना. टिळक प्रभृति व्यक्तींची निरनिराळ्या सार्वजनिक प्रश्नासंबंधांची हजारों पत्रें जाळलीं किंवा फाडलीं गेलीं असतील. सौ. शांताबाई ही अ. भा. महिला परिषदेच्या प्रांतिक शाखेची चिटणीस असल्यामुळें, तिचे वडील श्री. विश्वनाथराव नवाथे हे प्रांतिक वर्णाश्रम स्वराज्यसंघ आणि प्रॉव्हिन्शियल रायफल असोसिएशन यांचे चिटणीस असल्यामुळें आणि मी संयुक्त महाराष्ट्र परिषदेचा सरचिटणीस असल्यामुळें या सर्व संस्थांचे अनेक महत्त्वाचे कागदपत्र आमच्या घरीं होते. ते सर्व आज नाहींसे होऊन गेले.

"— पण पुस्तकांचा नाश करून काय मिळालें त्यांना ?"-हा चंद्रशेखरनें मयांशीं विचारलेला प्रश्न जितका भेदक होता, तितकेंच "—काय मिळालं ? अरे, नाश केल्याचा आनंद ! —" हें भास्करनें त्याला दिलेलें उत्तरहि विदारक होतें.

नाश केल्याचा आनंद ? होय, खरोखरीच नाश केल्याचा आनंद ! अगदीं नाशासाठीं नाश केल्याचा आनंद ! ! ज्यांच्या ठिकाणीं कोणत्याहि प्रकारची सुसंस्कृति नाहीं, भावनांची उच्चता किंवा विचारांचा विवेक नाहीं, त्यांचा आसुरी आनंद अशा प्रकारच्या निर्बुद्ध नाशांतच नसतो का ? इतिहास तरी दुसरें काय सांगतो ? अलेक्झांड्रियाचा जाळला गेलेला ग्रंथसंग्रह किंवा वेरुळचें विच्छिन्न केलेलें कैलास लेणें तरी दुसरें काय सांगतें ? १६४२ च्या नोव्हेंबरमध्यें इंग्लंडांतील राजपक्ष आणि लोकपक्ष यांच्यांत यादवी युद्ध सुरू होऊन राजपक्षाचें सैन्य लंडनवर चालून येणार अशी भुमका उठल्यामुळें ब्रिटिश जनता ज्या वेळीं भयभीत होऊन गेली, त्या वेळीं मिल्टननें राजधानीवर हल्ला करावयाला येत असलेल्या त्या राजसेनेच्या प्रमुखांना उद्देशून अशी प्रार्थना केली कीं—

Captain, or Colonel, or Knight in arms,
Whose chance on these defenceless doors may seize,
If deed of honour did thee ever please,
Guard them, and him within protect from harms.

He can requite thee; for he knows the charms
That call fame on such gentle acts as these,
And he can spread thy name o'er lands and seas,
Whatever clime the Sun's bright circle warms.

Lift not thy spear against the Muses' bower;
The great Emathian Conqueror bid spare
The houses of Pindarus, when temple and tower

Went to the ground; and the repeated air
Of sad Electra's poet had the power
To save the Athenian walls from ruin bare

मिल्टन हा लोकपक्षाचा कट्टा पुरस्कर्ता, लोकशाही आणि विचारस्वातंत्र्य यांचा कडवा अभिमानी होता; व इंग्लंडांत राजाच्या निरर्गल, अरेरावी सत्तेविरुद्ध जनतेचा झगडा सुरू होतांच तो त्या लढ्यांत भाग घेण्यासाठीं मुद्दाम परदेशांतून लंडनला परत आला. लोकसैन्याच्या समशेरी ज्या वेळीं राजसैन्याशीं रणांगणावर सामना देत होत्या, त्या वेळीं त्या तरवारींपेक्षांहि एका

अर्थानें अधिक तीक्ष्ण आणि तेजाळ असलेली त्या महाकवीची लेखणी लोकपक्षाची अत्यंत तडफेनें तरफदारी करून जनतेंत लढयाचा त्वेष उत्पन्न करीत होती. लंडनच्या अगदीं वेशीला लागून त्याचें घर होतें; व राजपक्षाच्या सैनिकांना तें लुटून बेचिराख करण्यांत विशेष आनंद वाटला असता ! ( His was one of the houses which, if the cavaliers had been let loose, it would have given them particular pleasure to sack ) या सगळ्या गोष्टी लक्षांत घेऊन मिल्टननें लंडनवर चाल करून येण्याच्या बेतांत असलेल्या त्या राजसैन्याच्या अधिकाऱ्यांना अशी विनम्र पण साभिमान प्रार्थना केली कीं,—

Captain or Colonel, or Knight in arms,
Whose chance on these defenceless doors may seize,
If deed of honour did thee ever please,
Guard them, and him within protect from harms.

" कॅप्टन, कर्नल किंवा सरदार ! आपल्या पैकीं जे कोणी कोणत्याहि प्रकारचें संरक्षण नसलेल्या या माझ्या घरावर हल्ला करावयाला यदृच्छेनें याल, त्यांना माझी एवढीच विनंति आहे कीं, जर सत्कृतींची बूज करण्याची बुद्धि आपल्या ठिकाणीं कांहीं शिल्लक असेल, तर हें घर आणि त्यांत असलेला हा कवि यांना आपण या हल्ल्यापासून वाचवा ! त्याला आणि त्याच्या घराला कोणत्याहि रीतीनें अपाय होऊं देऊं नका ! ! "

पण अशा प्रकारची प्रार्थना कोणाला करावयाची ? जो मनानें उमदा असेल, अशा सहृदय शूराला ! भाबडया, अडाणी जमावाला दुष्टाव्यानें चिथावणी देणाऱ्या जात्यंध किंवा पक्षांध नरपशूंना अशा प्रकारची प्रार्थना करण्यांत काय अर्थ ? उलट भीरुतेचा आणि शरणागतीचा आरोप येऊन विटंबनाच व्हावयाची कीं नाहीं ? ज्यांना तारतम्यबुद्धि नाहीं, सत्कृतींची बूज करावयाला अवश्य असलेला सुसंस्कृतपणा ज्यांच्यापाशीं नाहीं आणि अन्यपक्षीयांच्या गुणांची किंवा कार्याची कदर करण्याइतकी सहृदयताहि ज्यांच्या ठिकाणीं नाहीं, त्या संस्कृतिहीन, निर्बुद्ध नादानांना अशा प्रकारची विनंती आत्म

रक्षणासाठीं करणें म्हणजे स्वतःचा अपमान स्वतःच्या हातांनींच करून घेण्यासारखें नाहीं काय?

म्हणून, हा सगळा नाश, मन दगडासारखें घट्ट करून आणि बुद्धि बर्फासारखी बधिर करून, मला मुकाट्यानें सोसला पाहिजे. केवळ सामानाचा आणि संपत्तीचा नाशच नव्हे, तर जीवनधनाचाहि नाश! माझी कामधेनूसारखी चाहेल तितका पैसा मला सुखेनैव मिळवून देणारी कामरूपिणी लेखणी ती नष्ट झालेली सारी संपत्ति पुन्हा प्राप्त करून देईल. पण जीवनधन? माझा ग्रंथसंग्रह आणि माझी साहित्यसंपदा? त्यांचाहि नाश मला निमूटपणानें सहन केला पाहिजे. हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यानंतर राज्यसत्ता हस्तगत करण्यासाठीं जे अंतःकलह आतां सुरू झालेले आहेत आणि जे पूर्ण समाजक्रांति होऊन खरेंखुरें लोकराज्य स्थापन होईपर्यंत चालू रहावयाचे आहेत, त्या अंतःकलहांच्या स्फोटांत आपण तूर्त अर्धवट होरपळून निघालों, आपली पूर्ण राखरांगोळी होऊन गेली नाहीं, हें काय थोडें आहे? कदाचित् तोहि दिवस पुढें मागें उगवेल! तेव्हां, त्या जीवनधनाच्या नाशाबद्दल तरी विषाद काय मानावयाचा? तें जीवनधन नष्ट झालें असलें, तरी जनमनाला मोहित करणारी माझी प्रभावशाली लेखणी आणि सर्व प्रकारच्या आघातांना पुरून उरणारी माझी सामर्थ्यशाली बुद्धि तर अद्याप कायम आहे ना? मग मी काय म्हणून हळहळावें? काय म्हणून हताश व्हावें? अपमानित, निर्धन पण आत्मविश्वस्त चाणक्याप्रमाणें मीहि एकच प्रार्थना आणि तीहि कोणा मानवाजवळ नव्हे तर विश्वाचें नियमन करणाऱ्या अज्ञेय शिवशक्तिजवळ आर्तभावानें करीन—" बुद्धिस्तु मागान्मम! बुद्धिस्तु मागान्मम!"

× × ×

"भाऊराव, जेवायला चलता ना? प्रमिलाराजे वाट पहाताहेत खालीं. सूर्य मावळून किती तरी वेळ झाला—"

मीनानें हळूच मागून येऊन मला बिलगून विचारलें.

मी त्या विचारांच्या वादळांत इतका व्यग्र होऊन गेलों होतों कीं, तिचा तो हळुवार सुखस्पर्श मला प्रथम जाणवला नाहीं. पण क्षणार्धांत मी भानावर येऊन तिला विचारलें, " काय म्हणतेस बेटा तूं?—"

" जेवायला नाहीं का चलायचं ? समोर पहा तरी काळोख कसा पडतोय तो— "

आणि, मीना म्हणाली, तें खरेंच होतें. संधिप्रकाश जरी आतां बहुतेक लोपून गेला होता, तरी क्षितिजाच्या पश्चिम कोपऱ्यांत काळसर लाल रंगाच्या शलाका अद्यापहि लकाकत होत्या. जणुं जखमी झालेल्या आकाशाच्या अंगावरले ते रक्ताचे वाळलेले ओघळच होते ! त्या अस्तंगत सायंप्रभेंत उंच इमारतींच्या खिडकींचें एकाद दुसरें भिंग आणि मधूनच आपले मोठाले पंख संथपणानें हलवीत उडत जाणारा बगळा आपल्या लकाकीनें झपाट्यानें काळवंडत चाललेल्या क्षितिजाला उजळीत होते. उलट, झाडांचे काळे काळे उंच झुबकेदार शेंडे अजूनहि उजळ असलेल्या आकाशाला काळा रंग फाशीत असल्याचा भास होत होता. राजवाड्याच्या मागल्या बाजूला जो ओसाड बगीचा होता, त्यांतील झाडांतून वर डोकावणारें मंदिराचें एखाद दुसरें शिखर त्या अंधुक, भीषण वातावरणांत एक प्रकारची रम्यता उत्पन्न करीत होतें; व त्यांतून होणारा गंभीर घंटानाद जीवनांतलें मांगल्य अद्याप पुरतें मरून गेलें नसल्याची आशा विषण्ण हृदयांत प्रतिध्वनित करीत होता. वाऱ्यानें फडफडणारी दिव्याची ज्योत विझून जाऊं नये म्हणून तो पदराखालीं झांकून घेऊन मंदिराकडे जाणारी भाविक स्त्री म्हणजे जीवनांतील मांगल्याची मंद होत चाललेली दीप्ति नष्ट होऊं नये म्हणून धडपडणाऱ्या मानवतेची करुण मूर्तिच होती जणुं कांहीं ! पण, दुरून कोठून तरी जो गलका अजूनहि ऐकूं येत होता, तो ती भयानक स्तब्धता कृत्रिम असल्याची भीतिप्रद जाणीव मनाला देत होता.

मी मीनाबरोबर खालीं गेलों, तेव्हां पानें मांडलेलीं होतीं; व प्रमिलाराजे आणि काकासाहेब आमची वाट पहात होते. मी डोळ्यांना पाणी लावून पानांवर बसलों. अन्नावर अगदीं वासना नव्हती. तरीसुद्धां प्रमिलाराजांच्या प्रेमळ आग्रहामुळें जेवण रोजच्यासारखें झालें.

मी शेवटला भात घेत असतांनाच फोन आल्यामुळें बाहेर गेलेले काकासाहेब आंत येऊन म्हणाले, " रेशीमबाग मैदानावरील डॉ. हेडगेवार यांच्या समाधीवर हल्ला केल्याची बातमी आतांच आली, भाऊसाहेब ! डॉक्टरसाहेबांच्या मृत्यूला

दहा वर्षे झालीं असतील नाहीं ? दहा वर्षांपूर्वी वारलेल्या माणसाच्या समाधीवर हल्ला करण्याचं काय कारण आहे खरोखरी ?–"

डॉ. हेडगेवार यांच्या समाधीवर हल्ला!— काकासाहेबांनीं सांगितलेली ती बातमी ऐकतांच मी तोंडापाशीं नेलेला घास तसाच टाकला आणि पानावरून उठलों. माझें मन विलक्षण क्षुब्ध होऊन गेलें होतें. हात धुतल्याबरोबर हुजऱ्यानें पुढें केलेल्या पानदानांतला विडा न घेतांच मी काकासाहेबांना म्हटलें, "मी वर जाऊन जरा पडतों थोडा वेळ. उपासामुळें जेवण अंगांत आलं लगेच आज—"

मी तडक वर जाऊन कोचावर लेटलों. आतां अंधार चांगलाच पडला होता. पण दिवाणखान्यांतील दिवा लावण्याचें कांहीं मला सुचलें नाहीं. माझ्या मागोमाग हुजऱ्या वर आला आणि त्यानें दिवा लावला. त्याबरोबर मी त्याला म्हटलें, "मालवून टाक दिवा! मला गरज नाहीं दिव्याची. मी थोडा वेळ निवांत पडणार आहे. महाराज आले म्हणजे वर्दी दे मला लगेच—"

त्या निःशब्द अंधारांत मी कोचावर तळमळत पडलों होतों.

आणि माझ्या मिटलेल्या डोळ्यांपुढून चोवीस वर्षांपूर्वीचीं अनेक दृश्यें झरझरा जात होतीं.

१९२४ च्या सप्टेंबरमधला प्रसंग. मी तेव्हां नागपुरास नुकताच आलेलों होतो. बॅ. सावरकर यांना अर्पण करावयाच्या थैलीसाठीं त्या वेळीं निधि जमा केला जात होता. डॉ. हेडगेवार हे अर्थातच त्या कार्यांत प्रमुख होते. त्या निधिसंबंधीं ते दादांना (ओगले) भेटावयाला आले असतां मी त्यांना त्या दिवशीं प्रथम पाहिलें. दादांनीं माझी ओळख करून दिल्यावर ते हंसून उद्गारले, "दादा, तुम्ही मुंबईहून आणलेलं हें कोकणचं नवं पार्सल आपल्या नागपूरच्या हवेंत टिकलं पाहिजे!—"

"पाहूं या काय होईल तें! मी नाहीं का टिकलों? मी तरी कोकणांतूनच आलेला आहे—"

"पण तुम्हांला आतां कोकणस्थ म्हणणार नाहीं कोणी, दादा! इतके बदलून गेलां आहांत तुम्ही गेल्या वीस वर्षांत—"

"हेहि बदलतील—"

पण त्यांच्याशीं अधिक न बोलतां डॉक्टरसाहेब मला म्हणाले, " चलता का माडखोलकर, आमच्या घरीं ? बाळ, तूंहि चल रे—"

श्री. बाळासाहेब ढबळे यांना ते म्हणाले. आम्ही दोघे त्यांच्याबरोबर त्यांच्या त्या नव्या शुक्रवारींतल्या घरीं गेलों.

माडीवर गेल्यावर डॉक्टरसाहेब म्हणाले, " तुम्ही मुंबईचे आहांत, माडखोलकर! चहा हवाच असेल तुम्हाला. चहा मांडा रे दोन कप—"

मोठाल्या झुपकेदार मिशा, गरगरीत टपोरे डोळे, माताचे वण असलेला काळा चेहरा आणि दुसऱ्याच्या मनांत धाक उत्पन्न करणारा करडा आवाज !— त्यामुळें डॉक्टरसाहेब प्रथम मला उग्र, रागीट वाटले होते. पण, ज्या प्रेमानें त्यांनीं मला चहाबद्दल विचारलें आणि 'चहा मांडण्या'चा हुकूम सोडला, त्यामुळें माझ्या किंचित् बुजलेल्या मनाला धीर आला.

चहा यावयाला वेळ होता. तेवढ्या वेळांत त्यांनीं माझी चौकशी केली आणि ते बाळासाहेबांना म्हणाले, " यांची परीक्षा पाहूं या थोडी बाळ !— "

मला त्यांच्या त्या उद्गाराचा अर्थ कळेना.

तोंच त्यांनीं चटकन एक लोखंडी कांब आम्हां दोघांच्यामध्यें ठेवली आणि ते बाळासाहेबांना म्हणाले, " उचल पाहूं, बाळ— "

बाळासाहेबांनीं मोठ्या परिश्रमानें ती कांब हातभर उचलून खालीं ठेवली. नंतर डॉक्टर मला म्हणाले, " हं माडखोलकर, उचला पाहूं— "

मला वाटलें होतें, आपल्यालाहि सहज उचलतां येईल ती कांब. म्हणून मी उत्साहानें पुढें सरसावून ती हातीं घेण्याचा प्रयत्न केला. पण सगळी शक्ति एकवटूनहि मला ती पुरती अंगुळभरहि वर उचलतां आली नाहीं.

" राहूं दे ! चहा आणा पाहूं ! " डॉक्टरसाहेब हंसून उद्गारले.

मी अगदीं ओशाळून गेलों होतों. आम्हां दोघापुढें चहाचे कप ठेवून ते म्हणाले, " माडखोलकर, वाईट वाटून घ्यायचं कारणं नाहीं. अजून नागपूरचं पाणी लागलेलं नाहीं तुम्हांला. तें लागलं, म्हणजे उचलूं शकाल तुम्ही ही कांब ! ही कांब जो उचलील, तोच टिकेल या नागपूरच्या लढाऊ वातावरणांत—"

आणि, त्यानंतर पांच महिन्यांनीं संक्रांतीच्या दिवशीं मी त्यांना भेटावयाला गेलों असतां जेव्हां ती कांब उचलून दाखवली, तेव्हां माझ्या पाठीवर दणकन

थाप मारून ते उद्गारले, "आतां नागपुरांत राह्यला लायक झालांत तुम्ही, भाऊराव !—"

त्यानंतर चार महिन्यांनीं अक्षयतृतीयेच्या दिवशीं शांताबाईला पाहाण्यासाठीं मी त्यांच्याबरोबर श्री. नवाथे यांच्या घरीं गेलों. माझें लग्न जमविण्याची सगळी खटपट त्यांनीं केली; व ते आणि कै. अण्णासाहेब मेहेंदळे यांच्या प्रयत्नांमुळेंच माझें लग्न होऊं शकलें. कारण मी त्या वेळीं फक्त एक ट्रंकभर पुस्तकें बरोबर घेऊन आलेला एकाकी, अनोळखी तरुण मुलगा होतों. मला नागपुरांत ना आप्त ना इष्ट. मी ब्राम्हण आहे कीं नाहीं, याबद्दल सुद्धां सर्वांना शंका. 'महाराष्ट्र' कचेरींतून मिळणाऱ्या पगाराव्यतिरिक्त एक कपर्दिकहि मजजवळ नव्हती. त्यामुळें श्री. नवाथे हे साहजिकच आपली एकुलती एक मुलगी मला द्यावयाला थोडे कांकू करीत होते. पण डॉक्टरसाहेबांनीं त्यांना भीड घातली आणि त्यांच्या घरीं मला ते घेऊन गेले.

मुलगी पाहून आम्ही परत फिरल्यावर वाटेंत आण्णासाहेब म्हणाले, "काय डॉक्टरसाहेब, भाऊरावांच्या मानानं मुलगी जरा उणीच आहे नाहीं ?—"

तेव्हां डॉक्टरसाहेब एकदम त्यांच्याकडे रोखून पाहून उद्गारले, "गोरं कातडं नाहीं म्हणून म्हणतां होय तुम्ही अण्णा, हें ! अहो, भाऊरावांच्या अंगांत भरपूर रक्त नाहीं, म्हणून गोरे वाटतात ते आपल्याला ! मुलगी काळीसावळी असली, तरी तरतरीत न् हुषार आहे. यांना चांगली जोड होईल संसारांत—"

आणि त्यांचा तो आशीर्वाद पुढें अनेक अर्थांनीं खरा झाला.

पण, त्यानंतर दीड वर्षानें खान–मालिनी विवाहाचें जें समर्थन मी 'स्वतंत्र भारतां'त लेख लिहून केलें, त्यामुळें त्यांची माझ्यावरील माया अगदीं उडून गेली. त्यांनीं कांहीं दिवस माझ्यांशीं बोलणेंहि सोडून दिलें होतें. पण, गणेशोत्सवामध्यें महालक्ष्म्यांच्या जेवणाच्या दिवशीं झालेल्या हिंदु–मुसलमानांच्या दंग्यांत मला मार बसल्याचें कळतांच आपला सगळा राग गिळून ते माझ्या समाचाराला आले.

माझ्या डोक्यावर लाठीचे तडाखे बसल्यामुळें डोकें बांधलेलें होतें. म्हणून

ते हंसत हंसत म्हणाले, " मुसलमानांच्या लाठीचे तडाखे बसल्यामुळें तरी डोकं ताळ्यावर आलं असेल आतां तुमचं असं समजतों मी !—"

" डॉक्टरसाहेब, डोक्याला बाहेरून तडाखे बसल्यामुळें आंतलीं मतं बदलायचं कांहीं कारण नाहीं—"

" मग हिंदु मुलींनीं मुसलमानाशीं लग्नं करावींत असं म्हणणं आहे का अजूनहि तुमचं ?—"

" असं माझं म्हणणं कधींच नव्हतं. डॉक्टरसाहेब ! तुम्ही विनाकारण गैरसमज करून घेऊन बोलतां आहांत. माझं म्हणणं फक्त एवढंच आहे कीं, हिंदु आणि मुसलमान यांच्यांत, धर्मांतर करावें न लागतां, विवाह झाले पाहिजेत. गेलीं आठशें वर्षे हे दोन समाज आपल्या देशांत एकत्र रहात आलेले आहेत. पण त्यांच्यांत कोणत्याहि प्रकारचें सौहार्द, कोणत्याहि प्रकारची जवळीक नाहीं. शरीरांत जसा एकादा बाहेरचा घुसलेला पदार्थ सतत खुपत, टोंचत, सलत राहतो, तसे मुसलमान भारतीय राष्ट्रशरीरांत गेलीं आठ शतकें सदैव सलत राहिलेले आहेत. त्यांचा आतां निःपात करणें किंवा त्यांना घालवून देणेंहि शक्य नाहीं. अशा स्थितींत त्यांना आत्मसात् करणें, हिंदु समाजाशीं एकजीव करून घेणें एवढा एकच उपाय उरतो—"

" आणि तें एकमेकांना मुली दिल्यानं साध्य होईल म्हणतां ?—"

" डॉक्टरसाहेब, रागाऊं नका. थोडं आणखी ऐकून घ्या माझं. कोणालाहि आपला धर्म सोडावा न लागतां अन्यधर्मीयाशीं विवाह करतां आला, तर वैमनस्य किंवा कटुता उत्पन्न न होतां दोन्ही समाज एकमेकांच्या जवळ येणार नाहींत का ? माझी कल्पना अशी आहे कीं, या भरतखंडांत एकात्म हिंदु राष्ट्र जर आपल्याला स्थापन करावयाचें असेल, तर येथें येऊन स्थायिक झालेल्या सार्‍या भिन्न धर्मांच्या, वंशांच्या आणि वर्णांच्या लोकांना आपण हिंदु संस्कृतीच्या कक्षेंत आणले पाहिजेत, धर्मानें जरी नव्हे तरी संस्कृतीनें हिंदु करून घेतले पाहिजेत. यालाच मी व्यापक, विशाल हिंदुत्व म्हणतो; व त्या हिंदुत्वाचा विकास होण्यासाठीं, त्याचा प्रसार होण्यासाठीं मला आंतरधर्मीय आणि आंतरराष्ट्रीय विवाह अपरिहार्य आणि आवश्यक वाटतात. त्याशिवाय आपण एकात्म हिंदु राष्ट्र निर्माण करूं शकणार नाहीं; व आपल्या देशांत राहणारा प्रत्येक विधर्मीय हा आपला शत्रु

होऊन बसेल. चीन आणि जपान या देशांत जर अशा प्रकारचे आंतरधर्मीय विवाह होतात, त्या देशांतील एकाच कुटुंबांत जर बौद्ध, ख्रिस्ती किंवा मुसलमान व्यक्ति सुखानें नांदूं शकतात तर हिंदुस्थानांत तें का घडूं नये? फक्त हिंदूंनीं आपली पराभूत घाबरट वृत्ति सोडून दिली पाहिजे. त्यांना असा विश्वास वाटला पाहिजे कीं, आपण ज्याला जवळ करूं तो आपला होईल! माझी विशाल हिंदुत्वाची कल्पना आपण समजावून घ्या, डॉक्टरसाहेब. उगाच रागावूं नका—"

डॉक्टरसाहेब कांहीं वेळ स्तब्ध होते. नंतर ते मला म्हणाले, "तुम्ही उचक्री आहांत, भाऊराव! कांहीं तरी जगावेगळी विक्षिप्त कल्पना काढायची न् आपण इतरांपेक्षां शहाणे आहोंत असं दाखवायचं अशी वृत्ति आहे तुमची-"

मी त्यांना कांहीं उत्तर दिलें नाहीं. पण, तेव्हांपासून त्यांच्या मनांत माझ्याविषयीं जो विकल्प उत्पन्न झाला, तो कायमचाच.

तथापि, संघाच्या नाताळांतलि छावणीला ते नियमानें मला बोलावीत; व मधून मधून मी जातहि असे. एकदां सहा वर्षांच्या चंद्रशेखरला घेऊन मी अंबाझरी रस्त्यावरील छावणीला गेलों असतां ते त्याला जवळ घेऊन मला म्हणाले, 'भाऊराव, देऊन टाका हा मुलगा आम्हांला. मोठा तरतरीत दिसतो—"

"डॉक्टरसाहेब, तुमचाच आहे तो! मी जितका तुमचा आहे, तितकाच चंद्रशेखरहि तुमचा आहे—"

"नाहीं, नाहीं. तुम्ही जर खरोखरी माझे असतेत, तर तुम्हांला मोटर पाठवून आणावें लागलें नसतें मला आज इथं. दहा वर्षांपूर्वी तुम्ही माझे होतात. पण त्यानंतर तुम्हांलो पंख फुटले—"

पण एकदां मात्र मी त्यांचा सपशेल पराभव केला.

संघाच्या विजयादशमीच्या कार्यक्रमाची बातमी घेऊन ते 'महाराष्ट्र' कचेरींत आले होते. संघाच्या कार्यक्रमाची बातमी अमुक जागीं अमुक एका पद्धतीनें छापली गेली पाहिजे, असा त्यांचा आग्रह असे; व तो आम्ही आपुलकीनें मानीत असूं. पण, त्या दिवशीं त्यांनीं कार्यक्रम माझ्या हातीं दिला आणि मी त्यावर नजर टाकली मात्र, माझा राग अनावर उसळून मी उद्गारलों—

"डॉक्टरसाहेब, काय आरंभलंय तुम्ही हें? —"

"काय झालं? काय चुकलं आमचं? —"

त्यांनीं आश्चर्यानें विचारलें.

" सगळंच चुकलंय ! तुम्ही ज्या या गृहस्थांना आपल्या विजयादशमीच्या कार्यक्रमाचे अध्यक्ष केले आहेत, ते तुरुंगाचे सुपरिंटेंडेंट होते एका काळीं; व ठाण्याच्या तुरुंगावर ते मुख्य अधिकारी असतांना 'काळ'कर्त्या परांजप्यांना त्यांनीं मीठ द्यायचं नाकारलं होतं ! अशा इसमाला का तुम्ही आपल्या स्वयंसेवकांपुढें आदर्श म्हणून उपदेश करावयाला उभा करणार आहांत ?—"

दादा हें संभाषण ऐकत जवळच उभे होते. ते म्हणाले, "अहो, डॉक्टर, ही यांची टीका अगदीं रास्त आहे. जेल सुपरिंटेंडेंट आणि पोलिस सुपरिंटेंडेंट यांना जर तुम्ही आपल्या दसऱ्याच्या उत्सवाचे अध्यक्ष केलेत, तर तुमचा कार्यक्रम ठळक जागीं काय म्हणून द्यावा आम्ही ? अहो, ज्या माणसानें परांजप्यांना न् सावरकरांना तुरुंगांत वाईट वागवलें, त्याला जर तुम्ही आपल्या उत्सवांचे अध्यक्ष करूं लागलांत, तर देशभक्त आणि देशद्रोही यांत फरक तो काय राहिला ? — "

मला वाटतें, तो पहिला आणि शेवटचाच दिवस कीं, ज्या दिवशीं डॉक्टरसाहेब आम्हांला कांहीं उत्तर न देता आपला सोटा उचलून मुकाट्यानें उठून गेले.

पण, असल्या कोणत्याच विकल्पामुळें किंवा विवादामुळें त्यांच्या मजविषयींच्या वात्सल्यभावांत मात्र कधीं अंतर पडलें नाहीं.

आम्ही 'शांतानिवासां'त रहावयाला आल्यावर ते एकदां ' महाराष्ट्र' कचेरींत कांहीं कामासाठीं आले असतां मला म्हणाले, " तुम्ही आमचा वेटाळ सोडून आतां दुसऱ्या वेटाळांत रहायला गेलांत, भाऊराव— "

" हो. पण त्यामुळें कांहीं फरक पडायचं कारण नाहीं, डॉक्टरसाहेब. मी कुठंहि राहिलों, तरी तुमचाच आहे— "

आणि मी त्यांना 'शांतानिवासा'ला भेट देण्याची आग्रहपूर्वक विनंती केली.

त्याप्रमाणें दुसऱ्याच दिवशीं सकाळीं कै. अण्णासाहेब मेहेंदळे यांच्यासह ते आमच्या घरीं आले. ' जलपान ' झाल्यावर ते अण्णासाहेबांना म्हणाले, " तुम्हांला आठवतं अण्णा, आपण जेव्हां चिटणीसपुऱ्यांत मिराबाईला पहायला गेलों होतों, तेव्हां विश्वनाथराव आपली एकुलती एक लाडकी मुलगी यांना

यायला राजी नव्हते. घर ना दार अशी त्या वेळीं यांची अवस्था होती. पण, मी विश्वनाथरावांची समजूत घातली हे नांव काढतील म्हणून न् तें खरं ठरलं अखेर सगळ्या दृष्टीनीं—"

" डॉक्टरसाहेब, तुमच्या आशीर्वादाचा प्रभाव आहे हा—"

" तितकाच तुमच्या गुणांचाहि आहे! पण, मला वाईट एवढंच वाटतं कीं, त्या गुणांचा माझ्या कार्याला मात्र कांहीं उपयोग नाहीं. तुम्ही नागपूरला आल्यावर पहिल्या वर्षी जी आपली बैठक होती, तिची मजा कांहीं पुन्हा येणार नाहीं आतां. ते दिवस गेले आणि तीं माणसेंहि गेलीं. तुम्ही न् दादा घोरपडे या दोघांविषयीं मला फार उमेद होती. तुम्ही दादाला बहकवलंत का दादानं तुम्हांला बहकवलं कांहीं कल्पना नाहीं मला! पण तुम्ही दोघेहि माझ्यापासून दूर गेलांत—"

त्यांनीं बोलतां बोलतां उसासा टाकला. मी कांहीं बोललो नाहीं. तेच नंतर थोड्या वेळानें म्हणाले, " तुम्ही माझ्यापासून कितीहि दूर गेलां असलांत भाऊराव, तरी मला नेहमी असं वाटतं कीं, तुम्ही जवळच आहांत— "

" त्याचं कारण आहे, डॉक्टरसाहेब. तुमच्या आणि माझ्या मनोवृत्तींत असं कांहीं तरी साधर्म्य आहे कीं, त्यामुळें आपण एकमेकांपासून कितीहि दूर गेलों, तरी आपली जवळीक कधीं तुटणार नाहीं—"

माझी ती उपपत्ति ऐकून ते मनापासून हंसले आणि म्हणाले, " म्हणूनच इतके मतभेद होऊनहि मला असं वाटतं कीं, या विक्षिप्त, जिद्दी माडखोलकरावर आपला हक्क आहे. आपण मध्यरात्रीं त्याचा हात धरून काम घेऊं शकतों आपलं त्याच्याकडून!—"

" कारण मी खरोखरीच तुमचा आहे. डॉक्टरसाहेब!"

—अशा अनेक आठवणींच्या ऊर्मी माझ्या मनांत उचंबळून आल्या आणि आतांपर्यंत न ओलावलेल्या जळत्या डोळ्यांत आसवें दाटलीं -

—कारण डॉ. हेडगेवार यांच्या समाधीचा विध्वंस हा नुसता विध्वंस नव्हता; तर तो मानवी जीवनांतल्या सगळ्या पावित्र्याची पायमल्ली, मानवतेच्या मांगल्याची विटंबना होती! त्या समाधीवर ज्यांनीं हात टाकला, त्यांना आपण माणुसकीला काळिमा फांसणारे कोणतें घृणास्पद कृत्य करीत आहोंत, याची

थोडी तरी कल्पना होती कां? ज्यानें आमरण ब्रम्हचर्य व्रतानें राहून आपलें सर्व आयुष्य देशसेवेंत व्यतीत केलें, १९२० पासून १९३२ पर्यंत कॉंग्रेसच्या प्रत्येक चळवळींत ईर्ष्येनें भाग घेऊन ज्यानें पुनः पुन्हा बंदिवास भोगला आणि देशाच्या उद्धाराशिवाय अन्य कोणताहि विचार ज्याच्या मनाला स्वप्नांतहि कधीं शिवला नाहीं, त्या परम त्यागी, पुण्यशील, स्वातंत्र्योपासकाच्या अस्थींचा अपमान! यापरतें निंद्य कृत्य दुसरें कोणतें असूं शकेल? मृताविषयीं अनादरानें बोलूं सुद्धां नये, असा सामान्य शिष्टाचार, अशी मानवी नीति आहे. त्यांतून हा मृत तर असा कीं, ज्याच्या मनाची निर्व्याजता, चारित्र्याची विमलता, जीवनाची तेजस्विता आणि त्यागाची निरपेक्षता पाहून त्याच्या समाधिपुढें कोणाचेंहि मस्तक निरतिशय आदरानें नम्र व्हावें! अशा वीराग्रणीच्या समाधीचा विध्वंस? हिंदुस्थान स्वतंत्र झाला, तो काय त्याच्या स्वातंत्र्यासाठीं आत्मयज्ञ केलेल्या राष्ट्रसेवकांच्या कृतींची, स्मृतींची आणि अस्थींची असा अमानुष उपमर्द करण्याची मुभा पक्षद्वेषानें आणि जातिद्वेषानें अंध झालेल्या आततायी नराधमांना मिळावी म्हणून? दहा वर्षांपूर्वी दिवंगत झालेल्या त्या देशभक्ताचा गांधीवधाशीं काय संबंध होता? राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचें आजचें धोरण कोणाला मान्य होईल वा न होईल. पण, १९२६ सालच्या गणेशोत्सवांत नागपुरांत झालेल्या हिंदु-मुस्लिम दंग्यापासून योग्य बोध घेऊन हिंदु जनतेंत भारतीय संस्कृतिविषयींची निष्ठा आणि तिच्या रक्षणासाठीं झगडण्याचें सामर्थ्य निर्माण करण्याच्या ज्या एकमेव उद्देशानें डॉक्टरसाहेबानीं संघ स्थापन केला, त्या उद्देशांत खरोखरी अनुचित किंवा आक्षेपार्ह काय होतें? संघाचें आवाहन आणि आकर्षण जर एका जातीपुरतें किंवा एका प्रांतापुरतें मर्यादित असतें, तर अवघ्या वीस वर्षांत लाहोरपासून म्हैसूरपर्यंत त्याचा व्याप कसा विस्तारला असता? किंबहुना, जात आणि प्रांत यांच्यापलिकडे पहाण्याची जी दृष्टि डॉक्टरसाहेबांनीं संघाच्या ठिकाणीं उत्पन्न केली, ती इतकी कडवी आहे कीं, १९४७ च्या मेमध्यें संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीविषयीं बोलणें करण्यासाठीं जेव्हां मी गुरुजींकडे गेलों होतों, तेव्हां संघाच्या त्या व्रतस्थ, मितभाषी नेत्यानें मला उत्तर दिलें, " भाऊसाहेब, संघ प्रांत मानीत नाहीं, जात मानीत नाहीं, भाषा मानीत नाहीं; संघ फक्त भारत आणि भारतीय संस्कृति यांना मानतो!"

आणि, संघाच्या या विशिष्ट भारतीय धोरणासंबंधींची घोषणा त्यांनीं नंतर वसंतसंमेलनांत जाहीर रीतीनें केली. डॉ. हेडगेवार यांचें सारें जीवन या विराट् भारतीयत्वाच्या साक्षात्कारानें परिपूत आणि प्रभावित झालेलें होतें.

आणि, जाति, प्रांत किंवा भाषा यांच्या पलिकडे असलेलें, त्यांच्या अतीत आणि त्यांच्याहून उच्चतम असलेलें हें विशुद्ध, विराट् भारतीयत्व पहाण्याची आणि त्या भारतीत्वाच्या रक्षणार्थ झगडण्याची विशाल, तेजस्वी वृत्ति हिंदु समाजांत उत्पन्न करण्याचा प्रयत्न ज्या प्रतिभाशाली वीरात्म्यानें आमरण अज्ञात राहून केला, त्याच्या अस्थींचा अपमान ? त्याच्या समाधीचा विध्वंस ! आपण हें काय करीत आहोंत, कोणतें नीच आणि नृशंस कृत्य आपल्या हातून घडत आहे, याची कल्पना तरी आहे का या विध्वंसकांना ?—

—जिव्हारीं जखम झालेल्या पक्ष्याप्रमाणें माझें मन सारखें तडफडत होतें; त्या पक्ष्याचे पंख फडफडत रहावेत, पण त्याला जागचें हलतां, उडतां येऊं नये, तशी अवस्था झाली होती, माझ्या संतप्त, प्रक्षुब्ध, प्रमाथी पण अगतिक मनाची !—

× × ×

--त्या अंतर्बाह्य काळोखांत माझें मन तडफडत, धडपडत, चांचपडत असतांनाच माझ्या कानांवर हाक आली--

" भाऊसाहेब, महाराज बोलवताहेत आपल्याला ? -- "

श्री. शिर्के दिवा लावून आंत आले. मी लगेच कोचावरून उठलों आणि त्यांना विचारलें, " बालिंगेसाहेब आले आहेत का ? — "

" नाहीं. महाराज एकटेच आहेत खालीं-- "

मी त्यांच्या पाठोपाठ खालीं आलों. महाराज दाराशीं उभे राहून श्रोते टेलरिंग कंपनीचे श्री. श्रोते यांच्याशीं बोलत होते. मला पहाताच ते उद्गारले,–

" भाऊसाहेब, आपल्या गोपाळरावांचं घर अगदीं साफ केलं गुंडांनीं; न् ते घरांतल्या सगळ्या मंडळीसह रस्त्यावर येऊन बसले आहेत असं सांगताहेत हे. मला वाटतं, आपण जाऊन आणलं पाहिजे त्यांना इथं-- "

" हो, मलाहि असंच वाटतं, महाराज. कर्फ्यू लागल्यावर ज्या अर्थी त्यांचं घर लुटलं गेलं, त्या अर्थी ते जर रात्रभर तिथंच राह्यले तशा स्थितींत, तर कदाचित् अपाय होईल त्यांच्या जिवाला. म्हणून आपण त्यांना इथं घेऊन यावं हें उत्तम— "

" मी कोतवालींत फोन करून पोलीस लॉरी बोलावतों; न् मग जातों आणायला त्यांना. आपलें उपास सुटला ना ? इंतजाम बरोबर होता ना जेवणाचा ?-- "

" स्वतः प्रमिलाराजे जातीनं हजर होत्या; न् काकासाहेबहि होते. आपल्या घरीं काय कमी आहे, महाराज ? -- "

" भाऊसाहेब, माझ्या मनांत सारखं येतंय कीं, आज ज्यांचीं घरं लुटलीं न् जाळलीं गेलीं, त्यांना इथं आणावं न् त्यांची सगळी सोय आपण करावी. पण आईसाहेब इथं नाहींत. राजारामसिंगहि नाहींत. त्यामुळें मोठी पंचाईत झाली आहे बघा ! आमच्याकडे जागेला काळ नाहीं. पण, इतक्या कुटुंबांची व्यवस्था करायची, म्हणजे कुणीतरी सारखं उभं राह्यलं पाहिजे खडा पहारा देत. अशा कामाला आईसाहेबच पुऱ्या पडतात आमच्या. त्या नाहींत, त्यामुळें निरुपाय झाला आहे माझा. पण, आतां आधीं आपण गोपाळरावांना आणूं या-- "

आणि त्यांनीं आंत जाऊन कोतवालींत फोन केला.

दहा मिनिटांच्या आंतच दोन लॉऱ्या आल्या. प्रत्येक लॉरींत बंदुक घेतलेले तीन पोलिस आणि एक सब इन्स्पेक्टर होता. लॉऱ्या दाराशीं येऊन उभ्या रहातांच महाराज म्हणाले,—

" मी घेऊन येतो गोपाळरावांना -- "

" मी येतों आपल्याबरोबर— "

" कांहीं गरज नाहीं आपण येण्याची. आम्ही दहा मिनिटांत येतो त्यांना घेऊन. आपण माझ्याबरोबर गाडींत दिसलांत म्हणजे मी आपल्याला इथं आणून ठेवल्याची बातमी शहरभर फैलावेल— "

महाराज हंसून उद्गारले आणि आपल्या मोटारींत बसले.

— पाठकांच्या घराची लूट झाल्याची बातमी ऐकल्यापासून माझें मन अत्यंत बेचैन झालें होतें. आपण ' तरुण भारत 'चे संपादक असल्यामुळें आपलें घर लुटलें गेलें, अशा भ्रमांत मी आतांपर्यंत होतों. पण त्या बातमीमुळें लुटा-

लुटीच्या आणि दंगलीच्या स्वरूपावर अगदीं निराळाच भेसूर प्रकाश पडला. श्री. गोपाळराव पाठक हे कट्टे कांग्रेसभक्त होते; व श्री. रामभाऊ साखरदांडे यांचा सार्वजनिक जीवनाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नव्हता. उलट, पक्ष किंवा जात पात न पाहतां सर्वांचा सारख्याच प्रेमानें सत्कार करणारे उदार, आतिथ्यशील गृहस्थ म्हणून रामभाऊंची ख्याति होती. त्यांचा ओढा असलाच, तर कांग्रेसकडे होता. अशा स्थितींत, पाठक आणि साखरदांडे यांच्या घरांची जी लूट कर्फ्यू जारी झाल्यानंतर तास दीड तासानें अगदीं संथपणानें करण्यांत आली, ती ते दोघे केवळ ब्राह्मण आहेत एवढ्याच एका कारणामुळें तर नसेल ? अशा प्रकारच्या राजकीय प्रक्षोभांत डॉ. परांजपे यांच्यासारख्या प्रतिपक्षीयाच्या घरावर हल्ला करण्यांत यावा किंबहुना पाध्ये, ताम्हनकर, गोखले प्रभृति ब्राह्मण व्यापाऱ्यांचीं दुकानें लुटलीं जावींत, हेंहि एक वेळ समजूं शकतें. पण पाठक आणि साखरदांडे यांच्या घरांची लूट का व्हावी ? ते दोघे ब्राह्मण असल्यामुळेंच जर केवळ त्यांच्या घरावर ही संक्रांत आली असेल, तर साखरदांड्यांच्या घरापासून पुरत्या फर्लांगाच्याहि अंतरावर नसलेले कोठीवानांचें घर तरी गुंडांच्या तावडींत सांपडलें नसेल कशावरून ? आणि त्यांच्या घराची जर लूट झाली असली, तर शांताबाई तेथून कोठें गेली असेल ?—

—या विचारांत मी तळमळत असतांनाच दारांत लॉऱ्या येऊन उभ्या राहिल्याचा आवाज आला. तत्क्षणींच मी उठून बाहेर आलों. श्री. गोपाळराव पाठक, त्यांच्या वृद्ध मातोश्री, सौ. विमलाबाई पाठक, गोपाळरावजींचे दोघे धाकटे बंधु आणि इतर कुटुंबपरिवार लॉरींतून खालीं उतरत होता. नेहमीं मोटारींतून हिंडणाऱ्या गोपाळरावांच्या पायांत आज चपलासुद्धां नव्हत्या; व त्यांचा तो हिटलरसारखा भासणारा हंसतमुख चेहरा आज उदास, ओढ लागल्यागत दिसत होता.

तथापि मला पहातांच ते हंसून उद्गारले, " काय भाऊराव आम्ही आलों अखेर तुमच्या सोबतीला !—"

" मला कधीं वाटलं नव्हतं गोपाळराव, तुमच्यावरहि असा प्रसंग येईल न् तुम्हालाहि माझ्याप्रमाणें निराधार होऊन इथं यावं लागेल म्हणून !—"

" मलाहि हें कोडं आहे एक तुमच्याप्रमाणंच, भाऊराव ! तुमच्या घराची लूट चालू असतांनाच दुपारीं अडीचच्या सुमारास चतर्जींनीं फोन करून मला धोक्याचा इषारा दिला. तेव्हांपासून मी सारखा फोन हातांत घेऊन बसलों होतों; न् शक्य त्या सगळ्या अधिकाऱ्यांना फोन केले मी संरक्षण मिळण्यासाठीं. पण शेवटपर्यंत कोणी आलं नाहीं. माझ्या हातांतला फोन हिसकावून घेऊन तो फोडून टाकण्यांत आल्यावर मी समोर मॉडेल मिल्समध्यें जाऊन फोन केला. पण कांहीं उपयोग झाला नाहीं. स्वतःच्या डोळ्यादेखत स्वतःच्या घराची लूट झालेली पहावी लागली मला मुकाट्यानं—"

ते वैतागानें उद्गारले. त्यांच्या त्या उद्गारांत विलक्षण कटुता, विलक्षण चीड भरलेली होती.

" आणि हा सगळा प्रकार कर्फ्यू लागल्यावर घडला. मी घराची लूट पहात रस्त्यांत उभा असतां दोन मोटारीहि गेल्या त्या रस्त्यानं. पण कोणी ढुंकून पाह्यलं नाहीं आमच्याकडे ! एकदां असं वाटलं कीं, इथंच रहावं आतां उध्वस्त केलेल्या या ओसाड घरांत रात्रभर ! आणखी जें काय व्हायचं असेल आपलं, तें होऊन जाऊं दे एकदां ! पण राजेसाहेब स्वतः न्यायला आल्यामुळें यावं लागलं इथं—"

" तुमच्यानंतर आणखी कोणाकोणाच्या घरांची लूट झाली ?—"

" तुमच्या घरापासून तो थेट साखरदांड्यांच्या घरापर्यंत मार्डीकर, हरदास, पारळकर, कुलकर्णी, सालपेकर, देशपांडे, धिरणीकर वगैरे जेवढे कोणी ब्राह्मण म्हणून त्या रस्त्यावर होते, तेवढ्या सगळ्यांच्या घरांची लूट झाली. आणि मजा अशी कीं, यांपैकीं कांहीं घरं महालांत कर्फ्यूचा पुकारा होत असतांना लुटलीं गेलीं! इकडे कर्फ्यूची दवंडी चालली होती आणि तिकडे लुटीचा धडाका सुरू होता !—"

" पण तुम्ही इतके फोन करूनहि कोणीच मदतीला येऊं नये तुमच्या हें नवल नव्हे कां ?—"

" मी सांगितलं ना तुम्हांला माझ्या हातांतला फोन काढून घेतला जाईपर्यंत मी प्रत्येक अधिकाऱ्याला फोन करून पाह्यला म्हणून ! जो तो मला आश्वासन देत होता, " मैं अभी मदत भेज रहा हूं ! पण अखेरपर्यंत कोणीहि आलं नाहीं. मला राहून राहून चमत्कार वाटतोय तो याच गोष्टीचा !—"

गोपाळराव अगदीं चिडून बोलत होते. त्यांनीं साऱ्या प्रसंगाचें इत्थंभूत वर्णन केलें. तें ऐकून मला पुष्कळच नवीन बोध झाला. शेवटीं मी त्यांना म्हटलें--

" मला काल सकाळपासून निश्चित कल्पना होती असं कांहीं तरी होणार असल्याची. पण, मला सारखं वाटे, आपलं मंत्रिमंडळ कांहीं हाताबाहेर जाऊं देणार नाहीं परिस्थिति. ज्या अर्थीं शहरांत उघड उघड गेले दोन दिवस हा प्रचार चालू आहे, त्या अर्थीं मंत्रिमंडळालाहि कल्पना असलीच पाहिजे सगळया गोष्टींची. रविवारीं दुपारींच मी बाबुराव उळाभाजे यांना आमच्या कचेरींत बोलावून पंडितजींच्या कानांवर सगळया गोष्टी घालण्याची सूचना केली होती— "

" पण भाऊराव, पं. मिश्र इथें नाहींत. ते जर आज इथं असते, तर गोष्टी कधीं गेल्या नसत्या या थराला— "

" महाराजांनीं सांगितलं मला दुपारीं ते दिल्लीला गेले असल्याचं. पं. मिश्र जर नागपुरांत असते, तर बंदोबस्ताच्या बाबतींत इतकी दिरंगाई आणि ढिलाई खचित होती ना, हें मलाहि मान्य आहे. पण, ते नसले, म्हणून काय झालं ? पोलिस खातं तर जाग्यावर होतं ना ? मी तर असं ऐकलं कीं, पोलिस अधिकाऱ्यांच्या डोळयांसमोर कांहीं ठिकाणीं लुटालूट न् जाळपोळ झाली— "

" झाली असेल ! माझ्या स्वतःच्या अनुभवावरून मी सुद्धां म्हणूं शकेन असं ! माझ्यासारख्या माणसाला ज्या अर्थीं फोन करून मदत मिळूं शकत नाहीं, त्या अर्थीं दुसऱ्यांच्या बाबतींत काय झालं असेल, याची कल्पना करणं कठीण नाहीं, भाऊराव-- "

मी कांहीं बोललों नाहीं. त्यांचा संताप मला अगदीं न्याय्य वाटला. कांहीं वेळानें त्यांनीं मला विचारलें, " तुमची सगळी मंडळी आली इथं ? — "

" नाहीं. फक्त मी आज दुपारीं महाराजांची मोटार आल्यामुळें दोघा मुलांना घेऊन येथें आलों. दादा आणि ताई चिचभुवनला आहेत; न् शांताबाई आणि तिची आत्या कोठीवानांकडे आहेत. त्यांचें घर तर सुरक्षित आहे ना अद्याप ? — "

" बहुधा असावं ! रामभाऊ साखरदांड्यांच्या घरापाशींच गुंडांना लुटालूट आटोपती घ्यावी लागली असं दिसतं. पण, मला वाटतं, तुम्ही शांताबाईना

इथं आणलेलं बरं! अनायासं पोलिसच्या लॉऱ्या आहेत आपल्यापाशीं. तुम्ही आतांसुद्धां आणायला हरकत नाहीं त्यांना. कोठीवानांच्या घरापेक्षां इथं केव्हांहि सुरक्षितता जास्त आहे— ”

“ बरोबर आहे तुमचं म्हणणं, गोपाळराव. मला तर चिंचभुवनला जाऊन दादाताईंनासुद्धां इथं आणायची इच्छा आहे. कारण, हें लुटालुटीचं न् जाळ-पोळीचं सत्र तिथपर्यंत पोंचल्याशिवाय रहाणार नाहीं, असा अंदाज आहे माझा — ”

“ तो अंदाज कांहीं चूक नाहीं. कारण, आमच्या घराची लूट होत असतांना मी ज्या गोष्टी प्रत्यक्ष पाहिल्या, त्यावरून हा सारा प्रकार कांहीं एका पद्धतीनं घडून आलेला आहे, याबद्दल मला शंका उरलेली नाहीं. पण सध्या शांताबाईंना तर घेऊन येऊं या आपण. म्हणजे त्या निमित्तानं त्या भागांतली परिस्थिती काय आहे, याचीहि कल्पना येऊन जाईल आपल्याला. मला आमच्या बाबुराव वैद्यांच्या घराबद्दल काळजी वाटतेय थोडी. आपण कोठीवानांकडे गेलों, म्हणजे तीहि काळजी दूर होईल अनायसं -- ”

“ ठीक आहे. चला—”

आम्ही लगेच लॉरींत बसलों. लॉरी महालांतून जात असतां गोखले, ताम्हनकर प्रभृतींची जाळलेलीं दुकानें, रस्त्यांत पसरलेले आगीच्या बंबाचे कापडी नळ, बंदोबस्तासाठीं म्हणून उभे असलेले कॉंग्रेसचे स्वयंसेवक आणि गस्त घालणारे सशस्त्र पोलिस त्या निर्मनुष्य, भयाण रस्त्यांत आमच्या दृष्टीस पडले.

कोठीवानांच्या घरासमोर लॉरी थांबतांच मी खालीं उतरून हांक मारली, “ शंकरराव—”

त्याबरोबर आंतून आवाज आला, “ कोण आहे ?--”

“ मी माडखोलकर--”

तत्क्षणींच दार उघडून शंकरराव पुढें आले आणि त्यांनीं विचारलें “ भाऊ-साहेब, कसे आलांत तुम्ही ?—”

“ गोपाळराव न् मी या पोलिस लॉरींतून आलों मुद्दाम शांताबाईला न्यायला--”

" तुम्ही कुठं नेणार आहांत त्यांना भाऊराव ? त्या आमच्याकडे असलेल्या काय वाईट आहेत ?—"

त्यांच्यामागें उभ्या असलेल्या सुशीलाबाईंनीं विचारलें.

" आम्ही राजवाड्यांत नेणार आहोंत त्यांना. तुमच्या घरापेक्षां तिथं सुरक्षितता जास्त आहे हें तुम्हालाहि मान्य होईल, सुशीलाबाई. शिवाय, त्या तुमच्याकडे असल्याचें जर मोहोल्ल्यांतल्या लोकांना कळलं, तर ते सूडबुद्धीनं त्रास देतील तुम्हांला उगाच—"

" तो त्रास आम्ही पाहून घेऊं, भाऊराव ! नाहीं तरी आजच्या घटकेला आम्ही ब्राह्मण आहोंत एवढी एक गोष्ट सुद्धां आम्हांला त्रास द्यायला पुरे आहे—"

शंकरराव बेपर्वाईनें हंसून उद्गारले. तोंच सुशीलाबाई म्हणाल्या—

" आमची हरकत नाहीं भाऊराव, तुम्ही त्यांना नेणार असाल तर. पण त्यांना आमच्याकडे राह्यला जास्त बरं वाटेल अशी समजूत आहे माझी—"

" तुम्ही म्हणतां तें मलाहि पटतं, सुशीलाबाई. पण, मीनानं दुपारपासून सारखा हट्ट धरला आहे त्या दोघींच्या भेटीसाठीं. आणखी असंहि एक वाटतं मनाला कीं, नाहीं तरी आतां ज्या अर्थी स्वतःच्या घरांतून आम्ही बाहेर पडलों आहोंत अशा रीतीनं, त्या अर्थीं जिथं कुठं नशिबानं आसरा मिळेल तिथं एकत्र रहावं सर्वांनीं म्हणजे तेवढाच आधार वाटतो एकमेकांचा एकमेकांना—"

" तुमचं म्हणणं खरं आहे, भाऊराव. तुम्ही आंत या आणि स्वतःच बोलों शांताबाईशीं—"

मी एकटाच त्या दोघांच्या पाठोपाठ आंत गेलों. मला पहातांच शांताबाईला रडूं कोसळलें आणि ती उद्गारली—

" तुम्ही केव्हां एकदां दृष्टीस पडाल असं झालं होतं मला. आम्ही दोघी इथं सुरक्षित आलों खऱ्या. पण, मला सारखं वाटे, तुम्हांला दुपारीं मोटारींतून नेलें, तें कांहीं दगाफटका करण्यासाठीं तर नसेल ? आणि त्यामुळं चैन नव्हतं माझ्या जिवाला अगदीं—"

" ती तुझी भीति निष्कारण होती, शांताबाई. मधूची चिठी तूं आपल्या डोळ्यांनीं वाचली होतीस ना ?—"

" पण अक्षरासारखं अक्षर काढून फसवणं शक्य नाहीं का ? उलटलेलीं न् उलट्या काळजाचीं माणसं काय करतील, हें कोणी सांगावं ? आज दुपारीं आपल्या घराचा विध्वंस ज्या राक्षसी पद्धतीनं करण्यांत आला, तो पाहून माझा आतां कोणावरहि विश्वास उरलेला नाहीं; कोणाच्याहि चांगुलपणाची खात्री वाटणार नाहीं मला यापुढं ! त्या वेळीं तुम्ही जर घरीं असतात न् त्यांच्या हातीं सांपडला असतात, तर त्यांनीं काय केलं असतं तुमचं याची कल्पनासुद्धां करवत नाहीं मला—"

" पण तें सगळं संकट टळलं ना ? मग आतां कशाला विचार हवा त्याचा ?—"

" संकट टळलं असं कसं हो म्हणतां तुम्ही ? मी संध्याकाळीं मुद्दाम बजरंग ठेकेदारांच्या बरोबर जाऊन घर पाहून आलें आपलं. अगदीं कांहीं कांहींसुद्धां उरलं नाहीं हो ! घराचीं खिडक्या--दारं, विजेचं फिटिंग न् नळाच्या तोट्या-सुद्धां शिल्लक ठेवलेल्या नाहींत त्यांनीं ! माणसांना कसा हो इतका दुष्टपणा करवतो ? ज्या बहुजनसमाजाचा संयुक्त महाराष्ट्रासाठीं तुम्ही इतका उदो उदो केलात, तो इतका मूर्ख, कृतघ्न न् अत्याचारी असेल, असं वाटलं नव्हतं कधीं मला ! एवढ्या हौसेनं बांधलेल्या त्या घराच्या फक्त भिंती उभ्या आहेत. बाकी सगळं सगळं गेलं हो !—"

शांताबाईला जास्त बोलवेना. गेल्या तेवीस वर्षांत मी कधींहि तिला अशा रीतीनें ओक्साबोक्शी रडतांना पाहिली नव्हती. दुपारपासून एकसारखें रडल्या-मुळें सुजलेले तिचे ते विशाल, सुंदर डोळे उमलण्याच्या बेतांत असलेल्या कम-ळाच्या फुगीर कळ्यांसारखे दिसत होते; व तिच्या त्या किंचित् उग्र, मानी चेहऱ्यावर कधीं नव्हे अशी विलक्षण कारुण्याची कळा आली होती. हुंदका देऊन रडणें हें मुळीं तिच्या स्वभावांतच नव्हतें. आपलें दुःख किंवा दैन्य दुस-ऱ्याला दिसूं देणें हें त्या मानिनीला कधीं रुचलेंच नाहीं. आमचा एकुलता एक मुलगा चंद्रशेखर हा आजारांत अत्यवस्थ असतांनासुद्धां डोळ्यांतून गळणाऱ्या आंसवांखेरीज तिच्या मनोवेदना कधीं कोणाच्या दृष्टीस पडल्या नाहींत. त्या-मुळें तिचा तो अनावर दुःखावेग पाहून मला आश्चर्य आणि त्याहिपेक्षां भीति जास्त वाटली. माझ्या मनांत आलें, १९४२ च्या सप्टेंबरपासून गेलीं सहा

वर्षे अस्थिक्षीणतेच्या भावनेनें झिजत असलेली आपली ही नाजूक, अशक्त जीवनसखी या आघातानें कायमची खचून तर जाणार नाहीं ना ? म्हणून मी तिला धीर देण्यासाठीं म्हटलें—

"शांताबाई, तूं रडूं नकोस मुळींच. मी महिन्याच्या आंत तुला अगदीं पहिल्यासारखं घर सजवून देईन पुन्हा आपलं. अग, चिमण्या इतक्या हौसेनं घरटीं बांधतात, आपण तीं काढून फेकून देतों न् त्या बिचाऱ्या लगेच पुन्हा नवं घरटं बांधायला सुरवात करतात, हें पाह्यलं आहेस ना तूं ? तसंच समजून चाललं पाहिजे आपण. मला या विध्वंसाचं दुःखहि वाटत नाहीं न् भयहि वाटत नाहीं. आतांपर्यंत माझ्या आयुष्यांत दोन वेळां मी आपल्या डोळ्यांनीं स्वतःच्या भरलेल्या संसाराचा विध्वंस झालेला पाह्यलाय. त्यापेक्षां कांहीं हें संकट जास्त नाहीं— "

" पण त्या वेळीं तुम्ही अगदीं तरुण होतात; तुमची उमेद न् उत्साह अगदीं ताजा होता. तेव्हां जें तुम्ही करूं शकलांत, तें आतां कसं करतां येईल तुम्हांला ? शिवाय आपल्या घराप्रमाणंच 'तरुण भारता'चंहि वाटोळं केलं तुमच्या बहुजनसमाजानं— "

" केलं असेल ! पण मी अजून उभा आहे ना ? माझी बुद्धि न् लेखणी या तर शाबूत आहेत ना ? त्यांच्या जोरावर महिन्याच्या आंत मी पुन्हा पूर्वीसारख्या उभ्या करून दाखवीन सगळ्या गोष्टी. तूं अगदीं भिऊं नकोस, शांताबाई. मी उभा आहे, यांत सगळं कांहीं सामर्थ्य आहे आपलं असं बेलाशक समजून चाल तूं— "

" हेंच सारखं सांगतेय मघांचपासून मी तिला. पण ती कांहीं कुणाचं ऐकून घ्यायलाच मुळीं तयार नाहीं. सुशीलाबाईंनीं इतका आग्रह केला, पण धड जेवलीसुद्धां नाहीं ती आज— "

तिच्या वृद्ध आत्याबाई मध्येंच उद्गारल्या.

" असं रडून कसं चालेल आपलं, मिरा ! जो काय बरावाईट प्रसंग आयुष्यांत येईल, तो खंबीरपणानं निभावून नेला पाहिजे. घराचा निकाल लागला असला, तरी आपण सगळीं तर सुरक्षित आहोंत ना ? त्यांत सारं कांहीं आलं

तूं रडूं नकोस बाई, अशी एकसारखी. तूं जर डोळ्यांतून पाणी काढीत राहलीस दिवसभर, तर बिचाऱ्या मुलांनीं कोणाच्या तोंडाकडे पाह्यचं ?—"

" मुलांवर कांहीं परिणाम झालेला नाहीं अजून तरी या प्रसंगाचा. उलट भास्करनं घर लुटलें गेल्याची बातमी आणतांच मीना जेव्हां रडायला लागली, तेव्हां चंद्रशेखर तिला म्हणाला, " अग, श्रीकृष्णाची सोन्याची द्वारका त्याच्या डोळ्यासमोर समुद्रांत बुडाली, पण त्याला एवढंसुद्धां वाईट वाटलं नाहीं त्याबद्दल ! " मुलं मजेंत आहेत राजवाड्यांत आल्यापासून—"

" त्यांना काय कल्पना आहे आपलं किती नुकसान झालंय याची ? त्यांच्या डोळ्यांसमोर घर लुटलं गेलं असतं, तो सगळा भयंकर विध्वंस त्यांनीं आपल्या नजरेनं पाह्यला असतां, तर त्यांच्याहि डोळ्यांना धारा लागल्या असत्या माझ्याप्रमाणं ! आपला दोन पिढ्यांचा संसार, दादांची न् तुमची सगळ्या जन्माची कमाई एका अर्ध्या तासांत मातीला मिळवली तुमच्या त्या नालायक बहुजनसमाजानं—"

" बहुजनसमाजाला नांवं ठेवूं नकोस तूं, शांता. त्याची स्थिति मेंढरासारखी आहे खरोखरी. म्होरके चिथावणी देतील तसं आंधळेपणानं वागायचं ही त्याची वृत्ति ! बहुजनसमाजाला दोष देऊन काय फायदा ? ज्यांनीं खोट्यानाट्या कंड्या पिकवल्या, याद्या, तयार केल्या, घरं दाखवलीं न् कांग्रेसच्या नांवाखालीं पोलिसांना दमदाटी करून आपले हेवेदावे दिवसाढवळ्या उजागरीनं उगवून घेतले, त्या जात्यंध नराधमांचं कृत्य आहे हें सगळं ! शिवाय, गोडशांसारखा शिकला सवरलेला, वर्तमानपत्र चालवणारा ब्राह्मण कार्यकर्ता जर ऐंशी वर्षांच्या, अखिल राष्ट्रानं पित्याप्रमाणं पूज्य मानलेल्या, वृद्ध नेत्याला प्रार्थनेसाठीं हात जोडलेले असतांना गोळी घालून त्याचे प्राण घेतो, तर अडाणी, निरक्षर बहुजनसमाजानं त्या अमानुष कृत्यामुळं चवताळून जाऊन अविवेकानें अत्याचार केल्याबद्दल त्याला कोणत्या तोंडानं दोष द्यावा ? महात्माजींची एका ब्राह्मणानं केलेली ती हत्या आणि त्यानंतर चिडलेल्या जमावानं घातलेला हा हैदोस या दोहोंचेहि भयंकर परिणाम भोगावे लागणार आहेत महाराष्ट्रांतल्या ब्राह्मणांना आणि ब्राह्मणेतरांनाहि. महात्माजींच्या हत्येचं महापातक महाराष्ट्राला आणखी किती प्रकारांनीं भोवणार आहे याची कल्पना करवत नाहीं मला !—

"पुढं काय व्हायचं असेल तें होईल ! पण आज आपल्यावर घरादाराला मुकून अनाथासारखी रस्त्यावर बसण्याची पाळी आली आहे एवढं मात्र खरं—"

"रस्त्यावर कशानं ? आम्ही चांगले राजवाड्यांत कोचावर बसलों आहोंत आज दुपारपासून न् तुम्हांलाहि तिथंच न्यायला आलोंय मी ! चलायचं ना मग ?-"

"हो, नाहीं म्हणून काय उपयोग आहे ? स्वतःच्या घरांतून एकदां सर्वस्वाला मुकून बाहेर पडल्यावर आतां जो कोणी आपल्या घरांत थारा देईल तोच आपला त्राता आणि तेंच आपलं घर ! बंगाल न् पंजाब प्रांतांतील निर्वासितांच्या भयंकर कहाण्या वाचीत होतों आजपर्यंत आपण. पण त्यांच्याप्रमाणं आपल्यावरहि एक दिवस निर्वासित होण्याचा प्रसंग येईल असं वाटलं नव्हतं कधीं मनाला—"

"तो विलक्षण अनुभव आपल्या वांट्याला आला, हासुद्धां नशिबाचा एक उपकारच मानला पाहिजे आपण ! माझ्या आयुष्यांत मी श्रीमंती, दारिद्र्य, उपासमार, झडत्या, बंदिवास, अंधारकोठडी, जप्त्या वगैरे सगळे अनुभव घेतले होते. फक्त हा निर्वासित होण्याचा प्रसंग मात्र अद्याप अनुभवला नव्हता. तोहि भोग वाट्याला आला आज ! मघाशीं 'हितवाद'च्या मर्गीशीं जेव्हां मी फोनवर बोललों, तेव्हां "आज निर्वासित होऊन मी महाराजांच्या आश्रयाला आलोंय" असंच सांगितलं त्यांना. अग, संकटांतसुद्धां एक मजेचा न् समाधानाचा भाग असतो कुठं तरी. फक्त तो विवेकानं लक्षांत घेतला पाहिजे आपण. म्हणजे दुःखाचा भार तेवढाच कमी होतो त्याच्या जाणिवेनं. शिवाय माझ्या आयुष्यांत संकटं हीं नेहमीं उत्कर्षकारक ठरत आलेलीं आहेत. तसंच याहि बाबतींत घडणार नाहीं कशावरून ?—"

"तुम्ही न् तुमचे चिरंजीव यांना कोणत्या प्रसंगीं काय तत्वज्ञान सुचेल याचा कांहीं नेम नाहीं ! पण मी एक सामान्य संसारी बायको आहे. मला फक्त एवढंच दिसतंय कीं, आतां वयं उताराला लागल्यावर जिथं कुठं जागा मिळेल तिथं तीन धोंडे मांडून संसाराला पहिल्यापासून प्रारंभ करावा लागणार आहे आपल्याला उद्यां—"

तिचा मनःक्षोभ आतां पुष्कळच कमी झाला होता. तिनें कोठीवान मंडळीचा निरोप घेतला; व आपल्या आत्याचा हात धरून ती लॉरींत बसली.

ती लॉरींत बसत असतांनाच गोपाळरावांनीं तिला हंसत हंसत म्हटलें, " काय शांताबाई, मजेंत आहांत ना ?—"

" हो, आतां मजाच आहे सगळी ! तुमचंहि घरं लुटलं म्हणे सगळं—"

" अगदीं तुमच्या घराप्रमाणंच ! थेट साखरदांड्यांच्या घरापर्यंत त्या सबंध ओळींतलं ब्राम्हणाचं कोणतंच घर सुटलं नाहीं जमावाच्या तडाक्यांतून—"

" आमचं घर लुटलं जाणं हें साहजिक वाटतं मला एका परीनं. पण तुमचं घर लुटलं जावं हें मात्र नवल समजतें मी एक—"

" मलाहि नवल वाटतंय तुमच्याप्रमाणंच ! पण झालंय खरं तसं !—"

" विमलाबाई न् इतर मंडळी कुठं आहेत तुमची ? —"

" राजेसाहेबांनीं मुद्दाम येऊन नेलें आम्हांला आपल्या वाड्यांत. नाहीं तर आम्ही घर साफ झाल्यावर अक्षरशः रस्यावर येऊन बसलों होतों बघा—"

आम्ही वाड्यांत येऊन पोचलों, त्या वेळीं महाराज आमची वाट पहात पायऱ्यांवर उभेच होते.

शांताबाई लॉरींतून खालीं उतरून वर येतांच ते हात जोडून उद्गारले—

" या बाई. फार तसदी झाली आपल्याला आज. इथं संकोच करायचं कांहीं कारण नाहीं. हें घर आपलंच आहे—"

शांताबाईनें त्यांना नमस्कार केला. राणीसाहेब आणि प्रमिलाराजे आंतल्या बाजूला उभ्या होत्या. त्यांनीं त्या दोघींना आंत नेलें.

त्या आंत गेल्यावर महाराज म्हणाले, "दादा येताहेत आतां. इतक्यांत फोन आला त्यांचा—"

त्यांच्या पाठोपाठ आम्ही आंत गेलों. मी त्यांना म्हटलें, " महाराज, माझी आणखी एक विनंति आहे आपल्याला— "

" बोला, भाऊसाहेब— "

" माझा विचार आतांच्या आतां चिचभुवनला जाऊन माझ्या सासूसासऱ्यांना इथं आणायचा आहे. बाहेर लॉऱ्या उभ्या आहेत. आपण विचारून पहाता का सबइन्स्पेक्टरला ?— "

आम्ही लगेच बाहेर आलों. महाराजांनीं चौकशी केली. पण नागपूरच्या म्युनिसिपल हद्दीबाहेर लॉन्या नेण्याची आपल्याला परवानगी नाहीं, असा खुलासा सबइन्स्पेक्टरनें केला.

तेव्हां आपल्या हातांतल्या घडाळ्याकडे पाहून महाराज मला म्हणाले, "आतां अकरा वाजायला आले आहेत, भाऊसाहेब. उद्या सकाळीं मीच घेऊन जाईन तुम्हांला चिचभुवनला—"

आम्ही हें बोलत आहोंत, तोंच ना. डॉ. बार्लिंगे यांची मोटर आली; व ते आणि डी. आय. जी श्री. बंबावाले तींतून उतरले.

वर आल्यावरोबर दादांनीं माझ्या खांद्यावर हात ठेवून विचारलें, "काय फार त्रास झाला नाहीं भाऊराव, तुम्हाला ?—"

"चाललंच आहे. पण इथं मात्र आतां आम्ही अगदीं सुरक्षित आहोंत महाराजांच्या राज्यांत, दादा !—"

"माझं राज्य फार लहान आहे, भाऊसाहेब ! तें जर मोठं असतं तर असे प्रकार कधीं घडले नसते नागपुरांत—"

महाराज हंसून उद्गारले. दादांनीं गोपाळरावांचा हात धरला आणि ते त्यांच्याशीं बोलत आंत आले.

आंत आल्यावर श्री. बंबावाले यांनीं गोपाळरावांना आणि मला एकंदर प्रकार कसा घडला, याची माहिती विचारली. मी त्यांना सांगितले कीं, आमच्या घराची लूट झाली, त्या वेळीं मी घरीं नसल्यामुळें मला कांहींहि सांगणें शक्य नाहीं. तथापि, माझ्या कानांवर आलेल्या गेल्या दोन दिवसांतल्या बातम्यांची माहिती मात्र मी त्यांना दिली. गोपाळरावांच्या घराची लूट त्यांच्या डोळ्या-समोरच झालेली असल्यामुळें त्यांनीं घडलेल्या प्रकाराचें इत्थंभूत वर्णन केलें; व या एकंदर अत्याचारांच्या पार्श्वभूमीसंबंधीची आपली कल्पनाहि त्यांना सांगि-तली. श्री. बंबावाले यांनीं शांतपणानें सर्व ऐकून घेतलें.

चौकशी पूर्ण झाल्यावर निरोप घेतांना दादा म्हणाले, "मला वाटतं, तुम्ही दोघांनीं इथं रहाण्यापेक्षां आमच्या बंगल्यावर आपल्या मंडळींना घेऊन येणं चांगलं—"

"पण दादा, इतकीं माणसं घेऊन कुठं यायचं आम्ही तुमच्याकडे—"

" तुम्हाला कल्पना नाहीं, भाऊराव! माझा बंगला धर्मशाळेसारखा आहे. तुमचीं दोन कुटुंब तिथं आल्यानं अधिक काय होणार आहे? तुम्ही शहरांत रहाणं मात्र धोक्याचं आहे अगदीं. मी वाड्यासमोर जास्त गार्डस् ठेवण्याची व्यवस्था करतो. पण तुम्ही आमच्याकडे येणंच सोयीचं आहे खरोखरी--"

" पण कोणाच्याहि घरीं रहाण्यापेक्षां आमची दुसरी कांहीं स्वतंत्र सोय नाहीं का होण्यासारखी, दादा?—"

" त्याचाहि विचार करतों आहोंत आम्ही. पण, खरंच सांगतो तुम्हांला तुम्ही आमच्याकडे येऊन राह्यला कांहीं हरकत नाहीं, भाऊराव--"

ते गेल्यावर आम्ही निजण्यासाठीं वर दिवाणखान्यांत गेलों. आपल्याला झोंप येईल कीं नाहीं, याबद्दल मला शंका होती. पण बिछान्यावर अंग टाकल्याबरोबर अगदीं शांत, अगदीं निःस्वप्न अशी झोंप मला त्या रात्रीं प्रथमच लागली. जणुं कांहीं, गेले तीन अहोरात्र आगामी संकटाविषयीं निरनिराळ्या प्रकारच्या कल्पना करून शिणलेलें माझें मन त्या संकटाचा प्रत्यक्ष तडाखा बसतांच कोलमडून पडलें आणि आपला सर्व शीणभार विसरण्यासाठीं, रडून थकून झोंपीं गेलेल्या अर्भकाप्रमाणें, निद्रामाऊलीच्या निवांत कुशींत शिरलें.

× × ×

मंगळवार ता. ३ रोजीं सकाळीं आम्ही उठून चहा घेण्यासाठीं खालीं येतों, तों कर्फ्यूची मुदत पहांटेच संपल्यामुळें, शहरांत लुटालुटीला पुन्हा जोरानें सुरवात झाली असल्याचें समजलें. महाराज फोनवर हात ठेवून टेबलापाशीं उभे होते. ते म्हणाले—

" काल दिवसभर एवढा उधम झाल्यानंतरहि आज सकाळीं यांनीं कर्फ्यू पुन्हा जारी करूं नये, हें नवल नव्हे का? काल कर्फ्यू लागल्यानंतरहि दोन तासपर्यंत लुटालूट चालू होती हें तुम्ही सांगितलं होतं ना डी. आय जी. ला भाऊसाहेब? आतां जर यांनीं कर्फ्यू पुन्हा ताबडतोब लावला नाहीं, तर महालांतलीं उरलीं सुरलीं दुकानंहि आज लुटलीं न् जाळलीं गेल्याशिवाय राहणार नाहींत-- "

" याचा अर्थ असा कीं, शहरांतली परिस्थिति किती भीषण आहे या गोष्टीची अजून त्यांना नीट कल्पना आलेली नाहीं-- "

" पण कल्पना केव्हां येणार, गोपाळराव? महाल पुरता बेचिराख न् बरबाद झाल्यावर? काल दादा न् बंबावालेसाहेब सगळा प्रकार स्वतःच्या डोळ्यांनीं पाहून गेल्यावर सुद्धां आणखी बंदोबस्तांत पुन्हा अशी ढिलाई? छे, छे! ही कांहीं राज्य करण्याची तयारी नाहीं, गोपाळराव!-- "

आम्ही हें बोलत आहोंत, तोंच श्री. शिर्के आंत येऊन गोपाळरावांना म्हणाले, " तुमची अमर फॉर्मसी फुटली असून, 'तरुण भारत' प्रेसवर पुन्हा हमला करताहेत, असं ऐकलं आतां-- "

" छान! म्हणजे घर तर गेलंच; पण आतां दुकानहि लुटून आम्हांला अगदीं पुरतं गाडून टाकायचा बेत दिसतोय-- "

" गोपाळराव, स्वस्थ बसून चालणार नाहीं आपलं. तुम्ही पी. वाय् ना फोन करतां का? "

" तुम्ही म्हणत असाल, तर मी करतों. पण ते तरी बिचारे काय करणार?-- "

" त्यापेक्षां, मला वाटतं, तुम्हीं पंडितजीनाच सरळ फोन केलेला चांगला, महाराज! शहरांत पुन्हा दंगल सुरू झाली आहे हें एकदां कानांवर तरी जाऊं दे त्यांच्या-- "

" ठीक आहे. तुम्ही म्हणतां भाऊसाहेब, तर मी फोन करतो त्यांना—"

आणि महाराजांनीं पं. शुक्ल यांना फोन केला. पण, त्यांना असें उत्तर मिळालें कीं, पंडितजी पूजेला बसलेले असून, आणखी तासभर तरी फोनवर येऊन बोलूं शकणार नाहींत!

" तोंपर्यंत शहराची पूजा होऊन जाईल पुरती! छे छे, असं चालणार नाहीं. पंडितजींनीं पूजेंतून उठून दाद घेतली पाहिजे या प्रकाराची—"

महाराज स्वतःशीच बोलले आणि त्यांनीं पुन्हा पंडितजींना फोन केला. प्रथम थोडी चकमक झडली; पण लगेच पंडितजीना फोनवर बोलावण्यांत आलें. महाराज त्यांना म्हणाले--

" माफ करा हं, पंडितजी, आपल्याला पूजेंत असतांना तसदी द्यावी लागली याबद्दल! पहांटे कर्फ्यू संपल्यांपासून शहरांत पुन्हा उधम सुरू झाला आहे हें कळलं का आपल्याला? ...... मला वाटलंच! नाहीं तर आपण पुन्हा कर्फ्यू

जारी करण्याचा हुकूम ताबडतोब दिला असता याबद्दल शंका नाहीं आम्हांला. ......कर्फ्यू ताबडतोब लागला, तरच दंगल आटोक्यांत येईल, पंडितजी. काल कर्फ्यू लावल्यावर सुद्धां आपल्या गोपाळराव पाठकांचं घर न् इतर कांहीं घरं लुटलीं गेलीं. म्हणून कर्फ्यूची अंमलबजावणी अगदीं कसोशीनं झाली पाहिजे आज. कोणत्याहि प्रकारची ढिलाई उपयोगी नाहीं बंदोबस्तांत--"

महाराज फोन खाली ठेवून आम्हांला म्हणाले--

"पहा! पंडितजींशीं बोलल्याचा उपयोग झाला. त्यांना पूजेंतून उठवावं लागलं खरं. पण आतां ताबडतोब व्यवस्था होईल सगळी. पण तुम्ही पी. वाय. शींहि बोलून घ्या गोपाळराव एकदां. म्हणजे तेहि पंडितजीना सांगतील सगळ्या गोष्टी--"

पं. शुक्ल यांच्याशीं फोनवर झालेल्या या संभाषणाचें सार्थक होऊन थोड्याच वेळांत कर्फ्यू जारी करण्यांत आला.

कर्फ्यू अमलांत येऊन बाहेरून सारखा कानांवर आदळणारा प्रचंड गलका शांत झाल्यावर त्या चमत्कारिक परिस्थितींतहि मनाला एक प्रकारची स्वस्थता लाभली. आणि मी महाराजांना म्हटलें—

"महाराज, मला आपण लिहायचं साहित्य द्याल, तर बरं होईल—"

"काय लिहिणार आहांत तुम्ही आज, भाऊसाहेब? तुमचा 'तरुण भारत' तर पार निकालांत निघाला--"

"महाराज; 'तरुण भारत' निकालांत निघाला असला, तरी मी अद्याप निकालांत निघालेलों नाहीं ना? गेल्या तीन दिवसांत ज्या गोष्टी घडल्या, त्या सगळ्या लिहून काढणार आहे मी--"

"आणि 'तरुण भारत' सुरू केल्यावर त्यांतून प्रसिद्ध करणार तें सगळं?"

"तें पाहूं पुढं! एवढी गोष्ट मात्र निश्चित कीं, या सगळ्या प्रकाराचं खरं स्वरूप लोकांच्या लक्षांत आणून दिल्याशिवाय कांहीं राहणार नाहीं मी--"

"पण आज आतांच लिहायची घाई का एवढी? —"

"तें समजायचं नाहीं महाराज, तुम्हांला! लिहिणं हें नित्यकर्म आहे आम्हां पत्रकारांचं. शरीराचे जसे कांहीं धर्म असतात, तसे मनाचेहि धर्म असतात; न् त्या धर्मांचं जर व्यवस्थित आचरण झालं नाहीं, तर त्याचा मानसिक आरोग्या-

वर परिणाम होतो लगेच. लिहिणं हा माझ्यासारख्या पत्रकारांचा मनोधर्म आहे. आणि त्या धर्माच्या परिपालनांत कोणत्याहि परिस्थितींत खंड पडतां कामा नये-- "

" अस्सं ! लेखनसाहित्याला कांहीं आपल्याकडे काळ नाहीं, भाऊसाहेब. आपण वाटल्यास इथं बसून लिहा, वाटल्यास वर दिवाणखान्यांत बसून लिहा. मात्र इथं गडबड होत राहील सारखी. मी वरती करायला सांगतों आपली लिहायची व्यवस्था म्हणजे निवांतपणा मिळेल आपल्याला-- "

" मला निवांतपणाची कांहीं गरज नाहीं, महाराज ! गडबडींत लिहिण्यांत जिवंतपणा असतो एक प्रकारचा. गोष्टी प्रत्यक्ष घडत किंवा ऐकत असतांना त्यांच्यासंबंधीं माणूस जें लिहितो, त्यांत जो एक प्रकारचा ताजेपणा आणि तजेला असतो, तो त्या मागाहून विचारपूर्वक आठवून लिहिण्यांत येत नाहीं-- "

" हें तुम्हां साहित्यिकांचं तंत्र आपल्याला कांहीं समजत नाहीं, भाऊ-साहेब ! तुमच्या मर्जीला येईल तिथें बसून लिहा तुम्ही-- "

आणि त्यांच्या टेबलापाशीं बसूनच मी ही ' कहाणी ' मंगळवार ता. ३ फेब्रुवारी १९४८ रोजीं सकाळीं ११॥ वा. लिहावयाला सुरवात केली. मधून मधून कोणी भेटावयाला आलें, म्हणजे जो काय खंड पडेल, तेवढाच. पण ' खंड ' तरी कसा म्हणूं ? कारण, भेटावयाला येणारीं हीं माणसें जें बोलत, जी माहिती देत, आणि जी चर्चा करीत, त्यामुळें त्या खंडित लेखनाला इतकी कांहीं जोराची चालना मिळे कीं, व्यक्त होण्यासाठीं आतुर झालेल्या विचारांच्या वेगाला आपल्या लेखणीची दौड अगदीं अपुरी पडते, असें मनाला वाटे !

दुपारीं ४ च्या सुमाराला गोपाळराव वर आले आणि म्हणाले, " खालीं पत्रकार आले आहेत तुमच्या भेटीला, भाऊराव— "

मी तत्क्षणींच हातांतला टांक खालीं ठेवून त्यांच्याबरोबर महाराजांच्या कचेरींत आलों. ' भवितव्या 'चे श्री. पु. य. देशपांडे व ' हितवाद 'चे श्री. मणि, श्री. भारद्वाज आणि श्री. अजितकुमार घोष हे त्यांच्या टेबलाभोंवती बसले होते. मी त्यांना नमस्कार केला आणि विचारलें—

" आपण आमचं घर पाहून आलांत ना येतांना ? -- "

" हो. तें अगदीं साफ करून टाकण्यांत आलंय. अगदीं कांहीं सुद्धां उरलेलं नाहीं. सगळं कांहीं नष्ट करून टाकण्यांत आलंय ! माडखोलकर, आम्हांला फार दुःख वाटतं ! ( Yes. Your ·house has been completely sacked. Nothing has been left Everything has been completely destroyed Mr. Madkholkar, we are very sorry— )—"

श्री. मणि उद्गारले. मॉडेल मिल्सकडे जाणाऱ्या रस्त्यावरील श्री. पाठक प्रभृति मंडळीचीं लुटलेलीं घरें आणि महालांतील दुकानांचा विध्वंसहि ते पाहून आले होते. त्याचा उल्लेख करून ते म्हणाले—

" काल सकाळीं अकराच्या सुमारास सर भवानीशंकर नियोगी, श्री. पु. बा. काळे, श्री. कोदंडराव आणि मी चीफ सेक्रेटरी श्री. राऊ यांच्याकडे गेलों होतों; व धंतोलीवर त्या सुमारास जी दगडफेक सुरू झाली होती, तिची माहिती त्यांना देऊन शहरांत कर्फ्यू लावण्याची सूचना आम्ही त्यांना केली होती. आमच्या या सूचनेला मान देऊन त्यांनीं जर ताबडतोब कर्फ्यू लावला असतां, तर परिस्थिति इतकी खचित बिघडली नसती. भर दुपारीं हमरस्त्यावर असलेलीं तुमचीं घरं ज्या वेळीं लुटलीं गेलीं, त्या वेळीं पोलिस काय करीत होते ? —"

" तें तुम्हीच सरकारला विचारलं पाहिजे आतां ! त्याहिपेक्षां नवलाची गोष्ट ही कीं, कर्फ्यू लागल्यावर पाठक न् साखरदांडे यांचीं घरं लुटलीं गेलीं —"

" हो. तें सगळं कळलं आम्हांला. सरकारनं या प्रकाराची चौकशी केली पाहिजे. पोलिस अधिकारी आणि काँग्रेस कार्यकर्ते यांच्या डोळ्यांसमोर हे प्रकार घडले, असं चांगलीं जबाबदार माणसं सांगताहेत. तें जर खरं असेल, तर सरकारनं या प्रकाराची कसून चौकशी केली पाहिजे. इतकी पद्धतशीर लुटालूट कशी करण्यांत आली याचा तपास लावला पाहिजे; न् जमावाला चिथावणी देणारांना योग्य शासन निर्भयपणानं केलं पाहिजे ! तरच सरकारचा राज्य करायचा निर्धार कायम आहे, असा विश्वास वाटेल लोकांना— "

श्री. मणि हें बोलत असतांनाच शांताबाई आली. त्यांच्या विनंतीवरून तिनें

घरावरील हल्ल्याची सर्व हकीकत सांगितली; व रस्त्यावर पोलिस उभे असतां-नाहि त्यांच्याकडून कांहीं संरक्षण मिळालें नाहीं, अशीहि तक्रार केली.

"ही तक्रार तर सार्वत्रिक आहे, शांताबाई ! — "

श्री. मणि म्हणाले. नंतर त्यांनीं माझ्याकडे वळून विचारलें—

"आतां पुढं तुमचा काय करायचा विचार आहे ? तुमचा पेपर तर कांहीं निदान आणखी दोन तीन महिने तरी सुरू होण्याची आशा नाहीं. आणि व्यक्तिशः तुम्हांलाहि फार धोका आहे— "

"मला असं वाटतं माडखोलकर, तुम्ही शक्य तर आज रात्रीच्या एक्स-प्रेसनंच आपल्या सर्व मंडळींसह मुंबईला जावें. आम्ही सर्व व्यवस्था करून देऊं तुमच्या जाण्याची. पण सध्यांच्या परिस्थितींत तुम्ही नागपुरांत राहणं अत्यंत धोक्याचं आहे— "

श्री. पु. य. देशपांडे यांनीं सूचना केली. त्यांनीं इतक्या कळकळीनें केलेली ती सूचना शांताबाईला पटली. कारण आमच्या भोंवतालची एकंदर परिस्थितिच मुळीं इतकी धोक्याची होती कीं, तिच्यांतून चटकन सुरक्षित बाहेर पडण्याचा तेवढा एकच मार्ग सहज सुचण्यासारखा होता. तथापि मी त्यांना म्हटलें—

"पण इतक्या माणसांना घेऊन मी मुंबईला कोणाकडे जाऊन राहूं ? मला धोका आहे, हें जाणून आहे मी. पण तरीसुद्धां नागपूर सोडून जाणं मला शक्य नाहीं. मी जर इथून एकदां निघून मुंबईला गेलों, तर 'तरुण भारत' पुन्हा सुरू होणं अशक्यच आहे जवळपास ! काय वाटेल तें झालं, तरी मला नागपूर सोडणं शक्य नाहीं मुळींच, देशपांडे !—"

"पण तुमच्या प्रेसचा विध्वंस किती झाला आहे याची कांहीं कल्पना आहे का तुम्हाला ? तुम्ही नवीं यंत्रं आणल्याखेरीज 'तरुण भारत' पुन्हा काढणं शक्य होणार नाहीं तुम्हांला. आणि तुमच्या विरुद्ध लोकमत आज इतकं बिथरलेलं आहे कीं, तुमचं पत्र छापून द्यायला नागपुरांतला कोणताहि प्रेस तयार होईल, असं मला वाटत नाहीं. या सगळ्या दृष्टींनीं देशपांड्यांनीं सुचविल्याप्रमाणं तुम्ही आजच्या आज मुंबईला जाणंच सोईचं आहे, माडखोलकर ! "

"तुम्ही ज्या कारणांमुळं मला नागपूर सोडून जायला सांगतां, त्याच

कारणांमुळं मला तें सोडून जाणं इष्ट वाटत नाहीं, मणि ! नाहीं तरी एक जीव घेण्यापलीकडे घराचा आणि प्रेसचा विध्वंस करून माझा जो काय नाश करणं शक्य होतं तो सर्व आमच्या मित्रांनीं केलाच आहे ! या विध्वंसांतून पुन्हा डोकं वर कसं काढायचं, हाच एक प्रश्न आहे आतां माझ्यापुढं. आणि म्हणून नागपूर सोडून जाणं मुळींच शक्य नाहीं मला— "

" पण इथंहि तुम्ही राहणं इष्ट नाहीं मुळींच ! तुमच्यामुळं राजेसाहेबांना त्रास व्हायचा आणखी— "

" माझी सरकारला अशी विनंति आहे कीं, त्यांनीं आम्हांला सरळ नागपूर तुरुंगांत नेऊन ठेवावं ही दंगल शांत होईपर्यंत ! सद्यःस्थितींत आम्हांला राह्यला नागपूर तुरुंगाइतकी सुरक्षित जागा सापडणार नाहीं दुसरी— "

" तुम्ही फार कडवटपणानें बोलतां आहांत, माडखोलकर ! ( You are very bitter, Mr. Madkholkar )— "

श्री. मणि हंसून उद्गारले. त्यावर श्री. गोपाळराव पाठक त्यांना म्हणाले—

" माडखोलकर जें म्हणताहेत, तें अगदीं खरं आहे, मणि ! आम्ही इथं राह्यलों, तर राजेसाहेबांना धोका आहे; न् इतक्या माणसांना घेऊन आम्ही कुठं जाऊंहि शकत नाहीं या दिवसांत. मग आम्ही राह्यचं कुठं ? नागपूर जेल हीच आतां एक सुरक्षित जागा आहे खरोखरी आम्हांला राह्यला. नाहीं तरी गेल्या दोन दिवसांत संघाचीं न् हिंदु सभेचीं शेंकडों माणसं सरकारनं तुरुंगांत नेऊन ठेवलीं आहेतच. त्यांतच आमच्या दोन कुटुंबांची भर — "

" नाहीं, नाहीं ! तुम्हीं असं बोलायचं कारण नाहीं, गोपाळराव ! आम्ही तुमची व्यवस्था करण्याच्या विचारांतच आहोंत सकाळपासून. असेंब्ली रेस्ट हौसमध्यें रहाण्याची तयारी आहे का तुमची ?— "

श्री. देशपांडे यांनीं विचारलें.

" हो. तयारी नसून काय करणार ? नागपुरांत जिथं कुठं संरक्षण मिळेल तिथं जायला तयार असलंच पाहिजे आम्ही आतां— "

" ठीक आहे. संध्याकाळपर्यंत बहुतेक व्यवस्था होईल तुमची राहण्याची— "

आणि आमचा निरोप घेऊन ते गेले.

तोंच श्री. दादा वाचासुंदर यांचा फोन 'महाराष्ट्र' कचेरींतून आला. त्यांना मी सांगितलें—

"आम्ही सुरक्षित आहोंत इथं आतांपर्यंत. पण प्रेसचं काय झालं आपल्या? तुम्ही त्याची काळजी घ्या प्रथम. 'तरुण भारत' शक्य तितक्या लवकर पुन्हा सुरू करतां आला पाहिजे आपल्याला—"

"तुम्ही प्रथम स्वतःची काळजी घ्या भाऊसाहेब! 'तरुण भारता'चा विचार मागाहून करूं—"

"नाहीं 'तरुण भारता'चा विचार प्रथम, दादा!—"

× × ×

सायंकाळीं ५च्या सुमारास डॉ. बालिंगे आले; व आमची रहाण्याची व्यवस्था असेंब्ली रेस्ट हौसमध्यें केली असल्याचें सांगून तेथें जाण्याच्या दृष्टीनें तयारी करण्याची सूचना त्यांनीं केली. ते म्हणाले—

"आतां इतक्यांत पोलिस लॉऱ्या येतील तुम्हांला न्यायला. स्वतः सिटी मॅजिस्ट्रेट श्री. चौबे हे बरोबर राहतील तुमच्या. प्रथम तुम्ही सर्वांनीं आमच्या बंगल्यावर यायचं; तिथं जेवणं उरकायची; न् नंतर मी पोंचवून देईन तुम्हालों रेस्ट हौसमध्यें. तुमच्या संरक्षणासाठीं तेथें भरपूर गार्ड्स ठेवतो आहे मी—"

त्यांनीं केलेली ही व्यवस्था ऐकून आम्हांला अतिशय समाधान झालें. कारण, राजेसाहेब जरी आम्हांला ठेवून घ्यावयाला तयार होते, तरी आमच्या राहण्यापासून त्यांना त्रास होण्याचा संभव आहे, हें स्पष्ट दिसत होतें. त्यामुळें आम्हांला साहजिकच एक प्रकारचा संकोच वाटूं लागला होता. म्हणून डॉ. बालिंगे यांचे मनःपूर्वक आभार मानून आम्हीं निघण्याच्या तयारीला लागलों.

ते गेल्यावर पंधरा मिनिटांच्या आंतच दोन लॉऱ्या आल्या; व सिटी मॅजिस्ट्रेट श्री. चौबे यांनीं आम्हाला लवकर निघण्याची सूचना केली प्रत्येक लॉरींत एक सबइन्स्पेक्टर आणि तीन सशस्त्र पोलिस होते. राजेसाहेब, राणीसाहेब, प्रमिलाराजे, काकासाहेब इंगळे प्रभृति मंडळीचा निरोप घेऊन आम्ही लॉरींत बसलों. भास्कर आणि मधु हेहि आमच्याबरोबर निघाले.

डॉ. बालिंगे यांच्या बंगल्यावर लॉऱ्या येतांच दादांनीं स्वतः पुढें येऊन आम्हांला मोठ्या अगत्यानें उतरवून घेतलें; व बंगल्याच्या उजव्या हाताला असलेल्या खोल्यांत सर्वांची बसण्याची व्यवस्था केली.

आम्ही अशा रीतीनें अत्यंत सुरक्षित स्थळीं येऊन दाखल झालों खरे; पण माझ्या मनाला यत्किंचित्‌हि स्वस्थता नव्हती. दादा आणि ताई हीं दोघें चिंच-भुवनला होतीं. तीं सुरक्षित असतील कीं त्यांच्यावरहि असाच कांहीं प्रसंग ओढवलेला असेल, या शंकेनें कालपासून त्रस्त झालेलें माझें मन मला चैन पडूं देईना. म्हणून डॉ. बालिंगे यांना मी म्हटलें—

" दादा, माझी एक विनंति आहे आपल्याला--"

" काय भाऊराव ? —"

" माझे श्वशुर विश्वनाथराव नवाथे हे सहकुटुंब चिंचभुवनला आहेत. कदाचित् तिथेंहि कांहीं गडबड झाली असेल. तेव्हां त्यांनाहि शक्य तर आतांच इथं घेऊन यावं अशी इच्छा आहे माझी --"

" एवढंच ना ? मी गाडी देतों तुम्हाला न् गार्डसुद्धि देतों बरोबर. तुम्ही घेऊन या त्यांना चिंचभुवनला जाऊन--"

आणि, 'महाराष्ट्र'चे श्री. ना. गो. ओगले यांची जी मोटर त्या वेळीं त्यांच्या बंगल्यावर ठेवलेली होती, ती त्यांनीं लगेच आमच्या स्वाधीन केली.

चंद्रशेखर, भास्कर, मधु आणि मी असे चौघे ताबडतोब चिंचभुवनला जाण्यासाठीं निघालो. सूर्य मावळण्याचा सुमार होता. त्यामुळें काळोख पडण्याच्या आंत तेथें पोचून त्यांना घेऊन येणें अवश्य होतें. पण मला स्वतःला मात्र तिथें जाण्याची इच्छा नव्हती. मला सारखें असें वाटे कीं, नागपूरसारखा हमला जर तिथें झाला असेल, तर बिचारे दादा आणि ताई कुठें गेलीं असतील ? राजे-साहेबांनीं मुद्दाम मोटर पाठवून मला सुरक्षित स्थळीं नेलें व शांताबाईला मधु आणि भास्कर यांनीं कोठीवानांच्या घरीं पोंचविलीं. तशी कोणती मदत त्या खेड्यावर त्यांना मिळण्याचा संभव आहे ? आणि त्यांना जर कोणत्याच प्रकारची मदत मिळाली नसेल, तर तीं दोघें आज कोणत्या परिस्थितींत असतील ? --

अशा नाना तऱ्हेच्या शंका मनांत येऊन मी खचल्यासारखा झालों होतों. म्हणून मी भास्करला म्हटलें-

" भास्कर, माझी कांही हिंमत होत नाहीं चिचभुवनला यायची. कुणाला ठाऊक तीं दोघें कोणत्या अवस्थेंत असतील! तुम्हीच जा न् शोध करून घेऊन या त्यांना. तोंपर्यंत वाटेंत भोसुल्यांच्या बंगल्यांत थांबतों मी—"

" तुम्ही कांहीं येण्याची गरज नाहीं, भाऊसाहेब. ते जिथं कुठं असतील, तिथून आम्ही घेऊन येऊं त्यांना. तुम्ही अगदीं निश्चित मनानें बसा भोसुल्यांकडे–"

मधु म्हणाला. मी वाटेंत भोसुल्यांकडे उतरलों आणि ते तिघे चिचभुवनला गेले.

श्री. बाबासाहेब भोसुले नेहमींप्रमाणें अंगणांत बसलेले होते. मला पहातांच त्यांना परमावधीचा आनंद झाला आणि त्यांनीं सौ. हिराबाईंना हाक मारून म्हटलें, " अग, हे भाऊराव आले आहेत. पाह्यलेस का?–"

तत्क्षणींच हिराबाई उत्सुकतेनें बाहेर आल्या आणि म्हणाल्या, " काय भलभलत्या बातम्या ऐकतो आहोंत तुम्हां नवराबायकोविषयीं आम्ही कालपासून! आजचा ' हितवाद ' पाह्यला, तेव्हा तुम्ही दोघं सुरक्षित आहांत असं वाचून हायसं वाटलं जिवाला. पण तुम्ही आलांत कसे भाऊराव, इथं या वेळीं ? "

" ओगल्यांच्या मोटारींतून—"

" पण तुम्ही राजेसाहेबांकडे आहांत ना ? न् मुलं कुठं आहेत ? "

" मुलं आमच्याबरोबरच आहेत, हिराबाई. आज संध्याकाळीं डॉ. बालिंगे यांनीं पोलिस लॉरींतून आम्हांला आपल्या बंगल्यांत नेलें; न् तेथून रात्रीं असेंब्ली रेस्ट हौसमध्यें नेऊन ठेवणार आहेत आम्हांला. दादांच्या बंगल्यावर पोंचल्याबरोबर मी त्यांना विनंति केली दादा ताईंना चिचभुवनहून आणण्यासाठीं मोटर देण्याबद्दल. कारण कालपासून सारखी काळजी वाटतेय मला त्यांचं काय झालं असेल याची— "

" काळजी अगदीं बरोबर आहे तुमची, भाऊराव. चिचभुवनमध्यें काल संध्याकाळींच लुटालूट झाली. आमच्या शेतावरला पोरगा पळून आला, त्यानं सांगितली सारी हकीकत. सगळं कांहीं जाळून अगदीं बेचिराख करून टाकलंय–"

" पण बाबासाहेब, दादा ताई कुठें आहेत याची कांहीं कल्पना आहे का तुम्हांला ? –"

" कोठून असणार ? त्या पोराला कांहींच सांगतां आलं नाहीं. बामणाच्या

शेतावर काम करणारा म्हणून त्यालहि मारपीट व्हायची. पण तो कुणबी म्हणून निसटून इथं आल्यामुळें आम्हांला कळलं तरी आमचा कोठा वगैरे जाळला गेल्याचं --"

" मधु, भास्कर न् चंद्रशेखर तिघं गेले आहेत आतांच मोटर घेऊन त्यांना आणायला चिचभुवनला. पण, माझ्या पोटांत धोंडा उठलाय खरोखरी हिराबाई, त्यांचं काय झालं असेल या कल्पनेनं ! दोघांचीं वयं झालेलीं. शेजारून झाला तर त्रासच व्हायचा उलट ! अशा स्थितींत हल्ला झाल्यावर कुठं गेलीं असतील तीं बिचारीं ? "

" खरं आहे तुमचं म्हणणं, भाऊराव ! तुमच्याबद्दल सुध्दां हीच भीति आम्हांला सारखी वाटत होती. शिर्सीकरांकडली काय बातमी आहे ? --"

हिराबाईंनीं विचारलें. त्यांचे बंधु प्रो. वसंतराव शिर्सीकर प्रभृति डॉ. बाबासाहेब शिर्सीकर यांचे पांचहि मुलगे राष्ट्रीय स्वयंसेवक संघांत असल्यामुळें त्या अतिशय काळजींत होत्या. वसंतरावांची पत्नी, श्री. रामभाऊ साखरदांडे यांची मुलगी लीला हीहि तेव्हां तिथेंच होती. संघस्थानावर हल्ला झाला, त्याच वेळीं शिर्सीकर बंधूंना पकडून नागपूर तुरुंगांत नेण्यांत आलें होतें. मला जी हकीकत माहित होती, ती सगळी मी भोसुले मंडळीला सांगितली.

तो सगळा वृत्तांत ऐकल्यावर हिराबाई म्हणाल्या, " कसं जगायचं बाई या परिस्थितींत माणसांनीं ? काल आमच्या बंगल्यावरसुध्दां इतके दगड आले संध्याकाळीं कीं, शहरांतल्या घरांसारखी आपलीहि गति होते कीं काय असं वाटत होतं सारखं आम्हांला --"

" अग, पण तूं भाऊरावांकडे पाहिलस का ? त्यांच्या चेहऱ्याकडे पाहून कोणाला तरी वाटेल का त्यांचं घर लुटलं जाऊन ते निराधार झाले आहेत असं ? नेहमींसारखे मजेनें बोलताहेत ! मला वाटतं, हेच कुणाचं तरी घर लुटून आले असावेत ! -- "

" काय बोलतां हो तुम्ही हें ? आतां काय ते कपाळाला हात लावून बसतील का घर लुटलं गेलं म्हणून ? यांतून पुढं कसा मार्ग काढायचा याचाच विचार करायला हवा आतां त्यांनीं. तुम्हांला आपली त्यांना पाहिल्याबरोबर थट्टा सुचते नेहमीं --"

" अहो हिराबाई, यांच्या या थट्टेमुळें विसर पडतो संकटाचा न् दुःखांतहि विरंगुळा वाटतो जिवाला ! नाहीं तर काल दुपारीं जो विध्वंस झाला, तो इतका भयंकर आहे कीं, शांताबाईची दशा पाहूनच तुम्हाला कल्पना येईल त्या संकटाची —"

" होना ! ऐकलं बाबा सगळं. अगदीं कांहीं कांहीं सुद्धां राह्यलं नाहीं ना घरांत ? 'हितवादां'त आलंच आहे सारं कांहीं. पण, तुम्ही दोघं सुखरूप आहांत, हेंच भाग्य समजतें मी. शांताबाईला का नाहीं आणलीत तुम्ही येतांना ? मीच उद्यां रेस्ट हौसमध्यें जाऊन घेऊन येईन तिला -- "

त्या बोलतां बोलतां एकदम थांबल्या आणि आवंढा गिळून म्हणाल्या—

" आधींच ती रुग्णाईत, अशक्त न् नाजूक ! ती खचून गेली असली या संकटानं तर नवल नाहीं. पण भाऊराव, तिला म्हणावं कांहीं काळजी करूं नकोस तूं. जशा आम्ही पांच बहिणी, तशी ती आमच्यांत सहावी. आज डॉ. गाडेकर रहात असते तळ्याच्या पाळीवर, तर शांतीवरहि नसता आला का हा प्रसंग ? जशी ती शांताबाई, तशीच ही शांताबाई ! तुम्ही सांगा तिला पुन्हा पहिल्यासारखं घर सजवून देऊं आम्ही तुमचं म्हणून—"

" भाऊराव आल्याबरोबर जें प्रथम बोलावयाला हवं होतं, तें तूं आतां इतक्या उशिरानं बोलते आहेस ! बायकांना डोकं कमी असतं म्हणतात तें कांहीं उगाच नाहीं !—"

" तुम्हाला कुणी नको म्हटलं होतं हें बोलायला ? पण भाऊरावांना पाहिल्यावर त्यांची चौकशी करण्याऐवजी थट्टा सुचली तुम्हांला—"

" पण हिराबाई, तुम्ही आतां एकदम हें भांडण थांबवा न् चहा द्या पहिल्यादां मला. तसंच पटवर्धनांनाहि शक्य असेल तर निरोप पाठवून बोलावून घ्या—"

" खरंच या सगळ्या गडबडींत तुम्हांला आल्याबरोबर चहा द्यायचा असतो हें अगदीं विसरून गेलें मी ! पण भाऊराव, तुम्ही आतां जेवूनच जा. जेवण तयार आहे अगदीं—"

" पण, हिराबाई, मला मुळींच भूक नाहीं. मी चहा घेणार आहे तो सुद्धां केवळ मनाला हुषारी वाटावी म्हणून. दादा-ताई सुखरूप परत

आलेलीं डोळ्यांनीं पाहिल्याशिवाय स्वस्थता वाटायची नाहीं जिवाला माझ्या—"

" खरं आहे तुमचं म्हणणं. थांबा, मी चहा आणतें हं—"

त्या आंत गेल्या. कांहीं क्षण आम्ही अगदीं स्तब्ध होतों. नंतर बाबासाहेबांनीं मला विचारलें—

" एक गोष्ट विचारूं तुम्हांला, भाऊराव ? मुख्य वस्तु बँकेंत होत्या का घरीं ?—"

" घरींच होत्या, बाबासाहेब ! लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं बँकेंतून जी दागिन्यांची पेटी आणली, ती पुन्हा ठेवली नाहीं तिथं. अशा प्रकारची लूट होईल हें स्वप्नांत तरी आलं होतं का कुणाच्या ? फार कशाला ? सोमवारीं शांताबाई न्हालेली असल्यामुळें तिनं कानांतलीं कुडी, हातांतलं रिस्टवॉच न् बिलवर हे सुद्धां काढून ठेवले होते कपाटांत ! —"

" म्हणजे सगळं कांहीं गेलं ?—"

" हो. असं म्हणायला हरकत नाहीं—"

बाबासाहेब यावर कांहीं बोलले नाहींत. ते स्तब्ध होते. इतक्यांत हिराबाईनीं चहा आणला आणि त्या म्हणाल्या—

" कां हो, गप्प का तुम्ही दोघे ?—"

" अग, बोलण्यासारखं कांहीं शिल्लक उरलेलं नाहीं म्हणून !—"

" म्हणजे ? मी समजलें नाहीं—"

" समजायला अवघड कांहीं नाहीं त्यांत. आपली जी कल्पना होती कीं, मुख्य वस्तु बँकेंत असल्याळें त्या लुटींतून बचावल्या असतील म्हणून, ती अजिबात चुकली. अगदीं अक्षरशः सर्वस्व गेलं ! शांताबाईचं रिस्टवॉचसुद्धां राहिलं नाहीं—"

" खरं भाऊराव ?—"

" हो. त्यामुळंच ती अगदीं खचून गेली आहे—"

" का नाहीं जाणार बाबा खचून ? आतां याच्यापुढं पैसा मिळवून त्याची भरपाई करणं शक्य आहे का या वयांत ? छे, छे, हें अगदीं भयंकर झालं कांहींतरी. अहो, तुम्ही येईपर्यंत आम्ही अशा भ्रमांत होतों भाऊराव, कीं

घर जरी सगळं लुटलं गेलं असलं, तरी मुख्य वस्तु बँकेंत ठेवलेल्या असल्या-मुळं त्या सुरक्षित असतील. पण दिवाळी नंतर तुम्ही लगेच बँकेंत परत पाठ-वतां ना पेटी नेहमीं ?—"

" नाहीं. आमची नेहमींची पद्धत अशी कीं, दिवाळीला पेटी आणायची न् संक्रांतीनंतर पुन्हा बँकेंत नेऊन ठेवायची. पण माझ्या ऑपरेशनमुळं तें थोडं लांबणीवर पडलं या खेपेला. त्या दिरंगाईचा परिणाम अखेर असा झाला—"

" पण तुम्हांला तरी काय कल्पना हो असं कांहीं पुढं होणार आहे म्हणून ?–"

हिराबाई पुन्हा थांबल्या. कांहीं क्षण आम्ही अगदीं स्तब्ध होतो. नंतर त्या उसासा टाकून उद्गारल्या—

" भाऊराव, तुम्ही खंबीर आहांत सगळं कांहीं सोसायला ! मला काळजी फक्त शांताबाईचीच वाटते. तुम्ही तिला न् मुलांना इथं पाठवा उद्यां. नको ! मीच सकाळीं येतें तिथें न् घेऊन येईन तिला माझ्या बरोबर ?—"

" पण या स्थितींत ती यायला तयार होणार नाहीं असं वाटतं मला—"

" नाहीं. माझ्या घरीं यायला नाहीं म्हणायची नाहीं ती–"

" अग, पण तूं वाद कशाला घालतेस भाऊरावांबरोबर ? उद्या सकाळीं जा न् घेऊन ये तिला इथं—"

आणि माझ्याकडे वळून बाबासाहेब म्हणाले—

" हें पहा भाऊराव, जें झालं तें झालं. त्याला कांहीं उपाय नाहीं आतां. हिनं तुम्हांला सांगितलंच आहे मघांशीं काय सांगायचं तें. आम्हांला जें शक्य होईल, तें सगळं आम्ही करूं—"

त्यांनीं अगदीं संथपणानें एक एक शब्द विचारपूर्वक उच्चारीत दिलेलें तें आश्वासन ऐकून माझें हृदय भरून आलें—

मला एकदम दहा वर्षांपूर्वीच्या त्या प्रसंगाची आठवण झाली—

१९३८ च्या उन्हाळयांत आम्हीं स्वतःचें घर बांधावयाचें ठरविलें. पण जवळ तर एक कपर्दिकहि नव्हती. म्हणून आम्ही दोघें बाबासाहेबांकडे गेलो आणि त्यांना आमची अडचण सांगितली. तेव्हां ते म्हणाले, " तुम्ही इंजिनियरकडून एस्टिमेट आणा. म्हणजे तेवढी रक्कम मी आमच्या कोऑपरेटिव्ह बँकेंत ठेवतों तुमच्या नावानं. तुम्ही लागतील तसतसे पैसे चेकनं द्यायचे इंजिनियरला.

म्हणजे आपोआपच हिशेब राहील दिलेल्या रकमांचा. घर बांधून झाल्यावर मग पाहतों मी रक्कम कशी फेडून घ्यायची तें—"

आणि, आम्हां दोघांवरील त्या दोघांच्या निरतिशय प्रेमामुळेंच खरोखरी, वर्षाच्या आंत आमचा ' शांतानिवास ' उभा राहिला.

आज दहा वर्षांनीं त्याचा विध्वंस झाल्यानंतरहि तो पूर्ववत् उभा करून द्याव-यालाहि तींच दोघें पुन्हा तत्परतेनें पुढें आलीं—

माझ्या सत्तेचाळिस वर्षांच्या आयुष्यांत जर कोणती एकच एक गोष्ट पुनः-पुन्हा माझ्या प्रत्ययाला आली असेल तर ती ही कीं, माझे मित्र हेंच माझें अव्याज आणि अक्षय धन आहे, कोणत्याहि हांकेला धावणारें माझें हुकमी भांडवल आहे—

माझी लेखणी ही माझी कामधेनु आणि माझे मित्र हे माझे कल्पवृक्ष ! मला काय कमी आहे या दुनियेंत ? आणि मग मी का भ्यावें कोणत्याहि आघा-ताला ?—

हे विचार माझ्या मनांत उचंबळून येत आहेत, तोंच श्री. ए. श्री. पटवर्धन यांनीं मला हांक मारली—

"काय भाऊसाहेब ? आम्ही वाचलं सगळं 'हितवादां'त—"

"तुम्ही जे वाचलं, तें सगळं खरं आहे, पटवर्धन. पण, मी जें आतां तुम्हाला मुद्दाम बोलावलं, तें एवढ्याचसाठीं कीं, ' तरुण भारता'चा विचार आतां आपण प्रथम केला पाहिजे—"

"हो. मीहि तोच विचार करतोय सारखा. पण, आतां तुम्हीं भेटलांत तेव्हां उद्यांपासून त्याच उद्योगाला लागायचं आपण—"

"यापुढं पहिला विचार तो ! शक्य तितक्या लवकर ' तरुण भारत ' सुरू करतां आला पाहिजे आपल्याला. आपण जिवंत आहोंत, इतक्या अमानुष आघातानेंहि आपण गारद झालों नाहींत, हें आपल्या शत्रूंना आणि मित्रांनाहि कळायला हवं तावडतोब ! आणि तें कळायचा मार्ग एकच आहे. तो म्हणजे ' तरुण भारत ' पुन्हा पूर्ववत् सुरू होणं—"

"मला जाणीव आहे या गोष्टीची. पण तुमची भेट होईपर्यंत कांहीं उपयोग नव्हता याबद्दल विचार करून. आतां उद्यांपासून त्याच्याच मार्गे लागूं. उद्यां मीं

वामनरावांना भेटतों न् त्यांना घेऊनच येतो तुमच्याकडे. तुम्ही असेंब्ली रेस्ट हौसमध्यें राहयला येणार ना आजपासून ? तशी कांहीं व्यवस्था होतेय असं सकाळींच कळलं मला आज. तिथंच भेटतों उद्यां आम्ही तुम्हाला—"

" ठीक. दादांचा आज दुपारीं फोन आला होता. त्यांनाहि हेंच सांगितलं मी कीं, आतां प्रथम ' तरुण भारता 'चा विचार ! ' तरुण भारत ' म्हणजेच आपण ! तो जर पुन्हा सुरू होऊं शकला नाहीं, तर आपण जिवंत असूनहि मरून गेलों असंच समजेन मी ! काय वाटेल तें नुकसान झालेलं असो, तरी ' तरुण भारत ' चालू केला पाहिजे पुन्हा ताबडतोब—"

" तुमचं म्हणणं मान्य आहे मला, भाऊसाहेब—"

श्री. पटवर्धन म्हणाले. तोंच मोटारीचा कर्णा वाजला. म्हणून मी धांवतच कटघराच्या दाराशीं गेलों. त्याबरोबर भास्करनें माझा हात पकडून धरून म्हटलें–

" भाऊसाहेब, दादा-ताईंना घेऊन आलों आम्ही—"

रस्त्यावरल्या अंधारांत मला मोटारींतील चेहरे नीट दिसत नव्हते. पण त्याचा तो उद्गार ऐकतांच मी उद्गारलों—

" शाबास पोरांनों ! काय दिवस दाखवला देवानं आज हा !— "

आणि माझ्या पाठोपाठ आलेल्या बाबासाहेबांना, हिराबाईंना आणि पटवर्धनांना मी म्हटलें—

" बाबा, आम्हीं जातों आतां. शांताबाई फार काळजींत असेल- "

" ठीक आहे. काय खुशाल आहांत ना, दादा ?—"

" हो — "

श्री. विश्वनाथराव नवाथे यांनीं त्यांना उत्तर दिलें आणि हिराबाईनीं मुद्दाम आमच्यासाठीं दिलेल्या कपड्यांचें गाठोडें आंत ठेवल्यावर मोटार चालू झाली.

मोटार सुरू होतांच मधु मला म्हणाला, " आम्ही शेतावर गेलों, तर तिथं सगळी जाळपोळ झालेली दिसली. कोणी कांहीं सांगेना. शेवटीं चौकशी करीत करीत स्टेशनवर गेलों. तिथं स्टेशनमास्तरनं प्रथम आम्हांला विचारून घेतलं आम्ही कोण आहोंत तें; न् नंतर सांगितलं दादा ताई आंत असल्याचं. आम्ही लगेच आंत गेलों. दादा पोथी वाचीत बसलेले होते. चंद्रशेखर समोर जाऊन उभा राहिला, तर त्यांच्या तोंडून शब्द फुटेना ! — "

" अरे, साहजिक आहे बाबा! आम्हांला शहरांतून आलेल्या लोकांनीं असं सांगितलं काल कीं, यांचे न् मिराचे हालहाल करून ठार मारण्यांत आलं यांना न् दोघा मुलांचाहि पण पत्ता नाहीं. तेव्हांपासून हे जे पोथी घेऊन बसले, ते उठणं होईना यांच्यानं जागचं —"

ताई म्हणाल्या. त्यांच्या आवाजांतला कणखरपणा नेहमींसारखा कायम होता. दादा मात्र अगदीं थकल्यासारखे दिसत होते. मी त्यांना विचारलें—

" आपल्या शेतावर केव्हां आला जमाव ? —"

" काल संध्याकाळीं ५॥ ला एकदम दीड दोनशें लोक गांधींचा जयजयकार करीत, ' खून का बदला खूनसे लेंगे ' अशा आरोळ्या ठोकीत, शेतांत घुसले. त्यांना येतांना पहातांच मी गुरं सोडून दिलीं गोठ्यांतलीं; बंदूक भुताड्यांत गुंढाळून घेतली; न् आम्ही नाल्यांत जाऊन लपून बसलों. तेथून घराची होळी झालेली डोळ्यांनीं पाहिली आम्ही आमच्या ! दुसऱ्या दिवशीं लपत छपत स्टेशनवर गेलों. आमच्या सुदैवानं स्टेशनमास्तर ब्राह्मण होता. त्यानं आश्रय दिला आम्हांला. पण शेजाऱ्यांनीं मात्र ढुंकूनहि बघितलं नाहीं आमच्याकडे— "

" न बघूं देत ! इतक्या सगळ्या प्राणांतिक संकटांतून निभावून आपण सर्व पुन्हा सुखरूप एकत्र परत आलों, यांत आनंद माना तुम्ही ! —"

" चंद्रशेखरला पाहिल्यावर तेंच मी म्हटलं यांना ! तुम्ही पुन्हा दृष्टीस पडाल अशी कांहीं आशा नव्हती आम्हांला— "

" पण दादा, तुम्ही कांहीं काळजी करूं नका. मी महिन्याच्या आंत पुन्हा पहिल्यासारखा उभा करीन संसार आपला— "

" त्याबद्दल खात्री आहे मला ! पण तुम्ही जिवंत आहांत कीं नाहींत हाच प्रश्न होता आमच्यापुढें— "

इतका वेळ गप्प असलेले दादा म्हणाले. त्यांचा आवाज खंगल्यासारखा येत होता.

आम्ही डॉ. बालिगे यांच्या बंगल्याच्या आवारांत येतांच दादा पुढें येऊन म्हणाले—

" या नवाथेसाहेब ! फार त्रास झाला आपल्याला— "

" हं ! चालायचंच. पण या सगळ्या त्रासांतून निभावून पुन्हा आम्ही सगळीं

सुखरूप एकत्र आलों हे सुदैव आहे. आपल्यासारख्यांच्या मदतीमुळेंच खरोखरी सुयोग आला हा— "

दादांनीं त्यांना उत्तर दिलें.

डॉ. बालिंगे आणि त्यांच्या सुशील पत्नी यांनीं आमची व्यवस्था उत्तम ठेवली होती; व त्यांचे धाकटे बंधु 'इन्किलाब' चे विद्वान् संपादक श्री. सुरेश बालिंगे हे आमच्या दिमतीला होते. त्यांच्या विनोदचतुर संभाषणामुळें आमचा वेळ आनंदांत गेला. पहिल्याच सलामीला त्यांनीं मला हटकलें—

" एका कादंबरीचें कच्चें साहित्य मिळालें तुम्हांला या प्रसंगामुळं नाहीं, भाऊसाहेब ? आम्ही आतां उत्सुकतेनं वाट पहात राहूं तुमच्या या घटनेवरील कादंबरीची ! — "

" खरं आहे राजाभाऊ, तुमचं म्हणणं. पण या प्रसंगावर कादंबरी लिहिण्याची गरजच नाहीं मुळीं ! शुक्रवारीं सायंकाळीं गांधीजींच्या खुनाची बातमी आल्यापासून आतांपर्यंत घडलेल्या साऱ्या गोष्टी न् संभाषणं हीं जरी जशींच्या तशींच लिहून काढलीं, तरी ती सुद्धां अत्यंत सुरस आणि बोधप्रद कथा होईल एक — "

" आणि तुम्ही उद्यांपासूनच तें काम हातीं घ्या ! नाहीं तरी 'तरुण भारता'-चा विध्वंस करून तुम्हाला बेमुदत सुटी दिलीच आहे तुमच्या आवडत्या बहुजनसमाजानं ! तिचं सार्थक होऊं द्या अशा रीतीनं— "

राजाभाऊ हंसत हंसत म्हणाले. त्यांच्या सहवासांत आमचें जेवण मजेंत पार पडलें; व आम्ही रात्रीं १० च्या सुमारास पोलिसांच्या पहाऱ्यांत रेस्ट हौसमध्यें जावयाला निघालों.

आमच्या पाठोपाठ डॉ. बालिंगेहि स्वतः तेथें आले; व त्यांनीं आमची कशी काय सोय झाली आहे हें पाहून सशस्त्र पहाऱ्याचा बंदोबस्त आपल्या समक्ष केला.

ते गेल्यावर आम्ही आपल्या खोलींत येऊन बसलों. आतां सर्वांचीं मनें अगदीं निश्चिंत झालीं होतीं खरीं; पण, सुरक्षिततेबद्दलची ती एक मुख्य चिंता दूर होतांच, आतांपर्यंत तिच्या दडपणाखालीं दबून गेलेल्या इतर साऱ्या

काळज्या वर उसळून मनाला डंख करूं लागल्या. आणि शांताबाई मला म्हणाली—

"गेल्या रविवारीं सकाळीं जर मला कुणी सांगितलं असतं कीं, तुम्ही निर्वासित होऊन मंगळवारीं रात्रीं या रेस्ट हौसमध्यें सरकारच्या आश्रयाला येऊन रहाल म्हणून, तर मी वेड्यांत काढलं असतं त्याला— "

" पण या स्थितींतहि एका गोष्टीची गंमत वाटली पाहिजे तुला, शांताबाई—"

" कशाची ?— "

" आपल्यासारख्या काँग्रेसबाहेर असलेल्या माणसांना जन्मांत कधीं एम्. एल्. ए. होण्याची संधि मिळणार नाहीं या पक्षनिष्ठ राजकारणाच्या वशिलेबाजींत. त्या आपल्याला या एम्. एल्. ए. च्या निवासस्थानीं रुबाबांत राहण्याचा योग या प्रसंगामुळं आला हें आपलं केवढं नशीब !—"

आम्ही रेस्ट हौसमध्यें रहावयाला आल्याची बातमी बुधवार ता. ४ च्या दैनिकांतून प्रसिद्ध झाली. त्याबरोबर नाना प्रकारचे लोक आमच्या समाचाराला येऊं लागले. बुधवारीं सकाळीं आमचें चहापान संपतें न संपतें, तोंच अन्नमंत्री ना. रा. कृ. पाटील आले. त्यांनीं नमस्कार करतांच मी त्यांना हंसून म्हटलें—

" दादा, आम्ही आतां आपल्या राजाश्रयाला आलों आहोंत— "

त्यावर ते पुन्हा हात जोडून उद्गारले—

" तुम्ही काय म्हणाल तें थोडें आहे, भाऊराव !— "

त्यांच्या पाठोपाठच सौ. अनसूयाबाई आणि श्री. पु. बा काळे, नागपूर प्रांतिक कांग्रेसचे अध्यक्ष श्री. पुनमचंदजी राका आणि उपाध्यक्ष श्री. बजरंग ठेकेदार, श्री. खुशालचंद प्रभृति मंडळी आली. सौ. अनसूयाबाईंची आम्हां दोघांवर वडील बहिणीप्रमाणें माया आहे. त्यांनीं प्रथम आमच्या गरजांची चौकशी केली; व घरीं गेल्याबरोबर कपडे, भांडीं वगैरे जरूरीचें सामान पाठवून दिलें. सौ. हिराबाई भोसुले यांनीं आदल्या दिवशीं बरेचसे कपडे माझ्याबरोबर दिले होते. आतां हें आणखी नवें सामान आल्यामुळें कोणत्याच वस्तूची ददात फारशी उरली नाहीं. दिवसभर समाचारासाठीं येणाऱ्या या मंडळींबरोबर महात्माजींचा खून आणि त्या निमित्तानें साऱ्या महाराष्ट्रभर झालेली जाळपोळ

यांच्यासंबंधीं चर्चा चालत असे. विशेषतः, नागपुरांतील कांहीं हिंदी आणि मराठी वृत्तपत्रांतून गोडसे हे नागपूर, वर्धा, उमरेड, अकोला वगैरे ठिकाणीं येऊन गेल्याच्या आणि त्यांचा त्या त्या ठिकाणीं महासभा किंवा संघ यांच्यातर्फे सत्कार झाल्याच्या धादांत खोट्या भडक बातम्या त्या वेळीं दुष्ट बुद्धीनें सारख्या धडाकून प्रसिद्ध केल्या जात होत्या. त्या सहेतुक अनृत प्रचारामुळें या चर्चेला रोज नवी चालना मिळे; व केव्हां केव्हां त्यांतून विनोदहि उत्पन्न होत असे.

उमरेड येथील पब्लिक हायस्कूलच्या स्नेहसंमेलनाचे अध्यक्ष म्हणून येथील हिस्लॉप कॉलेजांतील मराठीचे विद्वान् प्राध्यापक प्रो. डॉ. शं. दा. पेंडसे हे तेथें गेले होते. श्री. गोपाळराव पाठक यांचे बंधु फोटोग्राफर श्री. बाबुराव पाठक यांच्याबरोबर त्यांच्या मोटारींतून ते उमरेडला गेले; व स्नेहसंमेलनानंतर नेहमींप्रमाणें फोटो काढण्याचा विधिहि झाला.

पण, नागपूरच्या हिंदी दैनिकांनीं प्रो डॉ. 'पेंडसे' यांच्याऐवजीं 'गोडसे' हेच श्री. पाठक यांच्या मोटारींतून तेथें गेले, अशी निखालस खोटी बातमी प्रसिद्ध केली. या त्यांच्या प्रचाराचें पर्यवसान त्या हायस्कूलवर हल्ला आणि पाठकांच्या फोटोग्राफीच्या दुकानाची झडती होण्यांत झालें; व प्रो. डॉ. पेंडसे यांनाहि मनस्ताप झाला.

या प्रकरणाविषयीं बोलतांना आमच्या समाचाराला सहकुटुंब आलेले आमचे जुने स्नेही प्रो. ना. के बेहरे म्हणाले, "अहो, 'पेंडसे' आणि 'गोडसे' या दोन नांवांत 'डसे' हीं अक्षरें 'कॉमन' आहेत ना ? तीं अक्षरें 'डसलीं' सगळयांना '— "

गोडसे यांच्याविषयीं लिहितांना इथल्या एका इंग्रजी साप्ताहिकानें 'चित्पावन ब्राह्मण' असा त्यांचा निर्देश करून त्यांपैकीं 'चित्पावन' हा शब्द इटॅलिक्समध्यें छापला होता. या गोष्टीचा उल्लेख करून प्रो. बेहरे म्हणाले, "गोडसे 'चित्पावन' आहेत असं प्रसिद्ध केल्यानं आपल्यासारख्या कऱ्हाडा ब्राह्मणाची कातडी त्यामुळें बचावेल, असं या इंग्रजी साप्ताहिकाच्या संपादकाला वाटलं असावं ! पण, ब्राह्मणेतर ब्राह्मणांविषयीं विचार करतांना त्यांची पोटजात पहात नाहींत, हें कांहीं त्याच्या लक्षांत आलं नाहीं. चित्पावनांत जसा गोडसे निघाला, तसेच महात्माजींचे केवळ बहिश्चर हृदय आणि अपर आत्मा

असे आचार्य विनोबाजी भावेहि निघाले, हें हा कऱ्हाडा ब्राह्मण गोडश्यांच्या पोटजातीकडे बोट दाखवतांना विसरलेला दिसतो !—"

पण, या संभाषणानंतर तीन चार दिवसांनींच गोडसे यांनीं रचलेल्या गांधीजींच्या खुनाच्या कटांत त्यांचे मुख्य साथीदार असल्याबद्दल करकरे नांवाच्या कऱ्हाडा ब्राह्मणाला अटक झाल्याची बातमी आली !

याच इंग्रजी साप्ताहिकानें, गांधीवादी काँग्रेसनिष्ठ ब्राह्मणांचें इतर ब्राह्मणांपेक्षां असलेलें वेगळें वैशिष्टय प्रदर्शित करण्यासाठीं, 'गांधियन ब्राह्मण' हा एक नवाच शब्दप्रयोग प्रचारांत आणण्याचा प्रयत्न केला. या त्याच्या शक्कलीसंबंधीं बोलतांना वीर हरकरे म्हणाले—

"ब्राह्मणांत अनेक पोटजाती आहेत. त्यांत 'गांधियन ब्राह्मण' या आणखी एका नव्या पोटजातीची भर पडली आतां ! पण ब्राह्मणामागें 'गांधियन' हें विशेषण लावल्यानेंहि त्याची चामडी किंवा जिंदगी बचावेल असं समजण्याचं मात्र मुळींच कारण नाहीं ! गांधीजींच्या नांवाचा अशा रीतीनं उपयोग करून ब्राह्मणांनीं आपला बचाव करण्यांत पौरुष तर नाहींच पण मुत्सद्दीपणाहि नाहीं. त्यापेक्षां 'मी ब्राह्मण आहे' असं छातीठोकपणानं जाहीर करून त्याच्या सगळ्या परिणामांना तोंड देण्यांतच सचाई आणि मर्दपणा आहे—"

त्याच दिवशीं आमच्या समाचाराला आलेले एक देशस्थ ब्राह्मण काँग्रेस कार्यकर्ते गोडश्यांसंबंधीं बोलतांना एकदम उद्गारले—

"ही चित्पावनांची जात सापासारखी आहे असं नाहीं वाटत भाऊसाहेब, तुम्हांला ? गोडश्यानं आपल्या दुष्ट कृत्यानं सगळ्या महाराष्ट्राच्या तोंडाला काळं फासलं. चित्पावनाशिवाय असलं क्रूर कृत्य दुसऱ्या कोणत्याहि जातीच्या ब्राम्हणाकडून घडलं नसतं —"

"मी स्वत: चित्पावन नसल्यामुळं चित्पावनांच्या नालस्तींत सामील होईन अशा अपेक्षेनं बोलताहांत कां तुम्ही हें ? गोडश्यांचं कृत्य अत्यंत हिडिस आहे, याबद्दल शंकाच नाहीं. पण, त्यांच्या या अघोर कर्माबद्दल सगळ्या चित्पावनांना जबाबदार धरून आपण जर त्यांना साप म्हणत असाल, तर मीहि एक गोष्ट आपल्याला निदान कऱ्हाडा ब्राम्हणांबद्दल तरी सांगू शकेन. ती ही कीं, चित्पावनाला ज्याप्रमाणं 'कोब्रा' म्हणून निंदलं जातं, त्याचप्रमाणं आम्हां

कऱ्हाड्यांनाहि ‘ कर्कोटक ’ म्हणून निंदणारे लोक आहेत. जगांतली कोणतीहि जात अशा प्रकारच्या भरमसाट नालस्तींतून सुटणार नाहीं. ब्राम्हणांत जसा बाळाजीपंत नातू झाला, तसा मराठ्यांतही सूर्याजी पिसाळ झाला, हें विसरूं नका. फार कशाला, ज्या शिवाजीमहाराजांना आपण महाराष्ट्राचे जनक म्हणून इतके पूज्य मानतों, त्या राष्ट्रपित्याच्या प्रत्यक्ष पुत्रानं राज्यलोभापायीं औरंगजेबाला फितूर होऊन त्यांच्याविरुद्ध बंड केलं! व त्यांच्या मरणानतंर त्यांच्या वेळच्या विश्वासू कर्तबगार मुत्सद्यांना हाल हाल करून ठार मारलं!! शौर्य आणि क्रौर्य यांच्यांतला फरक फारच सूक्ष्म आहे. सत्ता आणि संपत्ति यांच्या लोभानं माणसं कोणतं पाप करतील, याचा कांहीं नेम नाहीं. चित्पावनांना साप ठरवतांना तुम्हांला फक्त गोडसे दिसले. रानडे, टिळक आणि गोखले यांची आठवण कांहीं झाली नाहीं. हा चित्पावन, हा सारस्वत, हा माध्यंदिन, हा देशस्थ, हा कऱ्हाडा असल्या बारीक सारीक फरकांच्या चिरफळ्या तुम्ही ब्राह्मण आपसांत खुशाल काढीत बसा. पण ब्राह्मणेतरांच्या दृष्टीनं मात्र आपण सारे ब्राह्मण सारखेच आहोंत— ”

समाचाराला आलेल्या या मंडळींत गोडश्यांच्या कृत्यामागें असलेल्या मनोवृत्तीचें समर्थन करणारेहि कांहीं लोक निघाले; व त्यांत ब्राम्हणापासून महारापर्यंत सर्व जातींचे सज्जन होते. त्यांचा युक्तिवाद असा कीं, स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपलें अवतारकार्य आतां संपलें असल्याच्या जाणिवेनें गांधीजींनीं आपण होऊन राजकारणांतून निवृत्त व्हावयाला हवें होतें पण, तसें न करतां दिल्लीला तळ देऊन हिंद सरकारवर हर एक बाबतींत दडपण आणण्याचा जो अतिप्रसंग त्यांनीं केला त्यांमुळें त्यांच्यावर गोडश्यांच्या गोळीला बळी पडण्याची पाळी आली. शेडयूल्ड कास्ट्स फेडरेशनचे एक तरुण कार्यकर्ते जळफळतच मला म्हणाले—

“ गांधीजी हिमालयांत जाण्याची भाषा शेवटपर्यंत बोलत राहिले; पण हिमालयांत गेले मात्र नाहींत कधीं! उलट हिमालयाएवढ्या चुका करीत अखेरपर्यंत राजकारणांत लुडबुडत राह्यले. लोक त्यांना ‘राष्ट्रपिता’ खुशाल म्हणोत. पण मी तरी त्यांना ‘फाळणीचा पिता’ म्हणेन! त्यांची मनोवृत्ति अगदीं हिटलरसारखी फासिस्ट होती.आमच्या बाबासाहेबांनीं जेव्हां हिंदुस्थानाची फाळणी अपरिहार्य आहे असं दहा वर्षांपूर्वी जाहीर केलं, तेव्हां या सगळ्या कॉंग्रेसवाल्यांनीं

त्यांची देशद्रोही म्हणून नालस्ती केली. पण, माऊंटबॅटननं फाळणीची योजना पुढं मांडतांच सत्तेसाठीं हपापलेल्या कांग्रेसश्रेष्ठींनीं तिला बिनदिक्कत संमति दिली. फाळणीसारख्या प्राणांतिक प्रश्नाचा विचार करण्यासाठीं लोकमताचा कौल घेण्याची तर राहोच, पण अखिल भारतीय कॉंग्रेस कमिटीचेंहि मत अजमावण्याची गरज त्यांना भासली नाहीं! तुम्हां ब्राह्मणांचं ' अहं ब्रह्मास्मि ' आहे ना, तसं गांधीजींचं ' अहं भारतोऽस्मि ' होऊन बसलं होतं! त्यांच्या या अति-मानुष अहंकारानं हिंदुस्थानाचा आणि अखेर त्यांचाहि स्वतःचा नाश केला असं म्हणेन मी! गोडसे हा केवळ निमित्तमात्र झाला त्यांच्या मृत्यूला—"

" आतां गांधीजी गेल्यावरसुद्धां वाईट बोलत रहाणार का तुम्ही त्यांच्या-विषयीं?—"

" अहो, वाईट हें केव्हांहि वाईटच! ज्यांच्या हिमालयाएवढ्या अहंकारी चुकांमुळं राष्ट्राचे तुकडे पडले, त्यांच्याबद्दल इतिहास तरी काय म्हणेल पुढें?–"

" इतिहास काय म्हणेल हें कोणी पाह्यलंय? पण, मी मात्र गांधीजींना यशस्वी समजत नाहीं; दुर्दैवी समजतों. त्यांनीं अखंड हिंदुस्थानाचा ध्यास घेतला; पण त्यांना हिंदुस्थानाचीं खांडोळीं झालेलीं अखेर पहावीं लागलीं. त्यांनीं हिंदु-मुस्लिम ऐक्यासाठीं अनेकदां प्राण पणाला लावले; पण पाकिस्तान पैदा झालेलें पहाण्याचा प्रसंग अखेर त्यांच्यावर आला. अस्पृश्यांच्या उद्धारा-साठीं त्यांनीं आपल्या हातांची अक्षरशः झोळी केली; पण आपल्यावर अस्पृश्यांचा विश्वास नसल्याचा कटुतम अनुभव अखेर त्यांना आला. महायुद्ध सुरू होतांच पहिल्या सपाट्याला त्यांनीं आपली युद्धविरोधी भूमिका जाहीर केली; पण जपानवर अमानुष अणवस्त्र सोडण्याच्या बेतांत असलेल्या ब्रिटिश सरकारला युद्धसहकार्याचे वचन देऊन त्यांना अखेर समेट करावा लागला! सत्य आणि अहिंसा यांच्या पायावर मानवी जीवनाची पुनर्घटना करण्याची ईर्ष्या त्यांनीं धरली; पण खुद्द आपल्या मायदेशांतच असत्य आणि हिंसा यांचा हैदोस चालू असलेला पहात त्यांना मरावें लागलें!! त्यांचा वैयक्तिक जीवनाचा आदर्श ' उञ्छवृत्ति ' हा होता आणि सामाजिक जीवनाचा आदर्श ' अराज्य ' हा होता. पण प्रत्यक्ष घडलें काय? त्यांची सगळी हयात हिंदी भांडवलवाल्यांच्या ओंजळीनें पाणी पिण्यांत गेली; व त्या भांडवलवाल्यांच्या

सल्ल्यानुसार आपलें सारें वजन खर्ची घालून, मृत्यूच्या महिनाभर आधीं, अन्नवस्त्रांवरील नियंत्रणें उठविण्याचें जें कृत्य त्यांनीं केलें, त्यामुळें हिंदी जनता महायुद्धाच्या भयानक काळांतहि नव्हे इतकी विलक्षण नागवली जाऊन, हिंदी भांडवलवाल्यांना क्रोडों रुपयांचा नफा उकळतां आला! दक्षिण आफ्रिकेंतील सत्याग्रहापासून तों हिंदुस्थानांतील कायदेभंगापर्यंत त्यांच्या साऱ्या चळवळींचें जर सत्यान्वेषणाच्या दृष्टीनं पृथक्करण केलं, तर असा दुःखद चमत्कार पावलों-पावलीं दिसून येतो कीं, हर एक नैतिक, तात्विक आणि राजकीय लढ्यांत त्यांना अखेर तत्वच्युति पदरांत घेऊन पराभूत व्हावें लागलें. त्यांची बुद्धाशीं जी दुष्काळदां तुलना केली जाते, ती मलाहि समर्पक वाटते अतिशय. बुद्धाचं सगळं आयुष्य अहिंसेचे पाठ जगाला देण्यांत गेलं. पण त्याला मरण आलें, तें डुकराचें मांस खाऊन अतिसार झाल्यामुळं! आणि त्याच्या अनुयायांना आहाराच्या बाबतींत कांहींहि निषिद्ध किंवा अवध्य नसल्याचें आपण आज पहातच आहोंत. तसंच गांधीजींचंहि झालेलं नाहीं काय? त्यांचे अनुयायी म्हणविणाऱ्या कॉंग्रेसजनांना सत्तेसाठीं कोणताहि अत्याचार करावयाला दिक्कत वाटत नाहीं. सॉक्रेटिस आणि ख्रिस्त यांनीं स्वेच्छेनें मरण पत्करलें. पण त्यांचें जीवन तत्वच्युतीनं कुठंहि डागळलेलं दिसणार नाहीं. उलट तत्वासाठीं पूर्ण जाणिवेनं त्यांनीं आपला देह आपल्या हातांनीं जनतेच्या क्रोधानलांत हवन केला. तसं गांधीजींविषयीं म्हणतां येईल का? त्यांची विभूति हिमालया-सारखी विशाल आणि त्यांचे प्रमादहि हिमालयासारखे प्रचंड! त्या प्रमादांचा परिपाक म्हणूनच कीं काय, ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं जें स्वातंत्र्य हिंदुस्थानाला प्राप्त झालं, तें त्याची चिरफाड करीत, प्रेतांच्या राशींतून आणि रक्ताच्या पाटांतून वाट काढीत, यादवींची कराल शापवाणी कडाडत आलं! उतावळ्या विनतेनं अपुऱ्या दिवसांच्या पांगळ्या अरुणाला ज्या वेळीं जबरदस्तीनं जन्म दिला, त्या वेळीं तिच्या मनाला तो आपला तेजस्वी पण पंगु पुत्र पाहून झालं नसेल, इतकं दारुण दुःख गांधीजींच्या मनाला स्वातंत्र्याची ती शापित कळा पाहून झालं असल्यास नवल नाहीं! म्हणून मी त्यांना दुर्दैवी समजतों. आपल्या सगळ्या आकांक्षा आणि सगळं कार्य डोळ्यांदेखत विफल झालेलं पहाण्याचा प्रसंग यावा, यापरतं दुसरं दुर्भाग्य तें कोणतं?—"

× × ×

माणसाची पारख संकटाच्या वेळीं होते म्हणतात. त्याचाहि वैचित्र्यपूर्ण अनुभव या प्रसंगांत आम्हांला आला. मानवी मनोवृत्तीचे इतके बरेवाईट मासले आम्हांला रेस्टहौसमधील आमच्या चवदा दिवसांच्या वनवासांत पहावयाला मिळाले कीं, त्यामुळें मानवी स्वभावाची अनाकलनीयता जशी आमच्या मनावर बिंबली, तसाच मनुष्याच्या मूलभूत सौहार्दावरील आमचा मध्यंतरी डळमळीत झालेला विश्वासहि दृढावला.

कारण वाईटापेक्षां चांगलेच अनुभव एकंदरींत जास्त आले. पण, जे एक दोनच वाईट अनुभव आले, त्यांचा मनावर बसलेला घाव मात्र कधीं बुजून जाणार नाहीं. विशेषतः, ज्या एका व्यक्तीविषयीं, तिच्या अनेक विलोभनीय गुणविशेषांमुळें, मला गेली चोवीस वर्षे पराकाष्ठेचें प्रेम आणि आदर वाटत आलेला आहे, त्या व्यक्तीचें आमच्यावरील या आपत्प्रसंगांत जें चमत्कारिक वर्तन झालें, ते मी कधीं विसरणार नाहीं. एका सुभाषितकारानें असें म्हटलें आहे कीं, चंद्राच्या किरणांतून ज्या दिवशीं अमृतबिंदूंऐवजी अग्नीचे स्फुलिंग पडतील, त्या दिवशीं जगांतलें सगळें सौजन्य संपलें, असेंच मी समजेन. मला प्रिय असलेल्या त्या व्यक्तीचें आमच्यावर ओढवलेल्या प्राणांतिक संकटाविषयींचें परिहासविजल्पित जेव्हां माझ्या कानावर आलें, तेव्हां या सुभाषिताची आठवण होऊन माझ्या मनाला अतिशय वेदना झाल्या.

ती व्यक्ति म्हणजे आचार्य दादा धर्माधिकारी.

१९२४ च्या सप्टेंबरमध्यें नागपुरांत आल्यावर पहिल्या सहा महिन्यांत ज्या थोड्या व्यक्तींशीं माझा गाढ स्नेह झाला, त्यांपैकीं दादा हे एक; व गांधीवादासंबंधीच्या तीव्र मतभेदामुळेंहि त्या स्नेहांत, निदान माझ्या बाजूनें तरी, कधीं अंतर पडलें नाहीं. त्यामुळें, माझी साहजिकच अशी अपेक्षा होती कीं, स्नेही म्हणून आणि गांधीवादी म्हणूनही आमच्यावरील या आपत्काळांत दादांची वृत्ति आमच्याविषयीं सहृदयतेची राहील.

पण, ता. ४ रोजीं श्री. दादा वाचासुंदर हे मला भेटावयाला आले असतां त्यांनीं ता. ३ रोजीं दुपारीं ३ च्या सुमारास ' महाराष्ट्र'चे श्री. ना. गो. ओगले यांच्या घरीं आचार्यांशीं झालेल्या आपल्या संभाषणाचा जो वृत्तांत सांगितला, तो ऐकून माझें मन पराकाष्ठेचें कष्टी झालें.

अन्नमंत्री ना. पाटील यांच्यासह आचार्य श्री. ओगले यांच्याकडे आलेले होते. तेथें दादांना पहातांच त्यांनीं विचारलें, " का हो, 'तरुण भारता'चं नुकसान कितपत झालं ? — "

" काल आणि आज मिळून बहुतेक सर्व प्रेसची मोडतोड आणि जाळपोळ झालेली आहे. जें थोडं सामान आवारांत किंवा रस्त्यावर पडलेलं आहे, तेंहि लोक गोळा करून नेताहेत ! — "

त्यावर आचार्य उद्गारले, " तुमच्या 'तरुण भारतां'चा विध्वंस झाल्याबद्दल मला वाईट वाटत नाहीं — "

दादांना त्यांचा तो उद्गार साहजिकच लागला. म्हणून ते म्हणाले, " तुम्हीं विनोदानं जरी कदाचित् हें बोलत असलांत, तरीसुद्धां माझ्यासमोर हें बोलायला नको होतं दादा, आज तुम्ही ! माझ्या भावना या बाबतींत काय असतील हें तुम्ही लक्षांत घ्यायला हवं होतं— "

पण आचार्यांनीं पुनःपुन्हा हा ' विनोद ' केला, असें नंतर माझ्या ऐकिवांत आलें.

" भाऊरावांचं घर लुटल्याबद्दल वाईट वाटतं मला. पण ' तरुण भारता ' बद्दल मात्र कांहीं वाटत नाहीं ! "-असे उद्गार त्यांनीं आपल्या समक्ष काढल्याचें अनेक कार्यकर्त्यांनीं मला सांगितलें.

आचार्यांच्या अभिजात विनोदाचाच कदाचित् हा एक प्रकार असेल, असेंच मीहि मानून चालतों. पण, मनुष्य विनोदानें म्हणूनहि जें कांहीं बोलतो, त्यांतसुद्धां त्याच्या त्या त्या विषयासंबंधींच्या भावनेची छटा प्रतिबिंबित झालेली नसते कां ? 'तरुण भारता'च्या विध्वंसासंबंधीं आचार्यांनीं वारंवार केलेला हा 'विनोद' अहिंसेच्या तर राहोच, पण ज्या मानवतेचा उद्घोष ते आपल्या प्रत्येक व्याख्यानांतून इतक्या कंठरवानें करित असतात, तिच्या कोणत्या कल्पनेला धरून आहे किंवा मानवी सभ्यतेच्या तरी कोणत्या संकेताशीं सुसंगत आहे ? 'तरुण भारता'चा विध्वंस हा काय विनोदाचा विषय वाटावा त्यांच्यासारख्या 'सत्य, अहिंसा आणि मानवता' यांच्या पुजाऱ्याला ?—

पण वाटला खरा ! —

उलट, मला मात्र सारखें असें वाटत होतें कीं, कोणी तरी मला येऊन म्हणेल, " दादा असं कसं बोलतील हो तुमच्या ' तरुण भारता ' विषयीं, भाऊराव ?

कोणी तरी गैरसमज करून दिलाय् तुमचा!" आणि आमच्या इतक्या वर्षांच्या मधुर स्नेहसंबंधांत उत्पन्न झालेला किन्तु दूर होऊन जाईल.

पण असें सांगणारा एकहि मित्र मला अद्याप भेटलेला नाहीं.

आणि, आश्चर्याची गोष्ट अशी कीं, स्वतः दादाहि त्या बाबतींत मुग्ध आहेत.

× × ×

पण सुदैवानें असले प्रसंग अपवाद म्हणूनच उल्लेखावे लागतील. उलट, आम्ही संकटांत आहोंत असें कळल्यावर मानवी सहृदयता इतक्या विविधतेनें आमच्या सहाय्याला धांवली कीं, तिच्या त्या निरपेक्ष सौजन्यानें आमच्या उध्वस्त जीवनांत नवा उत्साह उत्पन्न केला. रेस्ट हौसमध्यें फक्त अंगावरल्या कपड्यांसह आम्ही येऊन दाखल झाल्याचें कळतांच सौ. हिराबाई आणि श्री. बाबासाहेब भोसुले व सौ. अनसूयाबाई आणि श्री. पु. ब. काळे यांनीं इतक्या तत्परतेनें निरनिराळ्या प्रकारचें सामान आमच्यासाठीं पाठविलें कीं, त्या निर्वासनांतहि आम्हांला कांहीं कमी पडलें नाहीं. त्याचप्रमाणें, श्रीमंत गणपतराव बुटी, श्रीमंत बाबुराव देशमुख, श्री. खुशालचंद, श्री. दिगंबरपंत ओगले, श्री. बाळासाहेब ढवळे, श्री. नाना जोग, श्री. नाना ओगले प्रभृति सुहृदांनीं भरल्या हातांनीं आमच्या भेटीला येऊन आमचा ढासळलेला संसार सावरण्याची तयारी दर्शविली.

पण, रेस्ट हौसमध्यें येतांनाच मी मनाशीं असा निर्धार केला होता कीं, स्वतःसाठीं कोणाहिपासून आर्थिक सहाय्य म्हणून घ्यावयाचें नाहीं. 'तरुण भारता'साठीं जर कोणी काहीं दिलें, तर त्याचा तेवढा स्वीकार करावयाचा. त्यामुळें, श्रीमंत गणपतराव बुटी यांनीं जेव्हां, ता ४ रोजीं माझ्या भेटीला आले असतां, वर्षभर पुरेल एवढें धान्य, कपडालत्ता, घरदुरुस्तीसाठीं लागणारी रक्कम वगैरे देण्याची इच्छा दर्शविली, तेव्हां मी त्यांना म्हटलें—

"भय्यासाहेब, मला स्वतःसाठीं कांहीं नको. धान्य नको, कपडा नको किंवा पैसाहि नको. पण माझी एक विनंति आहे त्याबरोबरच आपल्याला—"

"बोला, भाऊसाहेब—"

"विनंति एवढीच कीं, 'तरुण भारता'साठीं जेव्हां मी आपल्याकडे येईन, तेव्हां मात्र मी मागेन तें आपण दिलं पाहिजे मला—"

" देईन.आपण काळजी करूं नका, भाऊसाहेब. या वेळीं जर आम्ही आपल्या उपयोगी पडायचं नाहीं, तर केव्हां पडायचं मग? पण आपण स्वतःसाठीं खरोखरीच कांहीं घेणार नाहीं माझ्यापासून? धान्यसुद्धां नाहीं घेणार?— "

" नाहीं, भय्यासाहेब. आपण माफ करा मला. आपण इतक्या कळकळीनं विचारावं न् मी नाहीं म्हणावं याचं मलाहि वाईट वाटतं. पण मी कुणापासूनच कांहीं घ्यायचं नाहीं असं ठरवलंय— "

" पण, भाऊसाहेब, असं करून कसं चालेल? जिथं पहिल्यापासून आतां संसाराला प्रारंभ करायचाय पुन्हा, तिथं आपण नको म्हणून कसं निभेल?— "

" निभेल अशी आशा आहे मला. माझ्या पुस्तकांचं पुनरावृत्त (recurring ) उत्पन्न आहे. त्याच्या जोरावर मी उभा राहूं शकेन पुन्हा आपल्या पायांवर. पण 'तरुण भारता'साठीं मात्र मी मागेन तें दिलं पाहिजे आपण मला-"

" देईन, भाऊसाहेब— "

आणि हें आपलें आश्वासन गणपतरावजींनीं पुढें खरें करून दाखविलें.

उलट, व्यक्तिशः आर्थिक मदत घेण्याच्या बाबतींत त्यांना जो नकार मी दिला, तो मात्र मला पुढें चार दिवसांनीं निरुपायानें मोडावा लागला.

कारण, श्रीमंत बाबुरावजी देशमुख यांनीं माझ्यासाठीं पाठविलेले पांचशें रुपये घेऊन वीर हरकरे जेव्हां माझ्या भेटीला आले, तेव्हां त्यांना नकार देणें मला शक्य झालें नाहीं.

बाबुरावजींचा आणि माझा गेलीं वीस वर्षें सतत संबंध आहे. वीस वर्षांच्या या कालावधींत निरनिराळया सार्वजनिक कामांसाठी मी हजारों रुपये त्यांच्यापासून घेतलेले आहेत. मी मागावें आणि बाबुरावजींनीं द्यावें, असा जणूं संकेतच ठरून गेल्यासारखा झाला आहे. त्यामुळें आमच्या मित्रमंडळींत आम्ही त्यांना विनोदानें ' कल्पवृक्ष ' म्हणतों. ' तरुण भारता ' ला त्यांनीं दिलेली पांच हजार रुपयांची पहिली देणगी ही तर त्या दैनिकाच्या उभारणीची कोनशिलाच होय. संयुक्त महाराष्ट्र परिषदेलाहि त्यांनीं एक हजार रुपयांची देणगी मी विनंति करतांक्षणींच दिली. पण, त्यांच्या रसिक दातृत्वाचा जो चमत्कार मी १९४६ च्या जानेवारींत नागपूर येथें भरलेल्या मराठी पत्रकार परिषदेच्या पांचव्या अधिवेशनाच्या वेळीं पाहिला, तो, मला वाटतें,नागपूरच्याच नव्हे,तर महाराष्ट्रांतील

संमेलनांच्या इतिहासांतहि केवळ अपूर्व आणि अविस्मरणीय ठरेल. त्या वेळीं ते ' तरुण भारता ' च्या विश्वस्तमंडळांत होते; व त्यामुळें आम्ही बोलाविलेलें हें अधिवेशन म्हणजे जणुं कांहीं आपल्या स्वतःच्या घरचेंच मंगल कार्य आहे, अशा भावनेनें त्यांनीं त्याचा मुख्य भार उचलला. अधिवेशनाला पांचशें रुपयांची देणगी तर त्यांनीं दिलीच; पण शिवाय सप्तपक्वान्नांची बादशाही मेजवानी तीनशें पत्रकारांना देऊन त्यांनीं इतरत्र कुठें नव्हे असा त्यांचा दरबारी सन्मानहि केला. इतकेंच नव्हे, तर नगराध्यक्षांनीं पत्रकारांना दिलेल्या उपाहाराच्याहि खर्चाची जबाबदारी त्यांनीं घेतली. ' तरुण भारता ' शीं सुरवातीला आलेल्या त्यांच्या या निकट संबधामुळें गांधीवधानंतरच्या गुंडगिरींत त्यांनाहि मनस्ताप सोसावा लागला. पण त्याहि बिकट परिस्थितींत मजविषयींच्या त्यांच्या वैयक्तिक सौहार्दात मात्र अणुभरहि अंतर पडलें नाहीं.

अशा या ज्येष्ठ बंधुसमान सुहृदाला नकार देणें म्हणजे गेलीं वीस वर्षें हर एक सार्वजनिक कार्यांत त्यांनीं जो माझा पाठपुरावा केला, त्याविषयीं कृतघ्नपणा व्यक्त करण्यासारखें, त्या त्यांच्या असीम सौहार्दाचा उपमर्द करण्यासारखेंच झालें नसतें कां ?

त्यामुळें एक प्रकारच्या अनिच्छेनें पण त्याबरोबरच आत्मीयतेच्या उत्कट कृतज्ञतापूर्ण जाणिवेनें मी ती रक्कम स्वीकारली.

आणि अगदीं याच प्रकारच्या कृतज्ञतेच्या भावनेनें मी प्रो. वि. ह. कुलकर्णी यांनीं पाठविलेले शंभर रुपयेहि ठेवून घेतले.

एवढे दोन अपवाद वगळले, तर रेस्ट हौसमधून पुन्हा घरीं परत जाईपर्यंत मी निदान सात हजार रुपयांच्या तरी देणग्या परत केल्या असतील.

पण, मी या देणग्या जरी परत केल्या, तरी त्या देण्यांत प्रकट झालेली सहृदयता आणि स्नेहबुद्धि यांचें ऋण मात्र मला आमरण फेडतां येणार नाहीं. किंबहुना, त्या दुःखांतहि मला अशी धन्यता वाटली कीं, मडगांवपासून कानपूरपर्यंत जिथें जिथें कुठें मराठी भाषा बोलली जात असेल, तिथें तिथें माझे अकारण अज्ञात सुहृद आहेत, हें कळण्याचा सुयोग या आपत्तीमुळें आला, हें माझें केवढें भाग्य ! मी पुष्कळदां गमतीनें म्हणत असतों कीं, माझीं मुळें सर्व महाराष्ट्रभर पसरलेलीं आहेत. कारण, आमचें घराणें मूळ गोमंतकांतलें असून तिथून आम्ही

प्रथम सावंतवाडीला आणि नंतर मुंबईला येऊन स्थायिक झालों; व मी स्वतः मुंबईहून प्रथम पुण्याला आणि नंतर नागपूरला आलों. महाराष्ट्राच्या नैऋत्य टोंकापासून त्याच्या ईशान्य टोंकापर्यंत जें हें आमचें स्थलांतर होत गेलें, त्यामुळें ठिकठिकाणीं आमचे ऋणानुबंधी सुहृद पसरलेले असून, मडगांवचे श्री. काशिनाथराव नायक यांच्याकडे काय, पुण्याचे डॉ. अनंतराव कर्णिक यांच्याकडे काय किंवा भंडाऱ्यांचे श्री. नानासाहेब हर्डीकर यांच्याकडे काय कुठेंहि मी गेलों, तरी मला घरच्यासारखेंच वाटतें. ज्या वृक्षाचीं मुळें जमिनींत दूरवर आणि खोलवर पसरलेलीं असतात, त्याला लांबलांबच्या नद्यांचें आणि तलावांचें पाणी तर शोषून घेतां येतेंच; पण जमिनीच्या पोटांत जे असंख्य झिरपे पाझरत असतात, त्यांचाहि कधीं न आटणारा ओलावा त्याला सदैव नव्या जीवनाचा जिव्हाळा पुरवितो; व त्यामुळें तो वृक्ष कितीहि वेळां तोडला, तरी त्याचीं मुळें जोंपर्यंत भूगर्भांत जिवंत असतात, तोंपर्यंत त्याला सारखी नवी पालवी फुटत रहाते आणि नवा बहर येत रहातो. माझी स्थिति त्या वृक्षाप्रमाणें आहे याची अत्यंत आल्हाददायक प्रतीति या गंडांतराच्या प्रसंगीं मला नाना प्रकारांनीं आली.

पण, या पंधरा दिवसांत बनारसपासून बेळगांवपर्यंत निरनिराळ्या ठिकाणांहून जीं शेंकडों पत्रें मला आलीं, त्यांनीं मला माझ्या जीवनाचे धागे किती दूरवर पसरलेले आहेत याचा प्रोत्साहक प्रत्यय जसा आणून दिला, तशीच माझ्या या सुहृदांची माझ्या दुर्दम आत्मबलाविषयींची खात्रीहि मला पटवून दिली. आमचे बंधुतुल्य मित्र मुंबईचे मेजर नंदकिशोर गाडेकर यांचे ज्येष्ठ बंधु श्री. बाबासाहेब गाडेकर यांनीं ता. १० फेब्रुवारी रोजीं जें सहानुभूतीचें पत्र आम्हांला खारहून पाठविलें, त्यांत असे उद्गार काढले होते कीं, "वर्तमानपत्रांतून त्याच-प्रमाणें शिर्सीकर मंडळीकडून नागपूरची माहिती कळली. आम्हां सर्वांस फार वाईट वाटलें. आपलें नुकसान भरून येणारें नाहीं. " मी निर्वासित झालों," या आपल्या शब्दांतच सर्व कांहीं आलें. मी आपलें आत्मचरित्र वाचलें आहे. तेव्हां या वेळींहि आपण तितक्याच धीरानें सर्व सोसाल आणि पुन्हा खंबीर-पणानें आपल्या पायावर उभे रहाल याबद्दल मला शंका नाहीं." हाच विश्वास जवळजवळ याच शब्दांनीं प्रो. चिंतामण विनायक जोशी, श्री. देवदत्त नारायण

टिळक आणि श्री. वसंत भगवंत कर्णिक या माझ्या गेल्या दोन तपांतल्या प्रिय सुहृदांनींहि व्यक्त केला होता.

गेलीं चोवीस वर्षे माझा जीवनक्रम जिव्हाळ्यानें आणि जिज्ञासेनें न्याहाळीत आलेल्या, माझा उदय, मला वेळोवेळीं लागलेलीं ग्रहणें आणि आतांचें हें खग्रास ग्रहण सोत्कंठ, सभय सहृदयतेनें अवलोकीत आलेल्या माझ्या या सुहृदांना माझ्या सामर्थ्याविषयीं असणारी खात्री ही जशी या संकटांत मला स्फूर्तिदायक वाटली, तसेंच गेलीं सत्तावीस वर्षे पाठच्या भावासारखे माझ्या पाठीशीं उभे असलेले माझे जिवलग मित्र प्रो. रामचंद्र महादेव मराठे यांचें तत्पर सहाय्यहि माझें आत्मबल शतगुणित करणारें ठरलें. प्रो. मराठे हे कांहीं संपन्न नव्हत;— एक अगदीं मध्यम स्थितींतले मितप्राप्ति प्राध्यापक. पण त्यांनीं आपल्या चार ओळींच्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं, "तुम्हांला किती पैसे हवे आहेत, तें कळवा. म्हणजे मी शक्य तितके तुम्हांला पाठवीन. मजजवळ जें कांहीं आहे, त्यावर तुमचा हक्क आहे."

हें त्यांचें पत्र वाचतांच तेवीस वर्षांपूर्वीचा प्रसंग माझ्या डोळयांपुढें उभा राहिला. कै. डॉ. हेडगेवार यांनीं १९२५ च्या एप्रिलमध्यें ज्या वेळीं माझें लग्न ठरविलें, त्या वेळीं मजजवळ एक कपर्दिकाहि नव्हती. वडिलार्जित कर्जाचा शेवटला हप्ता फेडून मी नुकताच निष्कर्जी झालों होतों. रामभाऊ तेव्हां पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत फेलो होते. मी त्यांना लग्न ठरलें असल्याचें कळवितांच त्यांनीं खर्चाची सर्व जबाबदारी घेऊन मला निश्चिंत केलें.

आज आमचा 'शांतानिवास' पूर्वीच्याच रुबाबानें उभा आहे; पूर्वीच्याच पद्धतीनें अभ्यागतांचा पाहुणचार चालू आहे व पूर्वीच्याच दिमाखानें माझे सार्वजनिक व्यापहि सर्व सुरू आहेत. या आमच्या पुनरुत्थानाचें श्रेय बऱ्हंशीं बाबासाहेब भोसुले आणि रामभाऊ मराठे यांना आहे. माझ्या जीवनाला कधींहि न आटणारा जिव्हाळा पुरविणारे जिवंत पण अदृश्य झिरपे आहेत ते!

या सौहार्दाप्रमाणेंच बहुजनसमाजाच्या अविचारी क्रोधाला बळी पडलेल्या 'तरुण भारता'च्या धोरणाविषयींची जी गुणज्ञता श्री. गोविंदराव प्रधान, बॅ. शेषराव वानखेडे, रावसाहेब ग. म. ठवरे, श्री. ना. रा. शेंडे आणि श्री. वा. न. घोरपडे यांनीं व्यक्त केली, तीहि मला अत्यंत प्रोत्साहक वाटली. दादा घोरपडे

यांच्याशीं माझा स्नेह मी नागपुरांत आल्या दिवसापासूनचा आहे. आम्ही एका ताटांत जेवलों आहोंत, एका विचारानें वागलों आहोंत आणि एका व्यासपीठावर बोललों आहोंत. १९२५ च्या होळी पुनवेला ज्या वेळीं आम्ही एका ताटांत पुरणपोळी खाल्ली, त्याच वेळीं आमचा भाईचारा आणभाक न करतां होऊन गेला. दादांच्या मृदु, चंचल आणि दैववादी स्वभावामुळें त्यांचें बुद्धिप्रधान, गोंडस वक्तृत्व आणि सयुक्तिक, खोंचदार लेखन यांचा उपयोग पूर्व महाराष्ट्राच्या अस्मितेच्या विकासाला होऊं शकला नाहीं, हें त्यांचें आणि नागपूरचेंहि दुर्दैव. पण, आम्हां उभयतांना एकमेकांविषयीं जो जिव्हाळा पहिल्या दिवशींच वाटला, तो गेल्या चोवीस वर्षांतील स्थलांतरांनीं किंवा मतांतरांनींहि कधीं कमी झाला नाहीं.

त्यामुळें, दादा रेस्टहौसमध्यें माझ्या भेटीला आले किंवा त्या सुमारास त्यांच्या हातीं असलेल्या 'प्रकाश' साप्ताहिकांतून, नागपुरांतील दंगलीसंबंधीं ता.७ फेब्रुवारी रोजीं केलेल्या भाषणांत संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीवर जे शिंतोडे ना. पं. मिश्र यांनीं अकारण उडविले, त्यांचा खणखणीत निषेध करून, "पृथ्वीनें रथचक्र गिळल्यामुळें असहाय झालेल्या महारथि कर्णावर शस्त्र चालविण्यांत शौर्य नाहीं," असा जो मर्मभेदक इशारा माझ्याविषयींच्या प्रेमामुळें त्यांनीं पंडितजींना दिला, त्याचेंहि मला नवल वाटलें नाहीं. पण श्री. गोविंदराव प्रधान, बॅ. शेषराव वानखेडे किंवा रावसाहेब ठवरे यांचे आणि माझे संबंध त्या मानानें अगदीं औपचारिक आणि तात्कालिक. पण "कांग्रेसच्या बाबतींत, 'तरुण भारता'चें धोरण न रुचण्यासारखें असलें, तरी बहुजनसमाजाची बाजू घेणारें आपल्या प्रांतांत हें एवढें एकच पत्र आहे, ही गोष्ट ध्यानांत घेऊन तरी लोकांनीं तुमच्या वाटेला जायला नको होतें," अशा आशयाचे जे उद्गार त्या तिघांनीं खेदपूर्वक काढले, त्यामुळें मला नुकसानभरपाई झाल्यासारखी वाटली. विशेषतः, बॅ. वानखेडे आणि रावसाहेब ठवरे यांनीं संयुक्त महाराष्ट्राची चळवळ, मराठी बहुजनसमाज आणि अस्पृश्य वर्ग यांच्यासंबंधींच्या 'तरुण भारता'च्या कामगिरीची मुक्त कंठानें प्रशंसा करून त्याच्या विध्वंसाविषयीं अतिशय हळहळ व्यक्त केली; व तो पुन्हा ताबडतोब सुरू झाला पाहिजे आणि त्याचें धोरणही बदलतां कामा नये, असें म्हटलें.

त्यावर मी एवढेंच म्हणालों, "या आपत्तिमुळं संयुक्त महाराष्ट्र किंवा मराठी बहुजनसमाज यांच्याविषयींच्या आमच्या धोरणांत रेसभरहि फरक पडणार नाहीं, अशी ग्वाही मी तुम्हांला देतो. कारण हा माझ्या जीवननिष्ठेचा प्रश्न आहे. त्यामुळें माझ्यावर कोणी कितीहि आघात केले, तरी ती निष्ठा डागळणार नाहीं किंवा डळमळणार नाहीं—"

"मला खात्री आहे तुमच्याबद्दल. पण कांहीं लोकांच्या या कृत्यामुळं तुम्ही गैरसमज करून घेऊं नका बहुजनसमाजाविषयीं किंवा त्याच्या कार्यकर्त्याविषयीं—"

शेषरावांनीं मला उलट सांगितलें. तेव्हां मी त्यांना म्हटलें—

"मी कोणत्याहि एका पक्षाला, जातीला किंवा समाजाला जबाबदार धरीत नाहीं या विध्वंसाबद्दल. कांहीं व्यक्तींनीं किंवा गटांनीं आपला दुष्टावा साधून घेतला असेल. पण त्याबद्दल मी साऱ्या बहुजनसमाजाला जबाबदार धरणार नाहीं कधीं—"

तथापि, श्री. शेंडे यांचा कोणी तरी असा समज करून दिला कीं, महारांनीं आमचें घर लुटलें अशी जी एक वदंता त्या वेळीं प्रसृत झाली होती, तिच्यामुळें माझें मन महार समाजाविषयीं कलुषित झालें आहे.

त्यामुळें त्यांनीं एक दिवस सकाळीं मला येऊन विचारलें, "भाऊसाहेब, आमच्या लोकांवर खरंच का आपला राग झाला आहे? आपल्या घराच्या लुटींत कदाचित् आमचे कांहीं लोक असतीलहि. पण त्यांना बिचाऱ्यांना काय कल्पना की, जें दैनिक गेलीं चार वर्षें आपल्या हितसंबंधांचा पुरस्कार इतक्या ईर्ष्येनें करित आहे त्याच्या संपादकाच्या घराचा आपण विध्वंस करीत आहोंत म्हणून! आमचे लोक अडाणी आहेत अगदीं—"

"पण मी कुठं काय म्हटलंय तुमच्या लोकांबद्दल, शेंडे? आणि आमचं घर कोणी लुटलं याची उठाठेव करून तरी काय फायदा आहे आतां? मला काय कुणावर फिर्यादी करायच्या आहेत का कुणाचा सूड घ्यायचा आहे, तर मी या चौकशा करित बसूं?—"

"पण, मी असं ऐकलं कीं, आपला आमच्या लोकांविषयीं फार गैरसमज झालेला आहे—"

" अगदीं खोटी गोष्ट ! माझा कोणाविषयीं कांहींहि गैरसमज झालेला नाहीं आणि मला कोणाबद्दल कांहींहि तकार करावयाची नाहीं. जें होऊन गेलं, त्याच्याविषयीं विचार करायला मला वेळ नाहीं, विचार करायची इच्छाहि पण नाहीं. आतां पुढला मार्ग कसा काढायचा हाच एक प्रश्न आहे माझ्यापुढें—"

" तें खरं, भाऊसाहेब. पण, कांहीं लोक म्हणतात, महारांनीं आपलं घरं लुटलं. म्हणून मी म्हणतों कीं, आपण गैरसमज करून घेऊं नका आमच्या जातीविषयीं. आपले आणि 'तरुण भारता'चे अनंत उपकार आहेत आमच्या जातीवर. 'तरुण भारत' जर निघाला नसता, तर झाडीपट्टींतले आमचे महार लोक मराठीला पारखे होऊन हिंदीभाषी झाले असते एव्हांना ! आपण त्यांना मराठीची गोडी लावली, 'तरुण भारत' हें त्यांचं पत्र आहे असा विश्वास त्यांच्यांत उत्पन्न केला आणि त्यांना महाराष्ट्राविषयीं विचार करायला प्रवृत्त केलें ! आमच्या महार समाजांत महाराष्ट्रीय असल्याची जाणीव आपण जागृत केली, भाऊसाहेब—"

" पण शेंडे, माझा कांहींहि गैरसमज झालेला नाहीं तुमच्या लोकांबद्दल; न महारांविषयींच्या 'तरुण भारता'च्या धोरणांत कांहीं बदलहि व्हायचा नाहीं या प्रसंगामुळं. तुम्ही अगदीं निर्धास्त रहा या बाबतींत. १९४२ च्या जानेवारींत 'महाराष्ट्रां'त असतांना कै. न्या. रानडे यांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं डॉ. अंबेडकर यांनीं केलेल्या भाषणावर मी थोडीशी टीका केली होती. त्या टीकेचा राग धरून मॉडेल मिल्सच्या फाटकासमोर हल्ला केला होता तुमच्या लोकांनीं माझ्यावर ! पण, म्हणून कांहीं महारांविषयींचा माझा जिव्हाळा कमी झाला नाहीं त्यांच्या त्या अविचाराच्या कृत्यामुळं. मी महारांच्या भवितव्याच्या प्रश्नाकडे महाराष्ट्राच्या पुनर्घटनेच्या दृष्टीनं पहातों, शेंडे ! तेव्हां तुम्हांला कांहींही काळजी वाटण्याचं कारण नाहीं या बाबतींत. आतां माझ्यापुढें प्रश्न आहे, तो फक्त 'तरुण भारत' पुन्हा कसा सुरू करतां येईल हा आहे— "

" होय. 'तरुण भारत' शक्य तितक्या लवकर निघाला पाहिजे, भाऊसाहेब. लोक आतुरतेनें वाट पहाताहेत त्याची. पण, 'तरुण भारत' सुरू झाला, तर कांहीं इसम पिकेटिंग करण्याच्या गोष्टी बोलताहेत न् एक सद्गृहस्थ तर अन्न-सत्याग्रह करणार आहेत म्हणे—"

" मला माहित आहे कोण काय बोलतो आहे आणि काय करतो आहे तें. तरी सुद्धां मी जिवंत आहे तोंपर्यंत 'तरुण भारत' निघाल्याशिवाय राहणार नाहीं, शेंडे ! — "

" आम्हांला खात्री आहे त्याबद्दल, भाऊसाहेब ! — "

× × ×

पण, 'तरुण भारत' पुन्हा चालू करणें, हें काम कांहीं सोपें नव्हतें. आमचे मित्र 'नरकेसरी छापखाना' आणि 'तरुण भारत' कचेरी यांचा विध्वंस करूनच थांबले नाहींत; तर 'कॉंग्रेसविरोधी वृत्तपत्रांत काम करूं नका' अशीं पत्रकेंही त्यांनीं काढलीं होतीं. इतकेंच नव्हे, तर कांहीं व्यक्ति, वृत्तपत्रें आणि गट यांनीं 'तरुण भारता' चें डोकें पुन्हा वर निघूं नये, म्हणून नालस्तीची आणि दमदाटीची अशी दुहेरी मोहिम जोरानें सुरू केली होती. छापखान्याची नासधूस झाल्यामुळें टाईप विकत घेण्यापासून प्रारंभ करणें भाग होतें; व यंत्रांची मोडतोड झाल्यामुळें छपाईचीहि सोय दुसरीकडे करण्याशिवाय गति नव्हती. उलट आम्हांला कोणी कोणत्याहि प्रकारची मदत करूं नये, म्हणून सर्व प्रकारचा धमकीवजा दुष्ट प्रचार धडाक्यानें चालला होता. त्यामुळें खुद्द आमचे प्रेस मॅनेजर श्री. दादा वाचासुंदर हे सुद्धा, तूर्त कांहीं दिवस 'तरुण भारत' काढण्याच्या भानगडींत आपण पडूं नये, असें बोलूं लागले होते !

उलट, श्री. पटवर्धन यांचा असा निर्धार होऊन चुकला होता कीं, काय वाटेल तें झालें तरी चालेल, पण 'तरुण भारत' ताबडतोब सुरू करावयाचा !

सुदैवानें, 'तरुण भारता' चे व्यवस्थापक श्री. वामनराव लघाटे यांच्या खंबीर सहकार्याची जोड त्यांना लाभल्यांमुळें विध्वंस झाल्यापासून अवघ्या सतरा दिवसांच्या आंत 'तरुण भारता' चें पुनरुत्थान घडून आलें. 'तरुण भारत' जो इतक्या लवकर पुन्हा पूर्ववत् आपल्या पायावर उभा राहिला, त्याचें श्रेय मी श्री. पटवर्धन आणि श्री. लघाटे यांच्या हिंमतीला आणि चिकाटीला देईन. छापखाना आणि कचेरी यांच्या विध्वंसाचें भयानक स्वरूप लक्षांत घेतां फाटलेल्या आभाळाला ठिगळें लावण्याचाच प्रसंग एका परीनें आमच्यावर ओढवला होता. पण, श्री. पटवर्धन यांचें धैर्य आणि धोरण हीं दोन्ही त्या प्रसंगाला पुरीं पडलीं.

या सगळ्या विध्वंसांत मनाला हुरूप वाटण्यासारखी गोष्ट फक्त एकच होती. ती म्हणजे आमच्या कामगार वर्गाची निष्ठा. 'नरकेसरी प्रेस'वर बहिष्कार घालण्याचा प्रचार शहरांत इतक्या जोरानें चालू असतांनासुद्धां आमचा एकहि कामगार भेदरला किंवा बिथरला नाहीं. बहुतेक सगळे कंपॉझिटर मला रेस्ट हौसमध्यें येऊन भेटले; व ता. ४ रोजीं श्री. लघाटे यांनीं कचेरी उघडून सारे व्यवहार सुरू करतांच त्यांनींहि उध्वस्त केलेल्या छापखान्याची आवरासावर करावयाला उत्साहानें प्रारंभ केला. शहरांतल्या त्या प्रक्षुब्ध वातावरणांत त्यांनीं कामावर हजर होण्यांत थोडा तरी धोका खात्रीनें होता. पण त्याची पर्वा त्यांनीं केली नाहीं. इतकेंच नव्हे, तर आमचे एक फोरमन श्री. केशवराव साळुंके यांनीं मला अशी ग्वाही दिली कीं, " 'तरुण भारता'विरुद्ध कोणी कांहीहि प्रचार केला, तरी आम्ही त्याला अंतर देणार नाहीं." या स्थितींतच श्री. लघाटे यांनीं नेहमीप्रमाणें ता. ८ च्या आंत पगाराचा बटवडा केल्यामुळें 'तरुण भारता'च्या स्थैर्याबद्दलचा कामगारांचा विश्वास दृढतर झाला. श्री. पटवर्धन हे छपाईची व्यवस्था करण्याच्या उद्योगाला लागले. पण, त्याबरोबरच श्री. लघाटे यांनीं 'नवा काळ'चे यंत्रविशारद, आमचे मित्र श्री. गो. रा. जोग यांना ताबडतोब येण्याविषयीं तार करून, शिवाय स्थानिक जाणकारांकडूनहि यंत्रांच्या दुरुस्तीचें काम चालू करविलें.

पण, आमच्यापुढें पहिला मुख्य प्रश्न प्राथमिक खर्चासाठीं जे पांच हजार रुपये ताबडतोब हवे होते, ते उभे करण्याचा होता. म्हणून, श्री. लघाटे यांनीं ता ११ फेब्रुवारी रोजीं 'नरकेसरी स्मारक मंडळा'च्या कार्यकारी समितीची सभा बोलावली; व सर्व विश्वस्तांनाहि त्या सभेचें निमंत्रण दिलें. मी या सभेला असे तीन पर्याय सुचविले कीं, (१) मंडळानें स्वतः सर्व जबाबदारी घेऊन 'तरुण भारत' सुरू करावा, (२) मजवर जबाबदारी टाकून मला सुरू करण्याची परवानगी द्यावी किंवा (३) या दोन्हीं गोष्टी शक्य नसतील, तर मला स्वतःचें नवें दैनिक काढावयाला स्वातंत्र्य द्यावें. विश्वस्तांपैकीं वीर हरकरे हे या सभेला हजर होते. त्यांनीं 'तरुण भारत' हर प्रयत्न करून शक्य तितक्या लवकर सुरू करण्यांत आला पाहिजे, अशी आपली उत्कट इच्छा असल्याचें सांगितलें; पण त्याबरोबरच पैसा उभा करण्याच्या बाबतींत आपल्याला कांहीं

करणें शक्य नाहीं, असाहि प्रांजळ खुलासा त्यांनीं केला. या मुद्यावर बरीच चर्चा झाल्यानंतर शेवटीं असा मोघम ठराव करण्यांत आला कीं, " 'तरुण भारत' पुन्हा ताबडतोब सुरू करण्यासाठीं अत्यंत जरूर असलेली पांच हजार रुपयांची रक्कम कर्जाऊ वा अन्य तऱ्हेनें जमविण्याचा कार्यकारी समितीच्या प्रत्येक सभासदानें प्रयत्न करावा."

पण, या संदिग्ध ठरावामुळें माझा मार्ग सुकर झाला नाहीं; उलट संकुल मात्र झाला.

कारण, या सुमारास माझ्या एका सन्मान्य मित्रांनीं मला असें कळविलें होतें कीं, 'तरुण भारता'चें पुनरुज्जीवन करण्याच्या भानगडींत न पडतां मी जर स्वतःचें स्वतंत्र दैनिक काढलें, तर मला दहा हजार रुपये देणगीदाखल आणि दहा हजार रुपये बिनव्याजी कर्जाऊ देण्याची आपली तयारी आहे. तो निरोप आल्यावर मला असा मोह पडला कीं, या संधीचा फायदा घेऊन आपण स्वतःचें स्वतंत्र दैनिक काढावें.

पण श्री. पटवर्धन यांना ही कल्पना रुचली नाहीं. त्यांनीं मला असें स्पष्ट सांगितलें कीं, "आज तुम्ही स्वतंत्र दैनिक काढलेंत, तर तें लोकप्रिय आणि यशस्वी कराल, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. पण, 'तरुण भारत' पूर्वीच्याच स्वरूपांत पुन्हा सुरु होण्यांत जी त्याची आणि व्यक्तिशः तुमचीहि प्रतिष्ठा आहे, ती या परिस्थितींत नवें दैनिक काढण्यांत नाहीं. तुमच्या शत्रूंनीं तुमचा नाश करण्याचा पद्धतशीर प्रयत्न केला आहे. त्या त्यांच्या दुष्ट आव्हानाला तुमचें समर्पक उत्तर 'तरुण भारत' पूर्वीच्याच स्वरूपांत पुन्हा प्रसिद्ध होणें हेंच आहे; नवें दैनिक काढणें हें नव्हे!"

हा त्यांचा सल्ला मला पटला. पण, या सल्ल्यानुसार वागणें म्हणजे 'तरुण भारत' पुन्हा सुरू करण्याची सारी आर्थिक जबाबदारी स्वतःच्या शिरावर घेणें होतें. मी ती जबाबदारी पत्करली आणि श्रीमंत गणपतराव बुटी यांना भेटून प्राथमिक खर्चाची व्यवस्थाहि केली.

छपाईचा प्रश्नहि तितकाच बिकट होता. पण, श्री. पटवर्धन यांच्या विनंतीला मान देऊन 'हितवाद'चे व्यवस्थापक श्री. भारद्वाज यांनीं, आमचा छापखाना उभा राहीपर्यंत 'तरुण भारत' छापून देण्याचें कबूल केलें. लगेच श्री. लघाटे

यांच्या नांवाचें डिक्लेरेशन करण्यांत आलें; व ' हितवाद ' कचेरीच्या जवळ धंतोलीवर जागा घेऊन ' तरुण भारत ' काढण्याच्या तयारीला आम्ही उत्साहानें लागलों.

× × ×

काल श्री. नाना जोग यांनीं कॉडवेलचें ' ' Studies in a dying culture ' हें पुस्तक मला नजर केलें. ता. ५ रोजीं माझ्या भेटीला जेव्हां ते प्रथम आले, तेव्हां त्यांनीं मला विचारलें, " तुम्ही जाळपोळीकडे कोणत्या दृष्टीनें पहातां, भाऊराव ? इतर कांहीं लोक म्हणतात त्याप्रमाणें ही दंगल निव्वळ जातीय म्हणजे ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांतून उद्भवलेली आहे, असंच तुम्हीहि समजतां कां ? "

" छे ! मुळींच नाहीं जिथें मुळीं ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद हा केवळ धार्मिक किंवा जातीय नसून तो तितकाच आर्थिक आणि सांस्कृतिकहि आहे असें मी मानतों, तिथें ही दंगल केवळ जातीय आहे असें मी कसें समजेन ? "

" बरोबर आहे. या दंगलींत अनेक भावना आणि अनेक हेतु यांची सरमिसळ झालेली होती. गांधींचा खून हें केवळ एक तात्कालिक निमित्त झालें. समाजांतील संपन्न, सुस्थित, सुसंस्कृत लोकांविरुद्ध जो निरनिराळ्या प्रकारचा असंतोष समाजाच्या खालच्या उपेक्षित, अकिंचन, असंस्कृत थरांत आज धुमसतो आहे, त्याचाच हा एक स्फोट आहे खरोखरी. Have आणि Have Not, क्रोडपति आणि कफल्लक, सुसंस्कृत आणि असंस्कृत, सुस्थित आणि दुःस्थित यांच्यांतल्या अनिवार्य लढ्याचाच हा एक भाग आहे - "

" मला पूर्ण जाणीव आहे या गोष्टीची. म्हणूनच मी कोणत्याहि विशिष्ट पक्षाला, जातीला किंवा वर्गाला जबाबदार धरणार नाहीं या दंगलीबद्दल. ब्राह्मणांविषयीं जो राग इतर जातींना वाटतो, तो केवळ धार्मिक किंवा आर्थिक नाहीं. आज ब्राह्मणेतरांत ब्राह्मणांइतके शिकलेले आणि त्यांच्यापेक्षां किती तरी पटींनीं जास्त संपन्न असलेले लोक अनेक आढळतील. पण, ब्राह्मणांची उच्च संस्कृति आणि उच्च जीवनक्रम, त्याबरोबरच इतर सुसंस्कृतहि जातींविषयीं त्यांना वाटणारी तुच्छता आणि आपल्या श्रेष्ठतेच्या धुंदींत त्यांच्याकडून होणारी इतरांची अवज्ञा या कारणांमुळें त्यांच्याविषयीं सधन, सुशिक्षित, उच्चपदस्थ

ब्राह्मणेतरांनाहि चीड वाटते. या दंगलींत जीं समाजक्रांतीचीं ज्वालाग्राही स्फोटक बीजें मिसळलेलीं आहेत, तीं पूर्ण लक्षांत आलेलीं आहेत माझ्या—"

" मला बरं वाटलं तुमचं हें बोलणं ऐकून. या दंगलीच्या रूपानं ज्या सामाजिक, सांस्कृतिक आणि आर्थिक असंतोषाला तोंड फुटलें आहे, त्याचं मूलगामी स्वरूप तुमच्या लक्षांत यावं आणि त्याचा तुम्ही निराळया दृष्टीनं विचार करावा म्हणून मी हें कॉडवेलचं पुस्तक देतोंय तुम्हांला—"

श्री. नाना जोग यांनीं दिलेलें तें पुस्तक माझ्या नव्या ग्रंथसंग्रहाची कोन-शिला ठरेल का ? त्यांची ही देणगी माझ्या जीवनांतील स्थित्यंतराच्या दृष्टीनें किती सूचक आहे ? माझा जुना नष्ट झालेला ग्रंथसंग्रह परंपरागत जीवनाचा प्रातिनिधिक होता; गेल्या तीन पिढयांच्या संस्कृतीचा बौद्धिक अवशेष होता. पण या विध्वंसानंतर होणारा नवा ग्रंथसंग्रह !—तो कोणत्या स्वरूपाचा राहील ?

× × ×

आज बरोबर पंधरा दिवसांनीं, सोमवार ता. १६ फेब्रुवारी १९४८ रोजीं सायंकाळीं, आम्ही पुन्हा घरीं परत आलों.

ता. १४ रोजीं सायंकाळीं जेव्हां मी प्रथम तें साफसूफ होत असलेलें उध्वस्त घर पाहिलें, तेव्हां माझ्या मनांत आलें, "आतां या भकास, उजाड घरांत राहून आपल्याला काय सुख लाभणार ? इतक्या हौसेनें बांधलेल्या आणि सजविलेल्या या घराचें रितेंपण खायला उठेल आपल्याला ! त्याचें तें भेसूर रितेपण डोळयांना पहावणार नाहीं, मनाला सोसवणार नाहीं—"

कारण, घरांत जिथें जिथें म्हणून डोळे वळत, तिथें तिथें नेहमीं पहाण्याची संवय झालेली वस्तु दृष्टीस न पडल्यामुळें, मनाचा हिरमोड होई आणि क्षणो-क्षणीं वाटे, नको या उध्वस्त, उदास घरांत राहणें !—

घरीं परत आल्यापासून शांताबाई अधिकच अबोल, अधिकच गंभीर झाली.

पण, तिच्याशीं काय बोलावें, तिला कोणत्या शब्दांनीं धीर द्यावा, हें मला समजेना.

मला सारखें वाटे, ही जर अशीच खचत गेली, तर कसें होईल ?

पण सुदैवानें सोमवारची ती अस्वस्थ रात्र अखेर, दिवसभराच्या दगदगीनें आलेल्या श्रांततेच्या गाढ स्वप्नरहित निद्रेंत विलीन होऊन गेली.

× × ×

मंगळवारीं सकाळीं उठल्याबरोबर, घराच्या उध्वस्ततेसंबंधींचें मनावर पडलेलें तें सारें दडपण झुगारून देऊन, ' तरुण भारत ' काढण्याच्या उद्योगाला मला ईर्ष्येनें लागणें भाग पडलें. श्री. जोग अद्याप मुंबईहून आलेले नव्हते. त्यामुळें, यंत्रें दुरुस्त होईपर्यंत निदान महिनाभर तरी ' हितवाद ' छापखान्यांत अंक छापून घ्यावा लागेल अशा कल्पनेनें, श्री. पटवर्धन यांनीं धंतोलीवर जागेची व्यवस्था केली होती श्री. वाचासुंदर यांनीं नवीन घेतलेला टाइप, केसेस वगैरे छापखान्याचें सर्व सामान फोरमनबरोबर लॉरींतून त्या जागीं रवाना केलें; व दुपारीं १२ च्या सुमारास श्री. सदाशिवराव गर्गे यांच्यासह मी तेथें जाऊन पोंचलों.

श्री. पटवर्धन, श्री गोविंदराव गोखले, श्री. पां. वि. करकरे, श्री. य. बा. शास्त्री, श्री. लघाटे, श्री. वाचासुंदर प्रभृति मंडळी आधींच तेथें आलेली होती; व कामाला नव्या उत्साहानें प्रारंभ झालेला होता. मी आल्याबरोबर 'न मे भक्तः प्रणश्यति ' हा अग्रलेख आणि 'निर्वासिताचे आभार' हें निवेदन कंपोजला दिलें. गप्पा मारीत, एकमेकांची थट्टा करीत खेळीमेळीनें काम करण्याचा जो आमचा नेहमींचा क्रम, तदनुसार आजहि आमचें काम मजेनें चाललेलें होतें. श्री. तात्या करकरे हे आपल्या चोखंदळ स्वभावानुसार नेहमीसारखा लज्जतदार चहा आज नारायण करून देऊं शकणार नाहीं म्हणून कुरकुरत होते; तर विध्वंसानंतर आज प्रथमच आपल्या कामाला पुनरारंभ होत असल्यामुळें निदान चिवडा आणून तरी हा सुप्रसंग साजरा करावा, असा यशवंताचा सारखा आग्रह चालला होता. तेव्हां तात्या त्याला म्हणाले—

" हें पहा शास्त्री, तुम्ही नेहमीं चुकतां ते असेच ! मागून मागावयाचा तर भिकार चिवडा का मागतां ? आपण चार वर्षांनीं पुन्हा धंतोलीवर आलों आहोंत; इथून बंगाली मिठाईचें 'आनंदभांडार' अगदीं जवळ आहे; न् नारायण सायकलवरून चटकन् तिथें जाऊन काय वाटेल तें घेऊन येईल दहा मिनिटांत. अशा वेळीं रसमलाई, रसगुल्ले, संदेश, चमचम वगैरे मागायचं सोडून भाऊसाहेबांजवळ चिवडा मागतां याबद्दल काय म्हणावं तुम्हांला ? अहो, चिवडा हें निव्वळ तोंडी लावणं आहे एक. तोंडाला कांहीं तरी चाळा हवा, म्हणून त्याची एकेक फक्की चहाबरोबर टाकायची असते तोंडांत ! चिवडा हें कांहीं आनंद व्यक्त करण्याचं खाद्य नव्हे. रसगुल्ल्याबरोबर चिवडा मागवायचा म्हटलात, तर अर्थ आहे त्याला कांहीं—"

"तात्या, भाऊरावांनीं चिवडा दिला तरी पुष्कळ आहे असं म्हणेन मी!—"

" तुम्ही फारच निराशावादी दिसतां, यशवंतराव! अहो, निदान पेढे तरी मागा—"

अशा प्रकारचा आमचा हास्यविनोद चालू असतांनाच अग्रलेखाचीं मुद्रितें आलीं. मी तीं स्वतः एकवार तपासून श्री. करकरे यांच्यापुढें ठेवलीं.

तीं वाचतां वाचतांच त्यांचा चेहरा एकदम गंभीर होऊन गेला आणि ते म्हणाले, " भाऊसाहेब, तुम्ही जें लिहिलेंय, तें आपल्या दृष्टीनं योग्यच आहे. पण, विशेषतः ' बुद्धिस्तु मागान्मम ' या शेवटल्या परिच्छेदांतला दर्प डोळयांवर येईल आपल्या हितशत्रूंच्या—"

" तो दर्प अनाठायीं आहे असं म्हणायचंय का तुम्हाला, तात्या?—"

" नाहीं तसं मुळींच म्हणणं नाहीं माझं तो दर्प शोभून दिसतो तुम्हाला! फक्त लोकांना आज तो रुचणार नाहीं एवढंच म्हणणं आहे माझं—"

त्यांच्या आग्रहाच्या सूचनेनुसार मी त्या लेखांतलीं दोन विधानें किंचित् सौम्य केलीं; व श्री. पटवर्धन यांनीं तो पसंत केल्यावर दुरुस्तीसाठीं फोरमनच्या स्वाधीन कला.

नंतर श्री पटवर्धन मला म्हणाले, " श्री. माणि आणि श्री. भारद्वाज यांनीं आपला पेपर छापून द्यायचं कबूल केल्याबद्दल तुम्ही एकदां समक्ष भेटून आभार मानले पाहिजेत त्यांचे, भाऊसाहेब. मग चलता का ' हितवाद ' कडे?—"

"तुम्ही समक्ष जाऊन आभार मानल्यानं झाला तर आपला फायदाच होईल, भाऊराव—"

" यशवंता, माझी मुळींच इच्छा नाहीं आपला अंक बाहेर पडेपर्यंत कोणाला जाऊन भेटण्याची—"

" असं म्हणून चालणार नाहीं भाऊसाहेब, आपलं आज. एरवीं तुम्हीं कधींच कुठं जात नाहीं, याबद्दल आम्ही म्हणतो का तुम्हांला कांहीं? पण आजचा प्रसंग अगदीं वेगळा आहे—"

" तुमच्या म्हणण्याबाहेर मी कधींच जात नाहीं, पटवर्धन! तुमचा आग्रहच असेल, तर जाऊं या आपण ' हितवाद ' कडे—"

आणि, आम्ही ' हितवाद ' कडे जावयाला निघालों, तोंच ' हितवाद ' चा चपराशी सायकलवरून आमच्या समोर उतरला आणि त्यानें श्री. भारद्वाज यांचें पत्र श्री. पटवर्धन यांच्या हातीं दिलें.

त्यांनीं लिफाफा फोडून तें पत्र वाचलें आणि मला दिलें.

त्या पत्रांत श्री. भारद्वाज यांनीं लिहिलें होतें—

**THE HITAVADA**

**Ajni Jail Road, Nagpur.**
**17th February 1948**

Dear Mr. Patwardhan,

Since we orally agreed to lend one of our printing machines for the publication of the Tarun Bharat on the condition that you supply labour and materials yourself for printing your paper, we understand that there is considerable agitation in the town regarding the re-appearance of your paper. There are reports that even disturbances may occur if your paper resumes publication at the present time and that the disturbances may spread not only to your office but to the place where the paper is printed. We sympathise with you in the situation in which you are placed. We would be glad to give assistance to any newspaper in distress; but situated as we are, you will realise that even the Government and the police could not give you protection on the day the disturbances broke out in Nagpur. The public have nothing against Hitavada. I am sure you yourself will be sorry if on your account the Hitavada were to be brought into trouble. In these circumstances, in your own

safety and our own, we regret to inform that we will not be able to accept the printing of the Tarun Bharat tomorrow. Our advice to you as friends is to take some time and set up your own press and to allow public excitment to subside so that your paper may appear in normal conditions. We are sorry to give you such late intimation about our inability to print your paper, but the developments took place very rapidly in the afternoon necessitating this letter to you.

Yours Sincerely,
**K. S. Bharadwaj**
General Manager

पत्र वाचल्यावर मी त्यांना विचारलें, " मग जायचं का आतां ' हितवाद ' कडे ? —"

" हो. आतां तर गेलंच पाहिजे. म्हणजे, त्यांनीं ' तरुण भारत ' छापायला नकार का दिला याचा उलगडा होऊन जाईल; न् अजूनहि कांहीं मार्ग निघणे शक्य आहे कीं नाहीं हेंहि कळेल—"

मी कांहीं बोललों नाहीं. श्री. पटवर्धन आणि श्री. शास्त्री यांच्या पाठोपाठ मी मुकाट्यानें ' हितवाद ' कचेरींत गेलों.

नमस्कार झाल्यावर श्री. भारद्वाज म्हणाले, "आमची फार इच्छा होती तुम्हांला मदत करायची. पण, 'तरुण भारत' जर आमच्या प्रेसमध्यें आम्ही छापला, तर प्रेसवर हल्ला करण्यांत येईल असं आम्हांला नक्की कळल्यामुळें निरुपायानं नकार द्यावा लागला हा ! माडखोलकर, मला फार वाईट वाटतं या प्रकाराबद्दल— "

त्यांच्याशीं थोडा वेळ बोलणें झाल्याबरोबर आमच्या हें लक्षांत आलें कीं, त्यांच्या हातांत अखेरचा निर्णय नसून, श्री मणि यांच्यावरच सर्व कांहीं अवलंबून आहे. म्हणून, त्यांच्या सूचनेनुसार, आम्ही श्री. मणि यांच्याकडे गेलों.

श्री. मणि यांच्या सांगण्यांत असें आलें कीं, 'तरुण भारत' त्यांनीं 'हितवाद' छापखान्यांत छापून देऊं नये म्हणून अनेकांनीं त्यांच्यावर दडपण आणलें असून, शिवाय त्यांच्या प्रेसवर हल्ला करण्याचीहि धमकी देण्यांत आली आहे. त्यांनीं आणखी असेंहि बोलून दाखविलें कीं, याहि परिस्थितींत यदाकदाचित् ' तरुण भारत ' प्रसिद्ध झालाच, तर त्याचे सारे अंक शुक्रवार तलावांत फेकून द्यावयाचे, असे विक्रेत्यांनीं ठरवून टाकलें आहे.

हें त्यांचें शेवटलें विधान ऐकून आम्हाला आश्चर्य वाटलें. कारण, मारुळकर, गुलाबराव आणि भगवान हे जे आमचे तिघे मुख्य विक्रेते, ते 'तरुण भारत' शक्य तितक्या लवकर सुरू करा, असें कचेरींत येऊन रोज सारखे म्हणत होते. तथापि आम्ही कांहीं बोललों नाहीं. शेवटीं श्री. मणि मला म्हणाले—

" लोकांचा राग आज मुख्यतः तुमच्यावर आहे, माडखोलकर. तुम्ही जर आपलं नांव 'तरुण भारता'वरून काढून घेतलंत, तर त्याचं प्रकाशन सुकर होईल असं वाटतं मला—"

तेव्हां मी चटदिशीं त्यांना उलट विचारलें, " समजा, मी माझं नांव काढून घेतलं तुमच्या सूचनेप्रमाणें तर ' तरुण भारत' तुम्ही आपल्या प्रेसमध्यें छापून द्याल का ? तुम्ही जर छापून द्यायला तयार असाल, तर मी नांव काढून घेतों आपलं— "

त्यावर श्री. मणि किंचित् घुटमळले आणि हंसून उद्गारले, "पण, मला वाटतं, तुम्ही प्रकाशनाच्या बाबतींत घाई करूं नये तूर्त, माडखोलकर. हें सगळं वादळ शांत होईपर्यंत महिना दोन महिने तुम्ही थांबलांत, तर काय बिघडणार आहे ?— "

" असं कसं म्हणतां तुम्ही ? दैनिकाच्या प्रकाशनांत खंड पडणं यासारखी त्याच्या पतीला कमीपणा आणणारी गोष्ट नाहीं दुसरी. खरोखरी, आमचा पेपर कोणत्याहि एका विशिष्ट पक्षाचा नसतांना किंबहुना तो सामान्यतः कॉंग्रेसचाच पुरस्कर्ता असतांनासुद्धां केवळ जुने हेवेदावे मनांत आणून त्याचा जो विध्वंस दुष्टाव्यानें करण्यांत आला, तोच नडणार आहे उद्यां आम्हांला जाहिरातींच्या बाबतींत ! अशा स्थितींत तुम्ही आणखी महिना दोन महिने अंक बंद ठेवण्याचा सल्ला कसा देतां, मणि ?— "

" तुम्ही म्हणतां तें खरं आहे, माडखोलकर. पण लोक आज तुमच्यावर फार चिडलेले आहेत. अशा स्थितींत तुमचा अंक प्रसिद्ध झाला, तर पुन्हा कांहीं अनिष्ट प्रकार घडायचे ! म्हणून माझा तरी तुम्हांला असा स्नेहभावाचा सल्ला आहे कीं, तुम्ही कांहीं दिवस वाट पहावी. वाटल्यास तुम्ही पं. शुक्ल यांना भेटून त्यांचाहि सल्ला या बाबतींत घ्या. ते जर तुम्हांला संरक्षण द्यायला तयार असतील, तर मग अंक काढायला हरकत नाहीं फारशी. तुम्ही जरूर पंडितजींना भेटून त्यांचा सल्ला घ्या, माडखोलकर—"

श्री. मणि यांनीं अत्यंत कळकळीनें केलेल्या त्या सूचना आम्ही ऐकून घेतल्या आणि श्री. लघाटे यांच्याकडे आलों. श्री. पटवर्धन यांनीं त्यांना सर्व हकिकत सांगितली.

नंतर मी त्यांना म्हटलें, " हें पहा पटवर्धन, मणींच्या सूचनेप्रमाणें माझं नांव 'तरुण भारता'वरून काढल्यानं जर त्याच्याविरुद्ध उत्पन्न झालेला क्षोभ कमी होण्याचा संभव असेल, तर मी नांव काढून घ्यायला तयार आहे आपलं. 'तरुण भारत' ताबडतोब सुरू होणं ही मुख्य गोष्ट आहे आज. मग तो कोणाच्याहि का नांवावर निघेना !—"

" नाहीं भाऊसाहेब. इथं तुमचा न् माझा मतभेद आहे. तुम्ही स्वतःचं स्वतंत्र दैनिक काढण्याची कल्पना जेव्हां मला सांगितलीत, तेव्हां जो सल्ला मी तुम्हांला दिला होता तोच याहि बाबतींत देईन. सध्याच्या स्थितींत तुम्ही स्वतंत्र दैनिक काढणं हें जसं आपल्या प्रतिष्ठेला कमीपणा आणणारें आहे असं मी मानतों, तसंच तुमचं नांव 'तरुण भारता'वरून काढून टाकणं हेंहि तितकंच कमीपणा आणणारं आहे असं मी मानतों. आपल्या हितशत्रूंच्या कोल्हेकुईपुढें आपण नमलों असा अर्थ होईल त्याचा ! 'तरुण भारत' अगदीं पूर्वी होता तसाच निघाला पाहिजे आणि तोहि तुमच्या नांवावरच निघाला पाहिजे, भाऊसाहेब—"

मी कांहीं बोललों नाहीं. ते पुढें म्हणाले, " आतां आपण प्रथम श्री. रामानंद झा यांच्याकडे जाऊं. ते आपल्या 'सेंट्रल इंडिया प्रेस' मध्यें अंक छापून देतात का पाहूं या. तेथून नंतर दत्तोपंत मारुळकरांकडे जाऊं; न् त्यांना सरळच विचारूं अंक शुक्रवार तलावांत फेकून द्यायचा विक्रेत्यांचा विचार आहे कीं काय तें—"

लगेच आम्ही श्री. झा यांच्याकडे गेलों. ते आपल्या मिठास स्वभावानुसार आम्हांला मदत करावयाला उत्सुक होते. पण, 'तरुण भारत' छापून देण्याच्या बाबतींत प्रेसच्या ज्या अडचणी त्यांनीं सांगितल्या, त्यामुळें त्यांच्या हातून आमचें काम होण्यासारखें नाहीं, हें लगेच आमच्या लक्षांत आलें. तेथून आम्ही श्री. दत्तोपंत मारुळकर यांच्याकडे गेलों; व श्री पटवर्धन यांनीं श्री. माणि यांनीं सांगितलेली माहिती त्यांच्या कानांवर घातली.

त्याबरोबर दत्तोपंत आपल्या सरळ स्वभावानुसार म्हणाले, " हें जें तुम्हांला सांगितलं ना मणींनीं पटवर्धन, त्यांत कांहीं सुद्धां तथ्य नाहीं. एखाद दुसरा अंक विकणारा इसम कदाचित् बडबडत असेल असं कांहीं. पण 'तरुण भारत' शक्य तितक्या लवकर पुन्हा सुरू व्हावा, अशीच आमची सर्वांची इच्छा आहे. अहो, 'तरुण भारत' विकणं हा उत्पन्नाचा प्रश्न आहे आमच्या. तें उत्पन्न बुडवून घ्यायला विक्रेते किती दिवस तयार होतील ? "

" याचा अर्थ असा कीं, इतर विक्रेते कसेहि वागले, तरी निदान तुम्ही तरी अंकविक्रीच्या बाबतींत साथ द्याल आम्हांला—"

" हो, हो ! तुम्ही बिलकूल शंका बाळगूं नका त्याबद्दल मनांत, भाऊसाहेब ! मी, गुलाब, भगवान वगैरे आम्ही सगळे या मताचे आहोंत कीं, ' तरुण भारत ' ताबडतोब सुरू झाला पाहिजे पुन्हा. तुम्ही केव्हां एकदां अंक काढतां याची वाटच पहाताहोंत आम्ही खरोखरी—"

" मग मी तुम्हांला आतांच सांगतों दत्तोपंत, गुरुवारीं अंक प्रसिद्ध होईल आमचा--"

" पण छापणार कुठं, पटवर्धन ?—"

" आमचं माडीवरलं ट्रेडल चालू स्थितींत आहे. त्याच्यावर छोटा अंक काढूं गुरुवारीं सायंकाळीं. त्याची प्रतिक्रिया काय होते ती पाहूं; न् मग मोठा अंक काढूं. जोग येतीलच बहुधा एक दोन दिवसांत--"

" ठीक. चांगली कल्पना आहे. अंक तूर्त लहान निघाला तरी हरकत नाहीं. पण ' तरुण भारत ' लोकांपुढं ताबडतोब येणं ही आज मुख्य गोष्ट आहे—"

" मीहि प्रथमपासून याच मताचा होतों, दत्तोपंत. " ' तरुण भारतांच्या नांवानं तुम्ही तळहाताएवढं चिठोर जरी काढलंत, तरी

चालेल. पण तुम्ही शक्य तितक्या लवकर जगापुढं आलं पाहिजे ! " असं सारखं सांगतोय मी यांना. सुदैवानं आमचं ट्रेडल माडीवर असल्यामुळं हल्ल्यांतून बचावलं. त्याच्यावर यापूर्वीच छोटा अंक काढता आला असता आम्हांला. पण, यांचा आग्रह नेहमीप्रमाणं मोठा अंक काढायचा होता, त्यामुळं इतके दिवस लांबलं. पण आतां ठरलं. गुरुवारीं ट्रेडलवर निघेल तेवढाच अंक काढूं. पण पुन्हा कुणाच्या दारांत म्हणून जायचं नाहीं छपाईसाठीं. मग विक्रीची जबाबदारी घेतां तुम्ही, दत्तोपंत ?—"

" हो, हो ! तुम्ही अगदीं निर्धास्त असा त्याबद्दल—"

× × ×

आणि खरोखरीच, श्री. पटवर्धन यांच्या या निर्धारानुसार, गुरुवार ता. १९ फेब्रुवारीं १९४८ रोजीं दुपारीं ३॥ वा. ' तरुण भारता'चा ८॥ × १३॥ आकारांतील छोटा अंक प्रसिद्ध झाला.

' जनतेच्या सेवेसीं ' या मथळयाखालीं जो छोटा अग्रलेख मी या अंकांत लिहिलेला होता, त्यांत अशी आशा व्यक्त केली होती कीं, "......पण ' तरुण भारत ' आज वाचकांच्या सेवेला हजर होत आहे, तोहि अपुऱ्या, अधुऱ्या स्वरूपांत ! त्याचीं छपाईचीं यंत्रें अद्याप दुरुस्त झालेलीं नाहींत; व इतरहि आवश्यक सामानसुमानाची जुळवाजुळव झालेली नाहीं. त्यामुळें तूर्त कांहीं दिवस तरी, चतकोर भाकरीच्या तुकड्याप्रमाणें, हा छोटेखानी अंकच आम्हांला वाचकांना सादर करावा लागणार आहे. पण, नागपूरची सहृदय जनता या विदुराघरच्या कण्या, हे सुदाम्याच्या पडशींतले पोहे, हीं शबरीचीं बोरें दिलदारपणानें गोड करून घेतील, अशी आम्हांला खात्री आहे. "

या अंकावर ' संपादक, प्रकाशक आणि मुद्रक ' अशा तिन्ही नात्यांनीं माझें नांव प्रथमच प्रसिद्ध झालें ! " " माडखोलकर संपादक असेपर्यंत आम्हीं ' तरुण भारत ' निघूं देणार नाहीं !" अशा डरकाळ्या फोडीत असलेल्या आमच्या हितशत्रूंच्या दुष्ट आव्हानाला ती घोषणा म्हणजे जणुं त्रिवार उत्तरच होतें. त्या प्रक्षुब्ध परिस्थितींत माझ्या नांवाचें ' डिक्लेरशन' करण्याची मला मुळींच इच्छा नव्हती. पण, श्री. पटवर्धन आणि श्री. लघाटे यांच्या आग्रहानुसार, मला तें करणें भाग पडलें.

या घोषणेप्रमाणेंच ' तरुण भारता ' वरील ब्रीदवाक्यही मी बदललें. गेलीं चार वर्षे 'कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन' हें भगवद्वचन ' तरुण भारता'च्या अग्रलेखावर त्याचें ब्रीदवाक्य म्हणून झळकत असे. पण त्याऐवजीं ' न मे कर्मफले स्पृहा ' हें भगवद्गीतेंतील दुसरें वचन मी या विध्वंसानंतरच्या पहिल्या अंकावर घातलें. तो बदल पाहून माझे एक मित्र उद्गारले, " उण्यापुऱ्या तेवीस हजार रुपयांच्या तुटपुंज्या भांडवलावर अवघ्या चार वर्षांत भरभराटीला आणलेलें दैनिक ज्यांनीं धुळीस मिळविण्याचा प्रयत्न केला, त्या आततायी विध्वंसकांना यापेक्षां अधिक सात्त्विक पण तितकेंच तेजस्वी उत्तर दुसरें कोणतें देणें शक्य होतें ? "

त्या दिवशीं अंक नक्की प्रसिद्ध होईल, याची श्री. मारुळकर यांच्याशिवाय कोणत्याच विक्रेत्याला कल्पना नव्हती. श्री. गुलाबराव प्रभृति जे विक्रेते सकाळीं नेहमीप्रमाणें चौकशी करण्यासाठीं आले, त्यांना " दुपारीं एकवार येऊन पाहून जा, " अशी नुसती मोघम सूचना श्री. लवाटे यांनीं केली होती. त्यामुळें, दुपारीं १॥ वाजतां श्री. मारुळकर यांच्या हाताखालचीं मुलें जेव्हां " तरुण भारत ! तरुण भारत !" असा पुकारा करीत आमच्या कार्यालयांतून बाहेर पडून टिळक रस्त्यावर धांवूं लागलीं, तेव्हां अनेक लोकांना आश्चर्याचा धक्का बसला आणि त्यांच्या हातांतले ते छोटे अंक हां हां म्हणतां खपले.

मी खिडकींत उभा राहून त्या रस्त्यांतल्या दृश्याकडे पहात होतों. मला क्षणोक्षणीं वाटत होतें, अंकांचा गठ्ठा हातांत घेऊन रस्त्यानें धावणाऱ्या त्या मुलांना कुणी अडवतो किंवा मारतो कीं काय ? कारण, गेल्या तीन दिवसांत सर्व प्रकारच्या दुष्ट धमक्या आणि नीच कंड्या आमच्या कानांवर आलेल्या होत्या; ' हितवाद ' नें ' तरुण भारत ' छापण्याचें नाकारलें ही बातमीहि प्रसिद्ध करण्यांत आली होती; व स्वतःला अट्टल गांधीवादी म्हणविणाऱ्या एका कॉंग्रेसवाल्यानें तर " 'तरुण भारत ' छापूं नका आणि विकूं नका ! ' तरुण भारता ' ला गाडण्याची हीच वेळ आहे ! ! " असा नामर्दपणाचा प्रचार आपल्या कधीं मधीं निघणाऱ्या टाचराया वृत्तपत्रांतून चालविलेला होता ! त्यामुळें माझें मन अतिशय साशंक, अतिशय सचिंत झालेलें होतें.

पण, अंकाचे पहिले गठ्ठे खपवून मुलें जेव्हां तासाच्या आंतच दुसऱ्यांदा

मागणी करावयाला आली, तेव्हां दत्तोपंत मला हर्षभरानें म्हणाले, "मी सांगत नव्हतों तुम्हांला भाऊसाहेब, कांहीं होणार नाहीं म्हणून ? नागपुरांतले कांहीं उपद्यापी इसम तुमच्या वाईटावर असले, म्हणून काय झालं ? सर्व सामान्य वाचकवर्गाला 'तरुण भारत' हवा आहे, हें पक्कें माहित आहे आम्हांला—"

आणि तें कांहीं खोटें नव्हतें. पहिल्याच दिवशीं आमचे छोटे अंक तीन हजार खपले; व त्यानंतर ता. २६ रोजीं पूर्ण अंक निघेपर्यंत खप सारखा वाढतच गेला. मी या छोट्या अंकांत 'खडीसाखरेचे खडे' या सदराखालीं महात्माजींच्या जीवनांतील कांहीं हृदयंगम प्रसंगांच्या ज्या आठवणी लिहिल्या, त्या इतक्या लोकप्रिय झाल्या कीं, 'तरुण भारत' विकणारीं मुलें "अहो, 'तरुण भारता' चे 'खडी साखरेचे खडे' घ्या !" असें रस्त्यानें ओरडत !

आमच्या या छोट्या अंकाचें लोकांकडून जसें सोत्कंठ स्वागत झालें, तसेंच आमच्या सुहृदांकडूनहि झालें.

ता. १९ रोजीं अंक प्रसिद्ध झाल्यावर अर्ध्या तासाच्या आंतच भास्करचा अभिनंदनाचा फोन मला आला. त्यानंतर सायंकाळीं ७ पर्यंत टेलिफोनची घंटा सारखी खणखणत होती. जो तो अभिनंदनपूर्वक कळकळीनें विचारीत होता, "पण मोठा अंक केव्हां काढतां हो ? या छोटयानं कांहीं समाधान होत नाहीं मनाचं !—"

'तरुण भारता' चा तो पहिला छोटा अंक ज्या वेळीं निघाला, त्या वेळीं श्री. खुशालचंद आणि श्री. मो. प. दामले हे आमचे दोघे स्नेही श्री. लघाटे यांच्या खोलींत बसलेले होते. त्यांनीं तो अंक मुद्दाम कौतुकानें विकत घेतला आणि श्री. खुशालचंद वर आणखी उद्गारले देखील, "हें पहा भाऊराव ! मी आणि दामले दोघेही कांग्रेसवाले आहोंत. आमच्या हातून तुमच्या पहिल्या अंकाची 'बोहनी' झाली आज ! हा शकुन समजा तुम्ही. आतां कांहीं भीति नाहीं तुमच्या 'तरुण भारता 'ला—"

× × × ×

त्या दिवशीं सायंकाळीं जेव्हां आम्ही उमरेड रस्त्यावर नेहमींप्रमाणें फिरायला गेलों, तेव्हां मधु मला म्हणाला—

" तुम्ही आज आनंदांत दिसता फार, भाऊसाहेब ! तीस जानेवारीनंतर मी आज प्रथमच पाहातोंय तुम्हांला इतक्या खुषींत—"

" खरं आहे तुझं म्हणणं, मधु . ता. २ फेब्रुवारीला ' नरकेसरी ' प्रेसचा विध्वंस झाल्याचं तुम्ही सांगितल्यापासून आज दुपारीं त्याचा अंक निर्विघ्न विकला जाईपर्यंत जीव थाऱ्यावर नव्हता माझा. गेले सतरा दिवस एकच चिंता माझ्या मनाला अहोरात्र जाळीत होती. आणि ती म्हणजे ' तरुण भारत ' परत कसा सुरू होईल ही. माझ्या डोळ्यांपुढं, मी स्वतः पुन्हा कसा उभा राहीन, हा प्रश्नच नव्हता. प्रश्न होता, तो फक्त ' तरुण भारत ' पुन्हा आपल्या पायांवर उभा राहण्याचा. त्यामुळं, आज ' तरुण भारता ' चं पुनरुत्थान झालेलं पाहून, चंद्रशेखरचा एखाद्या जिवावरचा दुखण्यांतून पुनर्जन्म झाल्यानं ज्या प्रकारचा आनंद मला झाला असता, त्याच प्रकारचा आनंद आज मला झाला आहे—"

" भाऊसाहेब, ' तरुण भारता ' वर तुमचा इतका जीव आहे याची कल्पना नाहीं कुणाला —"

" अरे, जीव आहे म्हणून तर गेलीं चार वर्षं नव्या दैनिकांच्या संपादनाचीं सात आठशें रुपये पगाराचीं घरीं चालत आलेलीं निमंत्रणें झिडकारून मी शंभर दीडशें रुपयांवर चिकटून राहिलोंय ' तरुण भारता ' ला ! पण खरं बोलायचं म्हणजे मधु, माझा जीव ' तरुण भारता ' वर नाहीं —"

" मग कशाला रेस्ट हाऊसमध्यें असतांना ' तरुण भारत ' पुन्हा सुरू होण्यासाठीं तुम्ही आपल्या जिवाचा इतका आटापिटा केलात, भाऊसाहेब ?–"

" आटापिटा केला खराच. पण तो केवळ ' तरुण भारता ' साठीं नाहीं. माझ्या आणि पटवर्धनांच्या दृष्टींत जो फरक आहे, तो इथेंच. त्यांना ' तरुण भारत ' हा ' तरुण भारता ' साठीं म्हणूनच प्रिय आहे. माझं तसं नाहीं. मला ' तरुण भारत ' हवा, तो माझ्या विशिष्ट कल्पनांच्या प्रचारासाठीं हवा; संयुक्त महाराष्ट्रासाठीं हवा. संयुक्त महाराष्ट्र स्थापन झाल्यावर उद्यां ' तरुण भारत ' कांहीं योगायोगानं बंद पडला किंवा मला त्यांतून निघावं लागलं, तर फारसं वाईट वाटणार नाहीं माझ्या मनाला. 'तरुण भारता' नं माझी एक महत्वाकांक्षा सफल केली आणि एक ध्येय शक्यतेच्या कार्टीत आणलं—"

" कोणती महत्वाकांक्षा ?--"

" महत्वाकांक्षा मराठी दैनिक काढून यशस्वी करण्याची. गेल्या तीस वर्षांत नागपूरमध्यें मराठी दैनिक काढण्याचे अनेक प्रयत्न मोठया प्रमाणावर झाले. पण त्यांतला एकहि प्रयत्न यशस्वी झाला नाहीं. इतकेंच नव्हे, तर तुला माहितच आहे कीं, नागपुरांत मराठी दैनिक चालणार नाहीं, असं आपले दादा ओगलेसुद्धां म्हणत असत नेहमीं! उलट, गेल्या पंधरा वर्षांत हिंदी दैनिकें मात्र दोन निघून तीं स्थिरपद झालीं. त्यामुळं मला सारखं असं वाटे कीं, आपण मराठी दैनिक काढून तें लोकप्रिय करून दाखवावं. आमच्या ट्रस्टनं ती संधी मला मिळवून दिली आणि नागपुरांत मराठी दैनिक उत्तम रीतीनं चालूं शकतं, हें मला सिद्ध करून दाखवतां आलं--"

" आणि ध्येय ?--"

" संयुक्त महाराष्ट्राचं. ' तरुण भारता ' सारखं लोकप्रिय दैनिक जर माझ्या हातार्शी नसतं, तर संयुक्त महाराष्ट्राचा इतका प्रभावी प्रचार मी खचित करूं शकलों नसतों. दत्तोपंत पोतदार नेहमीं म्हणतात कीं, संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीचं मुखपत्र महाराष्ट्रांत फक्त एकच आहे आणि तें म्हणजे 'तरुण भारत'--"

" आणि तरी तुम्हांला उद्यां ' तरुण भारत ' बंद पडल्याबद्दल वाईट वाटणार नाहीं म्हणतां ?--"

" हो. आयुष्यांत कोणत्याच गोष्टीचा लोभ किंवा अभिलाष असा कधीं माझ्या मनाला वाटला नाहीं. ज्या वेळीं जें साधन मला हातांशीं सांपडलं, त्याचा उपयोग करून घेतला आहे मी आपल्या कार्यासाठीं. ' तरुण भारत ' हं मी साधन समजतों; साध्य समजत नाहीं, मधु! ' तरुण भारता ' वर ज्यांनीं आघात केला, त्यांना संयुक्त महाराष्ट्राच्याहि चळवळीवर आघात करायचा होता, हें जाणून आहे मी. त्यांच्या दृष्टीनं ' तरुण भारता ' चा नाश म्हणजे माझा नाश होता, माझ्या जीवितकार्याचा नाश होता. म्हणून ' तरुण भारता ' च्या पुनरुत्थानासाठीं इतकी धडपड चालली होती माझी--"

× × ×

आज सकाळीं ' तरुण भारता'चा नेहमींसारखा मोठा अंक प्रसिद्ध झाला.

काल रात्रीं ९॥ वाजतां पहिला फर्मा मशिनवर काढून श्री. जोग यांनीं जेव्हां तो माझ्या हातीं दिला, तेव्हां मी हर्षभरानें त्यांना म्हटलें, "हे तुमचे उपकार मी जन्मभर विसरणार नाहीं, जोग! ता. १४ रोजीं सायंकाळीं शहरांत आल्यावर हें मोडलेलें मशीन जेव्हां वामनरावांनीं प्रथम मला दाखवलें, तेव्हां माझं मन निराशेनें खचून गेलं अगदीं. या मशिनवर पुन्हा अंक निघूं शकेल, असं कांहीं वाटलं नाहीं त्या वेळीं मला. तुम्ही खरोखरी जादुगार आहांत, जोग!—"

कारण, प्राणांतिक जखमा होऊन रणांगणावर मरून पडलेल्या एकाद्या वृद्ध योद्धयाला शुक्राचार्यांनीं संजीवनीमंत्रानें जिवंत करावें, त्याप्रमाणें छिन्नभिन्न झालेलें तें जुनें पुराणें मशिन श्री. जोग यांनीं मोठ्या कौशल्यानें चार दिवसांच्या आंत दुरुस्त करून पुन्हा चालू केलें होतें.

ता. २० रोजीं ते मुंबईहून आले, तेव्हांच मी त्यांना सांगितलें, "आम्ही कांहीं नवं मशिन घेऊं शकत नाहीं आज तरी. आणि यदाकदाचित् घेतलं, तरी सुद्धां तें इथं येऊन उभं राह्यला दोन अडीच महिने सहज लागतील. तेव्हां तुम्ही प्रथम आहेत हीं दोन्ही यंत्रं कितपत दुरुस्त होऊं शकतात तें पहा. तीं दुरुस्त होण्यावरच 'तरुण भारत' चालणं अवलंबून आहे सध्यां—

त्यांनीं दोन्ही यंत्रें काळजीपूर्वक तपासलीं आणि दुपारीं चहाच्या वेळीं आम्हांला सांगितलें कीं, दोन्ही यंत्रें चार पांच दिवसांच्या आंत चालू करून देतो!

त्यांचें तें आश्वासन ऐकून मला विलक्षण आनंद झाला.

आणि मी त्यांना म्हटलें, "ता. १४ रोजीं दुपारीं शंकरराव देव दिल्लीहून मद्रासला जात असतां इथल्या विमानतळावर जेव्हां मी त्यांना भेटलों, तेव्हां ता. २७ ला त्यांच्या भेटीसाठीं मुंबईला जायचं कबूल केलंय मी. म्हणून ता. २६ ला तुम्ही पूर्ण अंक काढून दाखवला पाहिजे मला. तो स्वतःच्या डोळयांनीं पाहिल्याशिवाय कांहीं मुंबईला जाणार नाहीं मी—"

"तुम्ही बेफिकीर रहा, भाऊसाहेब! मी जमलं तर ता. २५ लाच मोठा अंक काढून दाखवीन तुम्हांला—"

आणि आपलें हें आश्वासन, अहोरात्र अविश्रांत खपून, त्यांनीं अखेर खरें करून दाखविलें.

बुधवारीं रात्रभर मशिनपाशीं उभें राहून त्यांनीं आपल्यासमोर अंकाची छपाई पुरी करून घेतली.

आज सकाळीं उठल्याबरोबर जेव्हां मी तो पुरा मोठा अंक पाहिला, तेव्हां मी त्यांना म्हटलें, “ तुम्ही जीवदान दिलंत ‘ तरुण भारता ’ ला, जोग ! नागपुरांतला एकहि प्रेस आज आम्हांला मदत करायला तयार नाहीं. तुम्हीं जर मशिन दुरुस्त करूं शकला नसतात, तर आम्हांला ट्रेडलवर छोटा अंक तरी काढीत बसावं लागलं असतं किंवा नवं मशिन येईपर्यंत पत्र तरी बंद ठेवावं लागलं असतं ! या प्राणांतिक पेंचांतून ‘ तरुण भारता ’ ला सोडवलंत तुम्ही. आतां निश्चिंत मनानं मुंबईला जाईन मी दुपारीं—”

आम्ही हें बोलत असतांनाच मधु आला आणि अंक पाहून म्हणाला, “ काल रात्रीं पंख्याशिवाय चालू केलेल्या त्या मशिनमधून ईकरना एक एक अंक काढतांना जेव्हां मी पाह्यलं, तेव्हां सकाळीं पुरा अंक दृष्टीस पडेल आपल्या असं वाटलं नव्हतं मला, भाऊसाहेब—”

“ पण माझी मात्र खात्री होती मधु, आज पुरा अंक निघेल म्हणून. कारण यांनीं वचन दिलं होतं मला-—”

श्री. जोग कांहीं बोलले नाहींत. आपल्या मितभाषी स्वभावानुसार नुसते हंसले मात्र.

पण माझे डोळे भरून आले होते.

“ मशिनवर मोठा अंक काढावयाचा यांचा प्रयत्न जर यशस्वी झाला नसता, तर ट्रेडलवर महिना दोन महिने छोटा अंक काढूं असं म्हणत होते पटवर्धन--”

“ पण तसला चत्कोर अंक काढून मी काय करूं शकलों असतों, मधु ? पंख कातरलेल्या पक्ष्यासारखी अवस्था झाली असती माझी ! तो पक्षी झाडाच्या एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडूं शकतो जेमतेम; पण आकाशांत भरारी मारणं कांहीं शक्य होत नाहीं त्याला. तशी अवस्था झाली असती माझी ! आज संयुक्त महाराष्ट्राच्या प्रचारासाठीं मला पूर्ण प्रभावी दैनिक हवंय आपल्या हातांशीं. ट्रेडलवर चत्कोर अंक काढून ‘ तरुण भारता ’ ची धुगधुगी अजून कायम आहे एवढंच दाखवूं शकलों असतों कीं नाहीं जगाला आम्ही ? पण

त्याचा काय उपयोग होता ? ते कातरलेले पंख घेऊन खुरडत रखडत कसं तरी जगण्यापेक्षां मरण पुरवलं असतं मला ! जगायचंच, तर गरुड म्हणून अस्मानांत झेप घेत न् भराऱ्या मारीत जगतां आलं पाहिजे. मग सूर्यबिंबाला कवटाळण्याच्या साहसांत संपातिप्रमाणं पंख जळून गेले तरी बेहेत्तर—"

शान्तानिवास, नागपूर शहर ता. २६ फेब्रुवारी १९४८

× × ×

आज राष्ट्रीय स्वातंत्र्याचा पहिला वाढदिवस.

आणि महात्माजींच्या निर्वाणालाहि आज साडेसहा महिने पूर्ण होतात.

गांधीजींचा खून आणि त्यानंतर महाराष्ट्रांत सर्वत्र झालेले अत्याचार यांचा विचार ज्या वेळीं मी या कालावधीनंतर करतों, त्याहि वेळीं मला असेंच वाटतें कीं, या दोन्ही घटनांमुळें महाराष्ट्राची पराकाष्ठेची हानी झालेली आहे—

एका आततायी ब्राम्हण तरुणानें गांधीजींचा अमानुष खून केला आणि त्याचा सूड म्हणून माथेफिरू ब्राम्हणेतरांनीं ब्राम्हणांचीं घरें सर्रास जाळलीं !–

पण, जगाच्या दृष्टीनें, हिंदी जनतेच्या दृष्टीनें, कांग्रेसच्या वरिष्ठ श्रेणींतील मुत्सद्यांच्या दृष्टीनें महाराष्ट्रांतील ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर हे दोघेहि सारखेच अत्याचारी, सारखेच आततायी आणि सारखेच अमानुष ठरले; त्यांनीं केलेल्या या अघोर कृत्यांमुळें महाराष्ट्राचा दुर्लौकिक साऱ्या दुनियेंत झाला; त्याचें भवितव्य डागळून गेलें, धोक्यांत आलें.

या दुर्दैवी घटनांनंतर ता. १ मार्च रोजीं मी पुण्यास गेलों असतां माझे एक विद्वान् संपादक मित्र मला म्हणाले, " महात्माजींचा खून करून गोडश्यांनीं पंच महापातकें केलीं. त्यांनीं गांधीजींचा खून केला, स्वतःचा खून केला, ब्राम्हण जातीचा खून केला, हिंदु महासभेचा खून केला आणि राष्ट्रीय स्वयंसेवक संघाचा खून केला ! आणि हें महापातक करून त्यांनीं साधलें काय? तर स्वातंत्र्याकांक्षा मुत्सद्देगिरी, स्वतंत्रप्रज्ञता, चारित्र्य, त्याग आणि शौर्य यांच्याबद्दल साऱ्या जगाच्या प्रशंसेला पात्र झालेल्या महाराष्ट्राची दुष्कीर्ति ! ! "

महात्माजींच्या खुनाच्या भीषण दुष्परिणामांचें वर्णन, मला वाटतें, यापेक्षां अधिक समर्पक शब्दांनीं कोणी करूं शकणार नाहीं.

या घृणास्पद घटनेमुळें कोणता एकच एक बोध जर विचारी महाराष्ट्रीयांच्या होरपळलेल्या हृदयावर आणि भांबावलेल्या बुद्धीवर तीव्रतेनें बिंबला असेल, तर तो हा कीं, राजकारणांत साध्याइतकींच साधनेंहि शुचि आणि सात्त्विक असली पाहिजेत हा जो महात्माजींचा महान् सिद्धांत, त्याच्या पायावर यापुढें महाराष्ट्राच्या सार्वजनिक जीवनाची, विशेषतः त्याच्या राजकारणाची, पुनर्घटना झाली पाहिजे.

कारण, महाराष्ट्राचें गेल्या शंभर वर्षांचें केवळ राजकारणच नव्हे, तर सार्वजनिक राष्ट्रीय जीवनच मुळीं सारें द्वेषदूषित आहे. मतभेदांचें पर्यवसान मतद्वेषांत व्हावें आणि मग त्या मतद्वेषानें अखेर दहशतवादाची फणा काढावी, असा गेल्या शंभर वर्षांचा महाराष्ट्रांतील राष्ट्रीय आणि राजकीय चळवळींचा इतिहास आहे. लोकहितवादी, दयानंद आणि फुले यांच्यावर चिपळूणकरांनीं केलेले प्रहार किंवा रानडे, आगरकर आणि गोखले यांच्याशीं टिळकांचे झालेले संघर्ष यांत ज्या मनोवृत्तींचें निरर्गल प्रदर्शन झालें, ती मनोवृत्ति विद्वेषी आणि विषारी नव्हती, असें कोण म्हणूं शकेल ?

पारतंत्र्याच्या काळांत लोकांना चीड आणण्यासाठीं, परकी रक्तशोषक साम्राज्यसत्ता आणि तिचे पुरस्कर्ते यांच्याविरुद्ध जनतेंत चेव उत्पन्न करण्यासाठीं दहशतवादाची चिथावणी देणाऱ्या तशा प्रकारच्या विद्वेषी, विषारी प्रचाराची गरज होती, असें म्हणतां येईल कदाचित्. पण, आतां देश स्वतंत्र झाल्यावर, लोकराज्य स्थापन करण्याची तयारी चाललेली असतांना देखील, तीच पूर्वीची दहशतवादी मनोवृत्ति आपण सार्वजनिक जीवनांत चालू द्यावयाची काय ?

आपल्याला अमान्य किंवा अप्रिय असलेल्या विचारप्रणालीला गारद करण्यासाठीं ती दहशतवादी मनोवृत्ति चालू द्यावी असें ज्यांना वाटतें, त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, ती मनोवृत्ति सुसंस्कृत लोकशाहीच्या विकासाला विघातक आहे; समाजाच्या बुद्धीला सतत चालना देणाऱ्या विचारस्वातंत्र्याला विघातक आहे; व मानवी व्यक्तित्वाच्या पूर्ण आविष्काराला आवश्यक असलेल्या मुक्तात्मतेलाहि विघातक आहे. त्या दहशतवादी मनोवृत्तीचा धिंगाणा जर देशांत चालू राहिला,

तर तिच्यांतून झुंडशाही तरी पैदा होईल किंवा झोटिंगशाही तरी जन्माला येईल.

पण स्वतंत्र हिंदुस्थानाला निर्बुद्ध झुंडशाही नको आहे किंवा निरंकुश झोटिंगशाहीहि नको आहे. सर्व प्रकारच्या शोषक प्रवृत्तींपासून अलिप्त असलेली व संयम, सदाचार आणि सेवा यांचें व्रत घेतलेली सुसंस्कृत लोकशाही त्याला यशस्वी करून दाखवायची आहे. त्या लोकशाहीच्या यशांतूनच 'भारतीय राष्ट्र-कुटुंब' ( Indian Commonwealth of Nations ) आविर्भूत होईल आणि तें जगाच्या राजकारणाला नवें सात्त्विक वळण लावील.

म्हणून, साधनांची शुचिता हें त्याच्या राज्यनीतीचें, राजकीय चारित्र्याचें आणि सार्वजनिक जीवनाचें यापुढें पायाभूत तत्त्व झालें पाहिजे.

आज 'शोषण' हें सर्व राज्यनीतीचें मूलभूत तत्त्व आणि सर्व मानवी जीवनाचा मूलाधार होऊन बसलेलें आहे. त्यामुळें, एक व्यक्ति दुसऱ्या व्यक्तीला, एक जाति दुसऱ्या जातीला, एक वर्ग दुसऱ्या वर्गाला आणि एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्राला शोषित करून पुष्ट होऊं पहातें. शोषणाच्या या सर्वंकष प्रवृत्तींतूनच भांडवलशाही, साम्राज्यशाही, झोटिंगशाही आणि वर्गीय हुकूमशाही या अत्याचारी शाह्यांची पैदास होऊन जग सतत युद्धाच्या ज्वाळांत होरपळत राहिलेलें आहे. या शोषणाच्या प्रवृत्तीचा समूळ नायनाट करून 'समाधान' हेंच सर्व राज्यनीतीचें साध्य, सर्व मानवी जीवनाचा मूलाधार झालें पाहिजे. अशुचि साधनांनीं प्राप्त होणारी सत्ता आणि संपत्ति त्याज्य वाटल्याशिवाय, त्यांच्याविषयीं घृणा उत्पन्न झाल्याशिवाय ही क्रांति कशी घडून येणार ? ही क्रांति तत्वतः वैचारिक, मूलतः मानसिक आहे.

महात्माजींचें सर्व जीवन, त्यांच्या स्वतःच्या विशिष्ट कल्पनांनुसार, ही क्रांति घडवून आणण्यांत खर्ची पडलें. त्यांचा मृत्यु हें या क्रांतिकार्यांतील बलिदान होय.

त्यांचें बलिदान शोषणरहित समाजाच्या स्थापनेचें हें क्रांतिकार्य किती बिकट, किती भीषण आहे, याचें निदर्शक नाहीं काय ?

त्यांनीं स्वतंत्र भारताच्या मुक्त भूमीवर देह ठेवला ही गोष्ट खरी; पण आपल्याला प्राणांहूनहि प्रिय असलेल्या सर्व तत्वांचा चक्काचूर झालेला पहात त्यांना मरण आलें, हेंहि तितकेंच खरें !

म्हणून, त्या क्रांतीच्या मार्गावर शोषित आणि पीडित मानवजातीला नेणें, हें स्वतंत्र भारताचें, त्याच्या नवसंस्कृतीचें साध्य असलें पाहिजे.

तरच आपण पितृऋण फेडलें, असें मुक्त भारताला अभिमानानें म्हणतां येईल.

× × ×

आज हिंदुस्थान स्वतंत्र होऊन एक वर्ष पूर्ण झालें.

हा एक वर्षाचा अनुभव काय सांगतो ?

तो अनुभव असें सांगतो कीं, ता. १५ ऑगस्ट १९४७ रोजीं ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला जें हें स्वातंत्र्य दिलें, तें वरदान ठरलें नाहीं, तर आव्हान ठरलें.

कारण, ज्या स्वरूपांत आणि ज्या पद्धतीनें ब्रिटिशांनीं हिंदुस्थानाला हें स्वातंत्र्य बहाल केलें, त्यांत जणुं अशी प्रच्छन्न धमकी तुच्छतेनें देण्यांत आली होती कीं, " तुम्ही स्वातंत्र्यासाठीं इतका अट्टाहास चालविलेला आहे ना? मग घ्या तर हें स्वातंत्र्य ! आम्ही तुम्हांला स्वेच्छेनें देतों ! ! मात्र, आतां हिंमत असेल, तर त्या स्वातंत्र्याला आपण पात्र असल्याचें तुम्ही जगाला सिद्ध करून दाखवा ! ! ! "

स्वातंत्र्यप्राप्तीच्या पहिल्या हर्षाच्या ऊर्मीत त्या स्वातंत्र्याच्या पोटीं यादवीची किती स्फोटक, ज्वालाग्राही बीजें दडलेलीं आहेत, याची जाणीव प्रायः कोणालाच झाली नाहीं; व स्वतःविषयींच्या कृतकृत्यतेच्या आणि ब्रिटनविषयींच्या कृतज्ञतेच्या भावनेनें भारलेले राष्ट्रनेते परस्परप्रशंसेंत मग्न होऊन गेले.

त्या आनंदाच्या भरांत, स्वातंत्र्य देत असतांना ब्रिटिश सरकारनें आपल्या देशाचे केवळ दोन तुकडेच नव्हे, तर संस्थानांवरील सार्वभौम सत्ता नष्ट झाल्याचें जाहीर करून त्याची राई राई एवढीं अनेक खांडोळीं करून टाकलीं आहेत, हेंहि त्यांच्या लक्षांत आलें नाहीं.

पुराणांत अशी एक कथा आहे कीं, आपली सापत्न माता दिती हिला आपला नाश करूं शकेल असा अमर पुत्र होणार असल्याचें जेव्हां देवेंद्राला कळलें, तेव्हां स्वर्गलोकाचा तो छद्मी सम्राट् साधुवेषानें त्या गर्भवती, व्रतस्थ ऋषिपत्नीच्या सेवेला राहिला; व व्रतक्लेशांनीं श्रांत झालेल्या त्या साध्वीला एकदां

सायंकाळीं अशुचि अवस्थेंत अचानक झोंप लागली असतां, इंद्रानें योगमायेनें तिच्या उदरांत प्रवेश करून आंतील तेजस्वी गर्भाचे वज्रानें सात तुकडे केले. पण तो गर्भ अशा रीतीनें छिन्नविच्छिन्न करूनहि त्याच्या मनांतली भीति कमी झाली नाहीं. म्हणून स्वतःचें साम्राज्य अबाधित रहावें एवढ्याच एका आसुरी ईर्ष्येनें प्रेरित झालेल्या इंद्रानें त्या सात तुकड्यांचे पुन्हा प्रत्येकीं आणखी सात तुकडे केले !

ब्रिटिश सरकारनें प्रथम केलेली हिंदुस्थानाची फाळणी व नंतर हिंदुस्थानाबरोबरच संस्थानेंहि स्वतंत्र झाल्याचें जाहिर करून त्याचे पुन्हा आणखी केलेले शेकडों तुकडे पाहून पुराणांतील मरुद्गणांच्या जन्माची ही उद्बोधक कथा कोणाला आठवणार नाहीं ? आणि अशा प्रकारचें शापगर्भ स्वातंत्र्य हिंदुस्थानाला बहाल करण्यांत सद्भावनेपेक्षां भेदनीति आणि वरदानापेक्षां आव्हान देण्याचीच पिशुन बुद्धि अधिक प्रभावी होती, असें कोण म्हणणार नाहीं ?

त्या आव्हानाची सर्वग्रासी भयानकता फाळणीच्या रूपानें, जनतेचें स्थलांतर आणि संहार यांच्या रूपानें, काश्मीर आणि हैद्राबाद यांच्या अघोषित यादवीच्या रूपानें पहिल्या चार महिन्यांतच अधिकाधिक भीषणतेनें प्रत्ययाला येत गेली.

आणि या सगळ्या घटनांचें पर्यवसान अखेर महात्माजींच्या खुनांत झालें.

गांधीजींचा खून ही आकस्मिक किंवा पृथक् घटना नाहीं. स्वतंत्र हिंदी राष्ट्र गर्भावस्थेंत असतांनाच त्याचीं शकलें करणारी ब्रिटिश भेदनीति हीच खरोखरी त्यांच्या हत्येबद्दल जबाबदार आहे.

ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या गेल्या शंभर वर्षांच्या भेदनीतिमुळें पारतंत्र्याच्या काळांतहि अखंड राहिलेल्या हिंदुस्थानाचीं स्वतंत्र होत असतांना खांडोळीं पडलीं; आपल्या पुरातन मातृभूमीचीं तशा रीतीनें तीं खांडोळीं पडलेलीं पाहून सूडाच्या भावना तळतळत उठल्या; व त्या आततायी, आंधळ्या भावनांनीं आपला सारा राग अखेर गांधीजींवर काढला.

हिंदु-मुसलमानांत फूट पाडून उदयोन्मुख हिंदी राष्ट्राचा तेजोवध करणें हें ब्रिटिश साम्राज्यशाहीचें साध्य; तर हिंदु-मुसलमानांत जूट घडवून आणून एकसंघ प्रबळ राष्ट्र निर्माण करणें हें महात्माजींचें साध्य होतें. या दोन साध्यांतील

संघर्ष गांधीजींच्या खुनाला कारण झाला. त्यांचा मृत्यु ही पाकिस्तानच्या जन्माची प्रतिक्रिया आहे. पाकिस्तानची पैदास हें ज्या ब्रिटिश भेदनीतीचें एक फलित, त्याच भेदनीतीचें दुसरें फलित गांधीजींचा खून हेंहि.

खिस्ताला देहांताची शिक्षा निरुपायानें दिल्यावर,–" या साधुपुरुषाच्या हत्येचें पाप माझ्या माथीं नाहीं !...त्या पापाचे जबाबदार तुम्ही आहांत ! ! "— (I am innocent of this good man's blood. It is your affair !) असे उद्गार काढून पायलटनें हात धुतले. पण, गांधीजींच्या रक्तानें डागळलेले ब्रिटिश साम्राज्यशाहीचे हात जगांतील कोणत्याहि तीर्थोदकानें धुतले जाणार नाहींत. कोणत्याही प्रायश्चित्तानें पुनीत होणार नाहींत. ब्रिटिश साम्राज्य-वाद्यांनीं केलेला हिंदी राष्ट्राचा तेजोवध हाच राष्ट्रपित्याच्या वधाला अखेर कारण झाला.

राष्ट्राचा तेजोवध आणि राष्ट्रपित्याचा वध !-त्यांच्या दाहक स्मृतीनें विव्हळ झालेल्या मनाला आजचा हा स्वातंत्र्यदिन जर शापदिनासारखा वाटला, तर त्यांत नवल काय ? आणि त्यामुळें डोळ्यांतून आनंदाश्रूंचें चांदणें वरसण्याऐवजीं जर दुःखाश्रूंचे स्फुलिंग उसळले, तर त्यांत तरी नवल काय ? राष्ट्र स्वतंत्र झालें, पण छिन्नभिन्न होऊन ! आणि, ब्रिटिश साम्राज्यशाहीनें केलेला तो त्याचा तेजोवध राष्ट्रपित्याच्या वधाला कारण होऊन ! सम्राट् अशोकाचें जें धर्मचक्र आज स्वतंत्र हिंदी राष्ट्र आपल्या ध्वजावर डौलानें मिरवीत आहे, त्या धर्मचक्रानें हजार वर्षांपूर्वी तक्षशिलेपासून लंकेपर्यंत सारा भारतवर्ष आपल्या शिलाशास-नांनीं पवित्र आणि प्रभावित केला होता. पण, आज स्वतंत्र भारताच्या ज्या प्रदेशावर त्या धर्मचक्राची दिव्य प्रभा—" चरथ भिख्खवे, चारीकं बहुजनहिताय बहुजनसुखाय ! "—या भगवान् बुद्धाच्या आदेशाचा जणुं उद्घोष करित शताधिक शतकांनीं पुनश्च पसरली आहे, त्या प्रदेशांत तक्षशिला नाहीं आणि लंकाहि नाहीं. भारतीय राजमुद्रेवरील सम्राट् अशोकाचे ते सिंह–त्या सम्राटाच्या शिलाशासनांतील धर्मोदेश पीतनदीपासून तों दक्षिणोदधिपर्यंत गाजलेले ज्यांनीं पाहिले—ते त्या प्रियदर्शनाचे सिंह !—त्यांना स्वतंत्र भार-ताचा आजचा संकोच, आजचा विध्वंस आणि आजचीं एकमेकांना कायमचीं दुरावलेलीं शकलें पाहून काय वाटत असेल ? हिमालयाच्या अरण्यांत दिलीपाला

भेटलेल्या गौरीच्या सिंहाप्रमाणें त्या अशोकाच्या सिंहांना जर वाचा फुटली, तर ते भारतीय जनतेला आक्रंदून सांगतील, " राष्ट्राचा तेजोवध आणि राष्ट्र-पित्याचा वध यांचा शाप घेऊन आलेलें हें स्वातंत्र्य खरें स्वातंत्र्य नाहीं. त्याच्या प्राप्तीबद्दल आनंद कसला मानता आणि उत्सव तरी कसला करतां ?—"

आणि, " बहुजनहिताय बहुजनसुखाय " या भगवान् बुद्धाच्या आदेशाचा उद्घोष करणारें तें धर्मचक्र जर, " विनाशायाच दुष्कृताम् " हें व्रत घेतलेल्या श्रीकृष्णाच्या सुदर्शनचक्राप्रमाणें, पुनश्च प्रवर्तित आणि प्रभावित झालें, तर स्वतंत्र भारताला, या बदललेल्या परिस्थितींत, आज कोणता आदेश देईल ?

तें धर्मचक्र स्वातंत्र्यप्राप्तीच्या या पहिल्या वाढदिवशीं उत्सवमग्न हिंदी जनतेला असा गंभीर, असा कराल आदेश देईल कीं, " हे भारतसंतान, राष्ट्राचा तेजोवध आणि राष्ट्रपित्याचा वध यांच्याबद्दल जबाबदार असलेल्या ब्रिटिश भेदनीतीनें केवळ या प्राचीन पुण्यभूमीचींच शकलें केलेलीं आहेत असें नाहीं; तर ज्या पूर्वेवर दीड हजार वर्षांपूर्वी माझी पावन प्रभा पसरलेली होती, त्या साऱ्या पूर्वेकडील प्रबुद्ध भूमीला आज त्या भेदनीतीचें ग्रहण लागलेलें आहे. त्या भेदनीतीच्या पाशांतून पूर्वेला मुक्त करण्यांतच भारताच्या मुक्ततेचें साफल्य, स्वातंत्र्याचें सार्थक आहे. त्या भेदनीतीच्या रक्तशोषक वर्चस्वांतून ज्या दिवशीं संपूर्ण पूर्व मुक्त होईल, त्याच दिवशीं शोषणरहित समाजस्थापनेच्या महान् क्रांतिकार्याला प्रारंभ होईल. भारताच्या मुक्ततेचा दिन हा त्या विराट् क्रांतीचा मुहूर्त ठरला पाहिजे !–"

आणि, गोऱ्या साम्राज्यशाहीच्या वर्णवर्चस्वाविरुद्ध दक्षिण आफ्रिकेच्या दलित भूमीवर ज्यांनीं प्रथम सत्याग्रहाचें रणशिंग फुंकलें, त्या गांधीजींच्या जीवनाचाहि हाच आदेश नाहीं काय ?

या आदेशाच्या परिपालनांतच महात्माजींच्या जीवनकार्याची पूर्तता आहे, भारतीय स्वातंत्र्याची सफलता आहे.

किंबहुना ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या आव्हानालाहि या आदेशाचें परिपालन हेंच समर्पक उत्तर ठरेल.

× × × ×

आणि, स्वतंत्र भारताला जें हें महान् क्रांतिकार्य करावयाचें आहे, त्यांत महाराष्ट्राचा भाग कोणता राहील ?—

तो महाराष्ट्र कीं, दंडकारण्यांतील राक्षसराज्यांचा उच्छेद करून अगस्त्य आणि रामचंद्र यांनीं पुण्यसलिला गोदावरीच्या परिसरांत ज्याची स्थापना केली

तो महाराष्ट्र कीं, ज्यानें गेल्या हजार वर्षांच्या पारतंत्र्याच्या काळांत परकीयांच्या आक्रमणाला शह देऊन पुनःपुन्हा स्वतंत्र होण्याचे यशस्वी प्रयत्न केले

तो महाराष्ट्र कीं, ज्याला शिवाजी, रानडे आणि टिळक यांच्या-सारख्या क्रांतदर्शी राष्ट्रनिर्मात्यांनीं भारतीय राजकारणांत अनन्य प्रतिष्ठा प्राप्त करून दिली

तो महाराष्ट्र कीं, ज्यानें ज्ञानेश्वर, चोखामेळा, एकनाथ आणि तुकाराम यांच्या उदात्त चारित्र्याच्या रूपानें मानव्याचे दैवी आदर्श अखिल मानवजातिपुढें मूर्तिमंत उभे केले

तो महाराष्ट्र कीं, " जेतुला अर्थी आपुली थोरी असे तेतुलाहि अर्थी आणिकासी थोरी करी, " असा ज्याच्या महंतीचा महिमा चक्र-धरांनीं गाइला

तो महाराष्ट्र कीं, ज्याला समर्थांनीं—

> भेटो कोणी एक नर धेड माहार चांभार
> त्याचें राखावें अंतर याचें नांव भजन
> दुःख नेदावें कोणाला उंचनीच जरी जाला
> अंतरात्मा ओळखिला तोचि जाणा सज्जन

या एकात्मतेच्या उपासनेची दीक्षा देऊन सह्याद्रीच्या गिरिकुहरांत आनंद-वनभुवन निर्माण केलें.

तो महाराष्ट्र कीं, ज्याच्या बुद्धियोगाची परंपरा भांडारकर, राजाराम-शास्त्री भागवत, आगरकर, राजवाडे, केतकर, दप्तरी, अंबेडकर, ध. रा.

गाडगीळ, जावडेकर, लक्ष्मणशास्त्री जोशी यांच्यासारख्या मनीषींनीं आपल्या स्वतंत्रप्रज्ञतेनें दिगंतीं गाजविली

आणि

तो महाराष्ट्र कीं, ज्यानें फुले, कर्वे, शिंदे, देवधर, भाऊराव पाटील, विनोबाजी भावे, आप्पासाहेब पटवर्धन, कुंदर दिवाण यांच्यासारख्या त्यागी समाजसेवकांच्या रूपानें विधायक कार्याच्या विविध प्रणाली उत्पन्न केल्या—

—पण तो महाराष्ट्र आज दुभंगून गेला आहे. ब्राह्मण—ब्राह्मणेतर आणि स्पृश्य—अस्पृश्य या वादांनीं छिन्नविछिन्न झाला आहे.

गेल्या बुधवारीं सकाळीं श्री. ए. श्री. पटवर्धन, श्री. बाळासाहेब ढवळे आणि मी कांहीं कामानिमित्त वऱ्हाड—मध्यप्रांताचे गृहमंत्री ना. पं. द्वारकाप्रसाद मिश्र यांच्याकडे गेलो असतां संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नावरून बोलतांना पंडितजी मला म्हणाले—

" तुम्ही आणि शंकरराव देव असे फक्त दोघेच काय ते ब्राह्मण आज मिशनरीच्या उत्साहानें संयुक्त महाराष्ट्रासाठी काम करीत आहांत. पण, मला भीति वाटते, माडखोलकर, संयुक्त महाराष्ट्राचें तुमचें स्वप्न ज्या वेळीं मूर्तावस्थेला येईल, त्या वेळीं तुमचे ब्राह्मणेतर दोस्त तुम्हांला महाराष्ट्रांत शांततेनें आणि समृद्धीनें नांदू देणार नाहींत. आणि तुम्हांला महाकोसलमध्यें येऊन आमचा आश्रय घ्यावा लागेल !" ( You and Shankarrao Deo are the only two Brahmins who are worknig to day for United Maharashtra with missionary zeal. But, I am afraid. Mr. Madkholkar, when your dream of United Maharashtra is realised, your Nonbrahmin friends will not allow you to live in Maharashtra in peace and prosperity. And you will have to migrate to Mahakosal and seek our shelter )

पंडितजींनीं हंसत हंसत मिस्किलपणानें काढलेले ते उद्गार माझ्या अगदीं जिव्हारीं झोंबले. पण मी कांहीं बोललों नाहीं. कारण त्या उद्गारांत वस्तुस्थितीच प्रतिबिंबित झालेली नव्हती काय ?

पण, माझ्या मनांत आलें, ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद हा काय फक्त महाराष्ट्रांतच आहे ? आणि तो काय महात्माजींच्या खुनानंतरच प्रथम वणव्याप्रमाणें अचानक उफाळला ? त्या वादाचा मागोवा घेत गेलें, तर त्याची मुळें थेट ऋग्वेदाच्या काळांत आणि सप्तसिंधूंच्या प्रदेशांत सांपडतील. वासिष्ठ आणि विश्वामित्र, भृगु आणि कार्तवीर्य, द्रोण आणि द्रुपद यांच्यांतील वैमनस्यानें सारें वैदिक आणि पौराणिक वाङ्मय रक्तलांछित झालेलें नाहीं काय ? भृगूंच्या रागानें ब्राह्मणस्त्रियांच्या उदरांतील गर्भसुद्धां कापून काढणारे कार्तवीर्य आणि कार्तवीर्यांचा सूड घेण्यासाठीं एकवीस वेळां पृथ्वी निःक्षत्रिय करणारा भार्गवराम !— ब्राह्मण-क्षत्रियांतील पिढ्या न् पिढ्या भडकत गेलेल्या त्या भीषण वैराग्नीला नंतरच्या भारतीय इतिहासांत कुठें तोड सांपडेल ? मग महाराष्ट्रांतील ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाबद्दल एवढा गवगवा करण्याचें काय कारण आहे ?

आणि त्या वादाच्या भीतीनें आजपर्यंत कोणत्या धृतात्म ब्राह्मणानें आपला देश किंवा आपलें नियत कर्तव्य सोडलें आहे ? पित्याच्या वधानें चवताळून जाऊन क्षत्रियांच्या रक्तानें त्याला तिलांजली द्यावयाला उद्युक्त होणारा परशुरामासारखा उग्रकर्मा ब्राह्मण एकादाच ! उलट, विश्वामित्रानें जबरदस्तीनें आश्रमाबाहेर काढलेली कामधेनु हंबरडा फोडीत वसिष्ठापुढें येऊन उभी राहिली असतां त्या ब्रह्मर्षीनें तिला उत्तर दिलें, " नंदिनी, हा विश्वामित्र तुझें बलात्कारानें हरण करीत आहे. अशा स्थितींत मी काय करूं शकतों ? मी तर क्षमाशील ब्राह्मण आहे. " ( किं कर्तव्यं मया तत्र ? क्षमावान् ब्राह्मणोऽस्म्यहम् ) आणि, चिडलेल्या पराभूत विश्वामित्रानें ज्या वेळीं त्याच्या शंभर पुत्रांची कत्तल करवून त्याचा वंशक्षय केला, त्याही वेळीं त्या मुनिसत्तमाला विश्वामित्राच्या कौशिककुलाचा उच्छेद करण्याची बुद्धि झाली नाहीं; तर पुत्रशोकानें पोळलेला तो महर्षि आत्मविनाशाला प्रवृत्त झाला ! कारण त्या तपोधनानें शांति हाच ब्राह्मणाचा परम धर्म ( शम एव परो धर्मः ) मानला होता.

तेव्हां, उद्यां संयुक्त महाराष्ट्र निर्माण होऊन जरी त्यांत ब्राह्मणेतरांचें राज्य स्थापन झालें, तरी त्या कारणामुळें कोणता ज्ञानी, शमधन ब्राह्मण आपला हा मायदेश सोडून जाणार आहे ? ज्ञानोपासना हें ज्याचें जीवनव्रत आहे व जाति आणि वर्ग यांचा समूळ नाश होऊन एकात्म जनसमाज महाराष्ट्रांत उत्पन्न

व्हावा हें ज्याचें जीवनस्वप्न आहे, अशा तपःस्वाध्यायांत आयुष्य घालविणाऱ्या सेवारत ब्राह्मणालाहि संयुक्त महाराष्ट्रांत स्थान रहाणार नाहीं काय? अफझल-खानाच्या वधानंतर महाराष्ट्र जेव्हां निर्भय झाला, तेव्हां ' उदंड जाहलें पाणी स्नानसंध्या करावया ' असे धन्योद्गार समर्थांनीं काढले. त्या त्यांच्या उद्गारांत आत्मतुष्ट ब्राह्मणाची स्वाभाविक जीवनाकांक्षा अभिव्यक्त झालेली नाहीं काय? स्नानसंध्येला म्हणजेच तपाचरणाला आणि ज्ञानोपासनेला निर्विघ्न आणि निश्चिंत स्थान मिळणें, एवढेंच कोणत्याहि ब्राह्मणाचें, विद्येच्या कोणत्याहि एकनिष्ठ उपासकाचें एकमेव अभिलाषित असावें, असेंच जणुं समर्थांनीं आपल्या त्या हर्षोद्गाराच्या रूपानें जगाला सांगून टाकलें! अशा विनीत सेवाभावानें प्रेरित झालेल्या तपःस्वाध्यायशील ब्राह्मणालाहि संयुक्त महाराष्ट्रांत थारा मिळणार नाहीं का?

जर मिळणार नसेल, तर त्या धृतात्म्यानें, देशत्यागाची कल्पनाहि मनांत न आणतां, ज्या महाराष्ट्राच्या अन्नोदकावर त्याचा भौतिक पिंड परिपुष्ट झाला आणि ज्याच्या संस्कृतीच्या प्रभावानें त्याची बुद्धियोगी अस्मिता परिणत झाली, त्या महाराष्ट्राच्या पुण्यभूमीवरच आपला देह ठेवावयाला तयार झालें पाहिजे. नाझींच्या छळामुळें देशोधडीला लागलेल्या स्टीफन झ्वाइगनें आत्म-हत्या करण्यापूर्वींच्या आपल्या अंतिम निवेदनांत असे उद्गार काढले होते कीं, " माझ्या मातृभूमीचा पराभव झालेला मी पाहिला आणि माझी अध्यात्म-भूमि जी युरोप तीहि आत्मनाश करीत असल्याचें मी पाहिलें. आतां मी साठीच्या घरांत येऊन ठेपलों आहे. माझ्या उध्वस्त जीवनाची पुनर्घटना कराव-याला मला अमित शक्ति लागेल. आणि माझा सर्व उत्साह तर, जणुं कांहीं मला स्वतःचा मायदेश उरलेला नाहीं अशा रीतीनें, वर्षानुवर्षे देशोदेशीं वण-वणा भटकण्यांत खर्च होऊन गेलेला आहे. म्हणून, माझी अशी खात्री होऊन चुकली आहे कीं, मानवी स्वातंत्र्य आणि माझें स्वतःचेंहि विचारस्वातंत्र्य ही जगांतील सर्वश्रेष्ठ संपदा आहे अशा भावनेनें केवळ अध्यात्मिक कार्याला जें आपलें जीवन मी वाहिलें होतें, त्या माझ्या जीवनाचा अंत करण्याची वेळ आतां आली आहे. "( After I saw the country of my own Language fall, and my spiritual land–Europe–destroying itself and

as I reach the age of sixty, it would require immense strength to reconstruct my life, and my energy is exhausted by long years of peregrination as one without a country. Therefore, I believe it is time to end a life which was dedicated only to spiritual work, considering human liberty and my own as the greatest wealth in the world. )
संयुक्त महाराष्ट्रांत मानानें जगणें अशक्य आहे असा अनुभव जर दुर्दैवानें यदाकदाचित् पुढें आलाच, तर स्टीफन झ्वाइगच्या या उद्गारांचें स्मरण करीत या महाराष्ट्रभूमिवरच मृत्यूला कवटाळणें मला प्रिय वाटेल.

× × ×

—असा हा दुभंगलेला महाराष्ट्र कीं, ज्याचे ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य पुत्र आज एकमेकांचे गळे कापावयाला आणि घरें जाळावयाला उद्युक्त झालेले आहेत, तो स्वतंत्र भारताच्या उत्कर्षाला काय हातभार लावणार ? भाऊबंदकीमुळें, प्रादेशिक आणि जातीय वैमनस्यामुळें, परस्परांविषयींच्या दुरंत अविश्वासामुळें ज्याला स्वतःचे एकीकरण आणि अभ्युदय साधणें अशक्य होऊन बसलें आहे, तो हा महाराष्ट्र भारतीय राजकारणांत काय पराक्रम गाजविणार ?

उलट, जातीयता आणि प्रांतीयता यांचे आरोप करून जो तो आज महाराष्ट्राला निंदित आहे; त्याच्या एकीकरणाच्या स्वाभाविक आकांक्षेचा उपहास करून त्याचा तेजोभंग करीत आहे. त्याच्या प्रादेशिक, राजकीय आणि आर्थिक दुर्दशेकडे कोणाचेंही लक्ष नाहीं.

या दुरवस्थेंतून महाराष्ट्राचें डोकें वर कसें निघेल ?

ब्राह्मण, ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य हे त्याचे तिन्ही समाजघटक एकात्म झाल्यानें; त्यांच्या जीवनाचे प्रवाह एकमेकांत मिसळून जातिवर्गविहीन ( casteless and classless ) असा नवा एकसंध महाराष्ट्र समाज निर्माण झाल्यानें ! एकात्म आणि एकसंध महाराष्ट्र हाच भारतीय संघराज्याचा आणि भारतीय राष्ट्रकुटुंबाचा स्वयंपूर्ण, बलशाली घटक होऊं शकेल. त्याच्या विशाल संसारांत बरोबरीच्या नात्यानें भाग घेऊं शकेल.

म्हणून आज स्वातंत्र्योत्सवाच्या या मंगलदिनीं आपण अशी प्रतिज्ञा करूं या कीं,—

या महाराष्ट्रांत आम्ही सर्व महाराष्ट्रीय आहोंत; ब्राह्मण नाहीं, ब्राह्मणेतर नाहीं, अस्पृश्य नाहीं.

या भरतखंडांत आम्ही सर्व भारतीय आहोंत; हिंदु नाहीं, मुसलमान नाहीं, ख्रिस्ती नाहीं.

या प्रतिज्ञेनें महाराष्ट्राचें जीवन परिपूत, प्रभावित आणि पुनर्घटित झालें, तरच त्याचा उद्धार होईल.

आणि मग तो भारताच्याहि उन्नतीला हातभार लावूं शकेल.

ता. १५ ऑगस्ट १९४८ शांतानिवास, नागपूर शहर

# उपसंहार

## ' न मे भक्तः प्रणश्यति '

### विध्वंसानंतर

*ता. २६ फेब्रुवारी १९४८ रोजीं नागपूर शहरांत झालेल्या अत्याचारांत ' नरकेसरी ' छापखाना आणि ' तरुण भारत ' कार्यालय यांचा जो विध्वंस झाला, त्यानंतर पंचवीस दिवसांनीं आज पुनश्च ' तरुण भारत ' वाचकांच्या सेवेला आपल्या नेहमीच्या पूर्ण स्वरूपांत सादर होत आहे. ता. ३१ जानेवारी रोजीं सकाळीं महात्माजींच्या अमर स्मृतीला अनन्यभावानें श्रद्धांजलि अर्पण करणारा ' तरुण भारता 'चा अंक प्रसिद्ध झाला, त्या वेळीं कोणाच्या स्वप्नींहि आलें नसेल कीं, पुढील छत्तीस तासांत नागपूर शहरामध्यें सर्वत्र जाळपोळ, लुटालूट आणि दंगल माजून शोकाच्या अश्रूंतून क्रोधाच्या ज्वाळा उफाळतील! अखिल हिंदी जनतेला अतिशय प्रिय आणि पूज्य असलेल्या वृद्ध राष्ट्रपित्याचा एका आततायी माथेफिरू तरुणाच्या हातून खून व्हावा, या अघोर घटनेबद्दल कोणालाहि चीड आणि त्वेष येणें अगदीं स्वाभाविक आहे. पण, त्या लोक-क्षोभाचें पर्यवसान गांधीजींच्या गेल्या सत्तावीस वर्षांच्या अहिंसेच्या शिकवणु-कीला सर्वथैव विसंगत अशा अपकृत्यांत होईल, अशी कल्पनाहि मनाला शिवली नव्हती. पण दुर्दैवानें तसा प्रकार घडला खरा ! नागपूर शहरांतील या दंगलींत ' नरकेसरी ' प्रेसचीं छपाईची तिन्ही यंत्रें आणि इतर सर्व सामान यांची नासधूस होऊन त्याचें सुमारें पन्नास हजार रुपयांचें नुकसान झालें; व ' तरुण भारत ' कार्यालयांतील तिजोरी फोडून तिच्यांतीलहि हजार रुपयांची

*ता. २६ फेब्रुवारी १९४८ च्या अंकांतील अग्रलेख

लूट करण्यांत आली. या विध्वंसांतून ' तरुण भारता ' चें डोकें पुन्हा वर निघणें दुष्कर आहे, अशी चिंता जर त्याच्या हजारों वाचकांना आणि हित-चिंतकांना वाटली असली, तर त्यांत नवल काय ? पण, त्यांच्या सदिच्छेच्या प्रभावामुळें, सुहृदांच्या पाठबळामुळें आणि कामगारवर्गाच्या अढळ निष्ठेमुळें उध्वस्त झालेल्या ' तरुण भारता ' चें आज पुनरुत्थान होत असून, वाचकांची सेवा तो उत्तरोत्तर नव्या तेजानें करावयाला समर्थ होईल, अशी आम्हांला उमेद वाटते. ता. २ फेब्रुवारी रोजीं झालेल्या दंगलींत ' तरुण भारता ' ची जी हानि झाली, ती त्याच्यासारख्या अल्पवयी दैनिकाला प्राणांतिक वाटण्यासारखी आहे, हें निस्संशय. पण, त्या अपरिमित हानीच्या गंडांतरांतहि सर्व पक्षांच्या आणि सर्व जातींच्या सुहृदांच्या आत्मीयतेचा जो जिव्हाळा त्याच्या अनुभवाला आला, त्यामुळें त्याचा आत्मप्रत्यय आणि आत्मबल हीं दोन्हीं शतगुणित झालीं आहेत.

## श्रद्धा यत्किंचितहि ढळली नाहीं

ता. २ फेब्रुवारी रोजीं ' तरुण भारता ' वर जो हा प्राणांतिक आघात अचानक झाला, त्यामुळें त्याची श्रद्धा ढळली असेल किंवा लोकशाहीवरील त्याचा विश्वास डळमळीत झाला असेल, असें समजण्याचें कारण नाहीं. गेलीं चार वर्षे ज्या निष्ठेनें त्यानें जनतेची सेवा केली, त्याच निष्ठेनें तो यापुढें, आपल्या विशिष्ट कल्पनांनुसार, तिची सेवा करील. जनता हीं आईप्रमाणें प्रेमळ पण कोपिष्ट आणि समुद्राप्रमाणें शांत पण वादळी असते. एरवीं आपल्या हेलावणाऱ्या लाटांच्या हिंदोळ्यांवर हजारों जहाजें वाहून नेऊन मानवजातीच्या समृद्धीला हातभार लावणारा महासागर एकादे वेळीं खवळला आणि त्यानें हजारों जीवांना जलसमाधि दिली, म्हणून आपण त्याच्या नेहमींच्या सामान्यतः शांत वृत्तीवरील विश्वास थोडाच सोडून देतों ? किंवा, रागाच्या भरांत आपल्या पोटच्या गोळ्याला बदडून काढणारी आई, संतापाचा आवेग ओसरतांच, त्याला पुनश्च आपल्या पोटाशीं घेऊन त्या ताडन करणाऱ्या कठोर हातांनींच नंतर कुरवाळते कीं नाहीं ? जनतेचा राग आणि लोभ यांची जात बव्हंशीं याच

प्रकारची आहे; व म्हणून तिच्या लोभामुळें जसें अस्मान ठेंगणें झाल्यासारखें वाटतां कामा नये,तसेंच रागामुळें तें कोसळल्यासारखेंहि वाटतां कामा नये. अर्थात् ता. २ रोजीं 'तरुण भारता' वर काय किंवा त्याच्या संपादकावर काय जी लोकक्षोभाची आपत्ति कोसळली, तिच्यामुळें त्यांच्या धारणेंत काय किंवा धोरणांत काय कोणत्याहि प्रकारचा फरक पडणार नाहीं. संयुक्त महाराष्ट्र तावडतोब निर्माण झाला पाहिजे, त्या संयुक्त महाराष्ट्रांत मराठी बहुजनसमाजाचें लोकराज्य स्थापन झाले पाहिजे व हें ध्येय साध्य होण्यासाठीं महाराष्ट्रांतील जातिभेद आणि वर्गभेद हे समूळ नष्ट झाले पाहिजेत, ही त्याची निष्ठा अचल आहे; व बहुजनसमाजाच्या हितसंबंधांचा पुरस्कार तो पूर्वीइतक्याच दक्षतेनें करील. किंबहुना, ता. २ रोजीं प्रकट झालेल्या लोकक्षोभांत समाजांतील संपन्न ( Have ) आणि अकिंचन (Have not) वर्गांतील संघर्षाची जी चुणूक लुटालुटीच्या रूपानें दिसून आली आणि जाळपोळीला जो जातीय विद्वेषाचा दर्प आला, तो पाहून तर समाजवादाच्या तत्त्वावर महाराष्ट्राच्या जीवनाची पुनर्घटना शक्य तितक्या लवकर झाली पाहिजे, ही 'तरुण भारता'ची भावना दृढतर झाली. त्याबरोबरच, सध्यांच्या अंतर्बाह्य प्रक्षुब्ध परिस्थितींत मध्यवर्ती सरकार आणि प्रांतिक सरकार हीं दोन्हीहि लोकरक्षण आणि लोकहित यांच्या साधनेसाठीं जे जे उपाय योजतील, त्यांना तारतम्यानें पाठिंबा देणें हेंहि 'तरुण भारत' नेहमींप्रमाणें आपलें कर्तव्य समजेल. महात्माजींच्या मृत्युमुळें सर्वांत मोठी राष्ट्रीय हानी आणि तीहि अगदीं अपरिमित अशी जर कोणती झाली असेल, तर ती ही कीं, जनतेंतील निरनिराळ्या अनिष्ट प्रवृत्तींना आणि अत्याचारी प्रेरणांना कह्यांत ठेवून देशांत शांतता आणि सद्भावना यांचा परिपोष करणारी सर्वश्रेष्ठ चित्शक्ति नष्ट झाली आहे; म्हणजेच पर्यायानें नवोदित हिंदी राष्ट्र आणि हिंदी संघराज्य हीं दोन्ही दुर्दैवानें जन्मतःच पोरकीं झालीं आहेत. आणि, तींहि अशा आणीबाणीच्या वेळीं कीं, जेव्हां काश्मीरच्या प्रश्नावर पाकिस्तान युद्धाला उभें ठाकण्याच्या डरकाळ्या फोडीत आहे. अशा नाजूक बिकट प्रसंगीं मध्यवर्ति काय किंवा प्रांतिक काय दोन्ही सरकारांच्या स्थैर्याविषयीं जागरूक रहाणें अवश्य आहे, असें कोणता जबाबदार मनुष्य समजणार नाहीं ?

## ' बुद्धिस्तु मागान्मम...... . '

ता. २ फेब्रुवारी रोजीं ' तरुण भारता ' वर जी आपत्ति कोसळली, तिला जसा एका परीनें लोकक्षोभ कारण झाला, तसाच दुसऱ्या परीनें त्या आपत्तींतून त्याचें डोकें वर निघावयालाहि लोकलोभ कारण झाला, असें अभिमानानें म्हणतां येईल. गेल्या पंधरा दिवसांत हजारों लोकांनीं प्रत्यक्ष वा पत्रद्वारा त्याच्या प्रकाशनाविषयीं आस्थेनें चौकशी केली आणि शेंकडों लोकांनीं आपापल्या शक्तिनुसार त्याला शक्य तें सहाय्य करण्याची तयारी दर्शविली. आजचें त्याचें पुनरुत्थान हें या त्याच्याविषयींच्या आतुर जनतेच्या प्रेमाचेंच एक प्रकारें फळ नव्हे काय? पण, व्यक्ति काय किंवा संस्था काय या कोणत्याहि प्राणांतिक संकटाला तोंड देऊन ज्या पुनश्च आपल्या पायांवर उभ्या राहतात, त्या त्यांच्या पुनरुत्थानाला बाहेरून होणाऱ्या प्रेमळ सहाय्यापेक्षांहि त्यांचें आंतरिक सामर्थ्य, विशिष्ट ध्येयावरील श्रद्धेमुळें आणि निष्ठेमुळें त्यांना प्राप्त होणारें आत्मबल हेंच खरोखरी अधिक कारण होत असतें. ' तरुण भारता ' चें मुख्य बल जर कोणतें असेल, तर तें हेंच होय; व या आत्मबलाच्या जोरावरच अवघ्या चार वर्षांत तो सर्व प्रकारच्या विरोधावर मात करून वाढला आणि स्थिरपद होण्याच्या स्थितीला येऊन पोंचला. व्यक्तीचे काय किंवा संस्थेचे काय हितशत्रु हे तिची बाह्य साधनसंपदा फार तर नष्ट करूं शकतील. पण, ज्या बुद्धीच्या आणि आत्मबलाच्या अमोघ प्रभावानें व्यक्तीचा आणि संस्थेचा उत्कर्ष होतो, त्यांचा नाश करावयाला जगांतलि कोणती शक्ति समर्थ आहे? कौरवांनीं द्यूतांत जिंकलेले पांडव हे जेव्हां नेसत्या वस्त्रांनिशीं वनवासाला जावयाला निघाले, त्या वेळीं आंधळया धृतराष्ट्राला आपल्या अत्याचारी मुलांच्या त्या कपटी कृत्याची शरम वाटून त्यानें द्रौपदीला वर मागण्याची विनंती केली. तेव्हां, त्या मानिनीनें असा वर मागितला कीं, " माझ्या पराभूत पतींना फक्त त्यांचीं शस्त्रास्त्रें तेवढीं परत मिळावींत! " लोभी धृतराष्ट्राला असें वाटलें होतें कीं, जुगारांत गमावलेलें आपल्या पतींचें इंद्रप्रस्थाचें राज्य ती परत मागेल. पण, त्या तेजस्विनीनें त्याला असें मार्मिक उत्तर दिलें कीं, " माझ्या पतींचीं शस्त्रें त्यांना परत मिळालीं, म्हणजे ते सर्व पृथ्वीचें राज्य संपादन करूं शक-

तील! " अपमानित, क्रुद्ध चाणक्यानेंहि, " एका केवलमेव साधनविधौ सेनाशतेभ्योऽधिका।......बुद्धिरस्तु मागान्मम "–" सर्व साधनांमध्यें केवळ अद्वितीय आणि हजारों सैन्याहून बलशाली अशी माझी बुद्धि तेवढी कायम राहूं दे! " अशीच प्रार्थना परमेश्वराला केली नव्हती काय? 'तरुण भारता–' ची बुद्धि आणि आत्मबल हीं दोन्ही जोंपर्यंत कायम आहेत, तोंपर्यंत त्याला कोणताहि आघात गारद करूं शकणार नाहीं. म्हणून त्याच्या या पुनरुत्थाना-च्या प्रसंगीं आमची जगन्नियंत्याला फक्त एवढीच विनम्र प्रार्थना आहे कीं,—

आकाशिंच्या कुऱ्हाडी। माथां खुशाल पाडी।
आघात सोसण्याचें सामर्थ्य मात्र द्यावें॥

ता. १७ फेब्रुवारी १९४८

